हे तुकडे मोकळे असल्यामुळें इकडे तिकडे जाऊन सहज नाहींसे होण्याचा फार संभव आहे. परंतु ह्याचा प्रतीकार करण्यास थोडीशी खबरदारी घेतली ह्मणजे झालें. तिचा येथें विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं. कारण प्रत्येकजण आपल्या बुद्धीप्रमाणें त्याची सहज व्यवस्था लावील.

आतां कागदपत्र कोणत्या अनुक्रमानें लावावयाचे हा प्रश्न राहतो. 'कालानुक्रम,' 'विषयानुक्रम,' व 'वर्णानुक्रम' असे तीन प्रकार करतां येतील. प्रथम कालानुक्रम घेऊं; पण त्यास एक अडचण आहे. ती ही कीं प्रत्येक कागदावर तारीख सांपडणें कठीण आहे, ह्मणून ही व्यवस्था सर्व ठिकाणीं सारखी लागू पडणार नाहीं. तथापि कागदपत्रांच्या कालाचें साधारण अनुमान विद्वान् शोधक आंतील मजकुराच्या सहाय्यानें करूं शकेल. दुसरा विपयानुक्रम. हा कांहीं ठिकाणीं सोईचा आहे; पण कांहीं ठिकाणीं तो अतिशय घोंटाळ्याचा व पुनरुक्तीचा होतो. वर्णानुक्रमही कांहीं ठिकाणीं उत्तम व सोईस्कर आहे. ह्मणून प्रसंग पाहून हे तीन्ही प्रकार उपयोगांत आणावेत.

---

## भाग ७ वा.

### वाह्यचर्चा व तिचें महत्व.

मागील तीन भागांत वाह्यचर्चेचा सर्व भाग आटोपला. आतां तिच्यासंबंधीं निरनिराळ्या लोकांचे काय समज आहेत व तिची खरी स्थिति व वास्तविक योग्यता काय आहे, ह्यांचा विचार करण्याचें या भागांत योजिलें आहे.

ह्या चर्चेसंबंधानें सामान्य लोकांस अतिशयित तिटकारा आहे. दुसऱ्या पक्षीं, तिचे कैवारी आहेत, ते तिची वाजवीपेक्षां फाजिल स्तुति करितात. परंतु एकीकडे स्तुतीचा अतिरेक व दुसरीकडे तिरस्काराचा कडेलोट ह्या दोन टोकांचा संबंध अजिवात सोडून देऊन, वास्तविक तिची योग्यता काय आहे, हें आपण पाहूं.

चर्चेसंबंधीं जे लोक तिरस्कार दाखवितात, त्यांचें खंडण करण्याची जरूरीच नाहीं. कारण चर्चेवांचून इतिहासाचें चालावयाचेंच नाहीं, हें उघड आहे. इतिहासास चर्चा अत्यावश्यक आहे; जर चर्चा नाहीं, तर इतिहासही नाहीं.

दुसऱ्या पक्षीं, कांहीं शोधक व विद्वान् लोक तिच्या फाजील अभिमानाचे भरांत तिची नुसती आवश्यकता सिद्ध करून थांबत नाहींत. ते दुरभिमानामुळें तिच्या गुणाच्या व महत्वाच्या अतिशयोक्तिरूप लोटाबरोबर वाहवले जातात. ते ह्मणतात, 'ह्या बाह्यचर्चेच्या अचूक पद्धतीनें आह्मी इतिहासास केवळ प्रत्यक्ष शास्त्राचीच प्रौढी आणिली आहे. कर्तृत्वाच्या परीक्षणानें आपणांस मागील काळची जशी माहिती मिळते, तशी दुसरी कशानेंही मिळत नाहीं. खुद्द कागदपत्रांच्या चर्चेमुळें इतिहास पुष्कळ सुधारला जातो.' ह्मणजे, या लोकांचा असा समज झालेला दिसतो कीं, बाह्यचर्चा ह्मणजे ऐतिहासिक चर्चेचें सर्वस्व होय. परंतु हा निव्वळ भ्रम आहे. कागदपत्रांची बाह्यचर्चा, कर्तृत्वाचें परीक्षण व कागदपत्रांचें वर्गीकरण, एवढयांनींच ऐतिहासिक चर्चा संपत नाहीं, हा तर नुसता आरंभ आहे; महत्वाचा भाग आहे, तो पुढेंच आहे. शिवाय मागील काळासंबंधीं जी आपणांस माहिती मिळते, ती आंतील चर्चेपासून मिळते; ह्यांच्या ह्मणण्याप्रमाणें, बाह्यचर्चेपासून नव्हे. बाह्यचर्चा जर आधींच कोणी करून ठेविली असेल तर इतिहासकारांस ती पुन्हा मुळींच करावयास नको. त्याला यापेक्षां दुसरीं महत्वाचीं कामें पुष्कळ आहेत. बाह्यचर्चेच्या योगानें कागदपत्रांच्या बाह्यांगाचें परीक्षण होतें. त्यांच्या अंतरंगाची परीक्षा, त्या चर्चेनें होत नाहीं. तीस 'आंतील चर्चे'ची जरूरी आहे. बाह्यचर्चेनें कागदपत्रांचा मळ झडतो. बाह्यचर्चा हें एक फलप्राप्तीचें साधन आहे; तीच फलप्राप्ति नव्हे. बाह्यचर्चेची जरूरी आपणांस नेहमींची नाहीं; ती हंगामी आहे. असा एक दिवस लौकरच येईल कीं, ज्या दिवशीं सर्व कागदपत्रांचा बाह्यचर्चेचा विधि उरकून, ते छापून पुढच्या विधीस तयार झाले आहेत.

आजपर्यंत विद्वान् शोधक व इतिहासकार यांचे उद्योग अगदीं वेगवेगळाले होते. इतिहासकाराचें काम ह्मणजे, विद्वान् शोधकांच्या प्रयत्नांशी कोणत्याही तऱ्हेचा संबंध न ठेवितां, उत्तम भाषेत एक ग्रंथ तयार करणें. त्या ग्रंथास लोक इतिहास असें ह्मणत. दुसऱ्या पक्षीं, विद्वान् शोधक शोध करकरून माहिती जमा करीत व ' इतिहास ' कसा लिहिला जावा, यासंबंधीं नियम बांधीत; परंतु स्वतः इतिहास लिहिण्याची त्यांनीं कधीं तसदी घेतली नाहीं. ऐतिहासिक कागदपत्रांचा शोध, चर्चा, व वर्गीकरण या पलीकडे त्यांनीं पाऊल ठेविलें नाहीं. विद्वान् शोधकांस वाटे, शोध करणें झालें ह्मणजे संपलें. इतिहासकारांस वाटे, त्यांच्या शोधाकडे लक्ष देऊन इतिहासांतील गोष्टींचा विपर्यास झाला असल्यास, त्याची दुरुस्ती करण्याची जरूरी नाहीं; मनास वाटेल तसा कल्पनेनें इतिहास रचावा! ही अशी स्थिति कशी होती, याचा आपणांस चमत्कार वाटतो! परंतु अलीकडे ती स्थिति मावळून, एकमेक एकमेकांच्या मेहनतीचा उपयोग करूं लागले आहेत, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

आतां चर्चा करतांना आपल्या मनाची समता शोधकानें ढळूं देतां कामा नये. कोणत्याही प्रकारचा पूर्वग्रह मनांत असतां कामा नये. त्याच प्रमाणें, चर्चेचा अतिरेक उपयोगाचा नाहीं, किंवा उठल्या बसल्या संशय घेणें चांगलें नाहीं. केवळ कल्पनेच्या भरांत, सत्याचा टाच काढावयाचें सोडून कित्येक वेळां हास्यास्पद अनुमानें काढण्यांत आलेलीं आहेत. तेव्हां, यास फार जपलें पाहिजे. श्रमविभागाचें तत्त्व पाहिलें पाहिजे, वगैरे गोष्टी मागें सांगण्यांत आलेल्याच आहेत. यास्तव, त्यांचा येथें विस्तार करणें नलगे. " आंतील चर्चा " ही अत्यंत महत्वाची आहे. ती फार सावधगिरीनें व शांत डोक्यानें केली पाहिजे. आमडीवांचून हीं कामें हातीं घेतल्यास तीं नीट तडीस जात नाहींत.

---

## भाग ८ वा.

## आंतील चर्चा—अर्थासंबंधीं चर्चा.

जेव्हां प्राणिशास्त्रवेत्ता एखाद्या स्नायूच्या आकाराचें व त्याच्या स्थितीचें वर्णन करतो, किंवा जेव्हां आपण युक्लीडचा सिद्धांत वाचतों, त्यांचे सिद्धांत आपण मनांत कोणत्याही तऱ्हेचा संशय न बाळगितां ग्रहण करतों याचें कारण काय? याचें कारण एवढेंच कीं, त्यांनीं ते सिद्धांत कोणत्या व कशा पद्धतीनें काढले आहेत हें आपणांस ठाऊक आहे. परंतु जेव्हां एखादा जुना इतिहासकार इतिहासग्रंथांत कांहीं विधानें करतो तेव्हां तीं आपणांस वरील सिद्धांतांप्रमाणेंच बरोबर धरतां येणार नाहींत. कारण, त्यांचीं माहिती मिळविण्याचीं साधनें कशीं होतीं, याचें आपणांस बिलकुल ज्ञान नाहीं. वास्तव, त्याच्या विधानांचा खरे खोटेपणा ठरविण्याला "आंतील चर्चा" हाच एक मार्ग आहे.

कागदपत्रांत खरेखोटेपणाचा भाग किती आहे, हें शोधून काढणें, 'आंतील चर्चे'चें काम आहे. कोणत्याही गोष्टीचे अवलोकनास आरंभ झाल्यापासून, ती कागदावर नमूद करीपर्यंत होणारे जे मनाचे व्यापार त्यांच्याशीं आंतील चर्चेचा संबंध आहे. आतां, कागदपत्र हें कर्त्याच्या दीर्घ कृतीचें फळ होय. त्या कृतींसंबंधांनीं कर्ता आपणांस कांहीं सविस्तर माहिती देत नाहीं. त्याला गोष्टींचें अवलोकन करावें लागतें, किंवा त्या गोळा कराव्या लागतात; वाक्यरचना करावी लागते; शब्दांची जुळणी करावी लागते, आणि परस्परांपासून भिन्न असलेल्या ह्या सर्व कृती कदाचित् त्याच्याच्यानें नीटपणें झाल्या नसतील, ह्मणून कर्त्याच्या कोणत्या कृती चुकीच्या आहेत, हें शोधून काढून त्यांच्या उपपत्तींचा त्याग करण्याकरितां कर्त्याच्या ह्या श्रम-समूहाचें पृथक्करण करणें आवश्यक आहे. सारांश, चर्चेस पृथक्करणाची जरूरी आहे. प्रत्येक चर्चेस पृथक्करणापासून प्रारंभ होतो.

कर्त्यानें केलेल्या सर्व कृती पुन्हां करणें, हें पृथक्करणाचें काम होय. प्रत्येक कृति, बरोबर रीतीनें केली आहे किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां तिचें क्रमशः परीक्षण केलें पाहिजे. कर्त्याला ती गोष्ट कळल्यापासून ती त्यानें कागदावर नमूद करीपर्यंत, त्याच्या झालेल्या सर्व क्रियांचा विचार करणें अगत्याचें आहे. मात्र, तो आपणांस शेवटाकडून आरंभाकडे करीत गेलें पाहिजे.

'आंतील चर्चा' ही 'बाह्यचर्चे'प्रमाणें सुखाची नाहीं; तीपासून मनाचें समाधान होत नाहीं. कारण, तिजपासून कोणत्याही गोष्टीचा निश्चित असा उलगडा होत नाहीं. तिचा उपयोग करावयाचा ह्मणजे, ती करणें भाग आहे, त्याजवांचून गति नाहीं, ह्मणून करावयाचा. असो.

अतिशय सूक्ष्म दृष्टीचे इतिहासकार आंतील चर्चेचे दोन भाग करितातः—(१) कागदांतील मजकुराचें पृथक्करण व कर्त्याचें ह्मणणें ठरविण्याकरितां 'आंतील चर्चा'. (२) ज्या स्थितीमध्यें कागद लिहून तयार झाला त्यासंबंधीं विचार. हा विचार कर्त्यानें केलेल्या विधानांच्या समर्थनार्थ आवश्यक आहे. आपल्याला अर्थासंबंधीं चर्चा करावयाची ह्मटली ह्मणजे, कर्त्याचें खरें ह्मणणें काय आहे, हें शोधून काढावयाचें. हें काम बिनचूकपणें उरकण्यास ज्या भाषेंत ते कागदपत्र असतील तिचें चांगलें ज्ञान संपादिलें पाहिजे. एवढेंच नव्हे, तर विशिष्ट देशांतील विशिष्ट ग्रंथकारांची विशिष्ट भाषापद्धतीचीही चांगली माहिती पाहिजे.

कागदपत्र हातांत आल्यावर, त्यांतील भाषाशैली अगर लेखकांची मतें यांनीं आपलें मन दूषित होऊं नये, ह्मणून त्याचा शब्दशः काय अर्थ होतो, तो अगदीं साध्या भाषेंत कागदाच्या कडेवर उतरून काढावयाचा, एवढेंच या भागाचें काम आहे.

हा अर्थ करतानां कित्येक वेळां अर्थासंबंधीं पुष्कळ अडचणी येण्याजोग्या आहेत. परंतु यासंबंधीं येथें विस्तार करणें नको. किंबहुना, जरी हा महत्वाचा भाग आहे, तरी त्यावर जास्त लिहिणें शक्य नाहीं. काय काय अडचणी येतील त्या प्रत्येकीचा निर्देश करतां येणें मुष्किलीचें आहे.

भाषेंत प्राविण्य असावें; तें त्यास उपयोगीं आहे, एवढेंच कायतें ह्मणतां येईल.

कित्येकवेळां शब्दशः अर्थ लागू पडत नाहीं, कर्त्याची भाषा, गूढार्थ, अन्योक्ति किंवा अलंकार ह्यांनीं युक्त असल्यास, शब्दशः अर्थ लाह जिकपणें चालणार नाहीं. वास्तव, लेखकाच्या विचारपद्धतीस योग्य तोच अर्थ घ्यावा.

---

## भाग ९ वा.

—:o:—

## लेखकाच्या ज्ञानाविषयीं व त्यानें दिलेल्या माहितीच्या खरेपणाविषयीं चर्चा.

कर्त्याचे विचार त्यानें मांडलेल्या भाषापद्धतीवरून आपण काढिले. परंतु त्यानें सांगीतलेल्या गोष्टी खरोखरी घडल्या किंवा नाहींत, त्या काल्पनिक आहेत कीं काय, इत्यादि शंकांचें निरसन हाणें राहतेंच. लेखकानें जें लिहिलें तें खरें कशावरून! कदाचित् त्यानें खोटें लिहिलें असेल; खोटें लिहिलें नसल्यास, कदाचित् चुकीचें लिहिलें असेल, वास्तविक गोष्टीसंबंधीं त्याचा गैरसमज झाला असेल. असें होणें कांहींच चमत्कारिक नाहीं, तरी आपल्या मनाची प्रवृत्ति काय असते कीं, जेवढें कागदपत्रांत लिहिलें आहे, तेवढें सर्व खरें. पण असा ग्रह असणें ह्मणजे, कोणीही मनुष्य खोटें बोलावयाचा नाहीं, किंवा गैरसमजानें चुकीचें लिहावयाचा नाहीं, असें ह्मणण्यासारखें आहे. तथापि, वास्तविक स्थिति अशी नाहीं. इतिहासकारांना व शोधकांना, कागदपत्रांची चर्चा करतांना अशा लबाड्या दिसून आलेल्या आहेत. यामुळें, संशय येणें स्वाभाविक आहे. इतिहासशास्त्रांत "पद्धतशीर संशय" अगदीं जरूरीचा आहे. इतिहासशास्त्रज्ञाची वृत्ति अतिशयित संशयी असली पाहिजे. कोणत्याही गोष्टीचा खरेपणा जोखल्याशिवाय, ती खरी मानणें साहसाचें आहे.

आतां खरेपणा जोखावयाचा ह्मणजे, मजकुराचें परीक्षण करून पहावयाचें. परंतु कागदपत्रांतील सर्व गोष्टींचें, एकदम परीक्षण करणें, बरोबर नाहीं. त्यांतील प्रत्येक विधानाचें वेगवेगळालें परीक्षण करणें, जरूर आहे. पृथक्करणावांचून परीक्षण करणें, अशक्य आहे. कधीं कधीं एकाच वाक्यांत अनेक विधानें असतात. तीं मग एकमेकांपासून अलग करून त्यांचें एकमेकांचें क्रमशः पृथक्करण व परीक्षण करावें लागतें. आपण विक्रींत जशी तारीख, ठिकाण, विकणारा, गिऱ्हाईक, विकाऊ वस्तु, किम्मत आणि त्यासंबंधीं अशी प्रत्येक गोष्ट, वेगवेगळाली करतों, त्याप्रमाणेंच आपणांस येथें केलें पाहिजे.

कोणत्याही गोष्टीचा शास्त्रीयपद्धतीनें खरेपणा जोखावयाचा, ह्मणजे तिचें परीक्षण आहे. परंतु कांहीं प्रसंगीं, हें अमक्या लेखकाचें अगर ग्रंथकर्त्याचें विधान आहे, एवढेंच कारण त्यावर भरंसा ठेवण्यास पुरेसें असतें. तथापि असे प्रसंग एकंदरींत फारच थोडे. नेहमींची आपली वहिवाट ह्मटली ह्मणजे, चर्चा व पृथक्करण हीं दोन्हीही बरोबरच करावयाचीं. पण एखादे वेळेस कठिण भाषेचा कागद आपल्या हातीं चर्चेस येतो, अशावेळेस तसें करणें शक्य नसतें. बाकी सर्व ठिकाणीं आपण अर्थाचें पृथक्करण व चर्चा हीं दोन्हीही एकाच वेळेस करतों. वाक्य समजल्याबरोबर, आपण त्याचें पृथक्करण करतों आणि त्यांतील प्रत्येक तत्वासंबंधीं चर्चा करावयास लागतों. कर्त्याच्या विधानांची योग्यता केवळ त्याच्या मानसिक क्रियांवर व त्याच्या स्थितीवर अवलंबून आहे. चर्चेला या मानसिक क्रियांचे परीक्षणावांचून दुसरी गतीच नाहीं. हा लेख लिहितानां, कर्त्याची मानसिक स्थिति चांगली होती किंवा दूषित होती, हें कसें ठरवावयाचें, या प्रश्नाचा विचार, हा या भागाचा विषय आहे.

कर्तृत्वाचें परीक्षण करतानां कर्त्यासंबंधीं व त्याच्या मानसिक स्थितीसंबंधीं आपणांस कांहीं माहिती मिळाली. ती जितकी विस्तृत मिळेल तितकी आपणांस हवीच आहे. या माहितीचें व लेखाचें मनन करून कर्त्याची संवय, विचार, त्याची स्थिति व हा लेख लिहितेवेळेस त्याची अन-

लेली परीस्थिति, यांचें बारकाईनें निरीक्षण केलें पाहिजे. ह्मणजे, कोणत्या मनोवृत्तीचा अगर स्थितीचा जोर होऊन, त्याचा लेख बरोबर किंवा दूषित असा लिहिला गेला, हें आपणांस कळेल.

कोणत्याही विधानांच्या खरेपणाच्या दिखाऊ डौलावर जाऊन त्यावर निःशंकपणें विश्वास ठेवण्यास प्रवृत्त होऊं नये. पुष्कळ वेळां बाह्यांगाचे डौलानें अवास्तव ग्रह होण्याचा संभव असतो. याकरितां, चर्चेची कास कधींही सोडूं नये. ही चर्चा दोन प्रकारांनीं करावी. ( १ ) कागदपत्रांतील एकंदर माहिती या नात्यानें त्याचें एक परीक्षण; ( २ ) त्यांतील प्रत्येक विधानांचें निराळें परीक्षण. हीं दोन्ही परीक्षणें करतांना, त्यांतील विधानांवर विश्वास ठेवण्यास किंवा न ठेवण्यास काय कारणें असावींत याचा बारकाईनें विचार करावा. कोणतीही खरी गोष्ट, बदलून लिहावयाला कोणीही माणूस कां व कसा प्रवृत्त होतो हें लक्षांत आणून, तशा तऱ्हेची आपल्या लेखाची स्थिति होती काय, किंवा तशी शंका येण्यास जागा आहे काय, याचा विचार झाला पाहिजे.

**कर्त्याच्या इमानाविषयीं संशय येण्यास कारणें:**—(१) स्वतःचा स्वार्थ, (२) परिस्थितीचा जोर, (३) सहानुभूति आणि द्वेष, (४) फाजील वढाई, (५) लोकमतास मान, (६) भाषेचा नोंकझोंक. १—आपला स्वार्थ साधण्याकरितां जाणूनबुजून बनावट लेख लिहिणारे आपल्या पाहण्यांत थोडेथोडके नाहींत. त्याचप्रमाणें, कधीं कधीं आपला समाज, जात, कुटुंब, प्रांत, देश, धर्म, तट किंवा मंडळी यांचा स्वार्थ साधण्याकरितां, त्यांचा कैवार घेऊन सत्यापलाप करणारे लोक इर्षेस पेटलेले आपण पाहतों. २—परिस्थितीचा जोर ह्मणजे, जेव्हां एकाद्या ठरीव पद्धतीप्रमाणें कागदपत्र लिहिणें भाग पडलें, तेव्हां वरिष्टाच्या भीतीनें खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें लिहावें लागतें, हें सर्वांस ठाऊक आहेच. उदाहरणार्थ, सर्व देशांतील सरकारी रिपोर्ट. ३—आपल्या मित्रासंबंधीं सहानुभूति व प्रतिपक्षासंबंधीं द्वेष असल्याकारणानें, सत्याचे खून पाडणें बहुतेक मानवीस्वभावाला अनुरूप दिसतें. ४—स्वतःची शेखी मिरविण्याचे उद्देशा-

नें वाजवीपेक्षां फाजील लिहून सत्याला लपवून ठेवण्याची वहिवाट सर्वांस महशूर आहेच. ५—लोकांना अगर कांहीं विशिष्ट व्यक्तींना बरें वाटावें ह्मणून सत्यापलाप करण्याची जगाची चाल कोणास ठाऊक नाहीं? केवळ लोकांस बरें वाटावें ह्मणून लिहिलेले लेख, ठरीव पद्धतीचीं दरबारी भाषणें, खाविंदचरणीं मिलिंदायमान होणाऱ्या लांगूल चालकांनीं आपल्या आराध्यदेवतेस वाहिलेली प्रशस्तिपत्रें, यांत सत्यदेवतेचा कितपत वोज ठेविलेला असतो, हें आपणांस कोणीं सांगावयास नको. ६—सत्याचा खुराडा केवळ भाषेच्या झोंकाखालीं केलेलाही आपणांस माहित आहेच. तव्हां, अशांतली कांहीं स्थिति आपल्या कर्त्यासंबंधीं झालेली आहे कीं काय, याचा विचार झाला पाहिजे.

माहिती बरोबर नाहीं, असा संशय येण्यास कारणें:—(१) कर्त्यानें त्या गोष्टीचें नीट निरीक्षण केलें नसल्यामुळें, त्यानें तिचें केलेलें वर्णन अवास्तव किंवा चुकीचें असण्याचा संभव आहे. याला दोन तीन कारणें असतात. एक त्याचें मन शुद्ध नसतें. दुसरें, तसें न करण्याविषयीं त्याचें मन कोणीं वळविलेलें असतें. तिसरें, त्याचा स्वतःचा निष्काळजीपणा. (२) कर्त्याला चांगलें निरीक्षण करतां येण्यासारखी स्थिति नव्हती. कर्त्याला कोणत्याही गोष्टीचें चांगलें अवलोकन करतां येण्याला कशी स्थिति लागते, हें आपणांस ठाऊक आहे. चांगल्या रीतीनें दिसेल, अशा ठिकाणीं त्यानें वसलें पाहिजे. स्वतःचा स्वार्थ अगर पूर्वग्रह यांचें त्या वेळेस अस्तित्व नसलें पाहिजे. इत्यादि. (३) हलगर्जीपणानें किंवा आळसानें खरा मजकूर लक्षांत न राहून काल्पनिक लिहिलेला आहे. कारण जी माहिती आपणांस मिळाली किंवा जी गोष्ट आपण पाहिली. ती त्यागलीच टिपून ठेविली नाहीं, तर विस्मृतीमुळें तींत पुष्कळ दोष येणें स्वाभाविक आहे. (४) प्रत्यक्ष अवलोकन करतां येण्यासारखी गोष्ट नव्हती. उदाहरणार्थ लढाया. त्यानें जरी आर्धी त्या प्रत्यक्ष पाहिल्या असतील, तरी देखील त्यांतील वर्णनें सदोष निघावयाचींच. लढायांचीं वर्णनें, दोन्ही दळांची संख्या, एकमेकांचा नाश ह्या गोष्टींवर सहसा विश्वास ठेवितां येत

नाहीं. (९) दंतकथा व आख्यायिका ह्यांच्यावरून कधीं कधीं कर्त्यानें माहिती घेतलेली असते. तेव्हां ती माहिती तो प्रत्यक्ष अवलोकन करून मिळवीत नाहीं.

एखादी गोष्ट इतकी ठोकळ व सर्वश्रुत असते कीं, तत्संबंधीं सत्यापलाप करणें अशक्य असतें. आनंदीबाईनें नारायणराव पेशव्यास मारिलें, ही गोष्ट आबालवृद्धांस महशूर आहे. आतां ह्या गोष्टीसंबंधानें एखाद्या आनंदीबाईच्या पक्षाच्या मनुष्यानें जरी एखादा कागद लिहिला असता तरी त्याला ही गोष्ट लपवितां आली नसती. कारण लबाडी केली तर ती बाहेर आल्यावांचून राहणार नाहीं, हें त्यास पक्कें ठाऊक!

अशा रीतीनें विचार करून कर्त्याच्या इमानाविषयीं व त्यानें दिलेल्या माहितीच्या खरेपणाविषयीं चर्चा करावयाची. त्याचा सारांश येणेंप्रमाणें:—आपल्याला काम करावयाचें तें हें: कागद घ्यावयाचा; तो वाचावयाचा; वाचतांना मजकुराचें, मनांत पृथक्करण करावयाचें; कर्त्याची भाषापद्धति व वर्णनाच्या खुब्या वगैरे सर्व टाकून तो काय ह्मणतो, हें अगदीं साध्या शब्दांत मनांत अगर कागदावर ग्रथित करावयाचें. असें करण्याचें कारण भाषेच्या मोहकपणानें किंवा लिहिणाराच्या पेंचांनीं व खुब्यांनीं वस्तुस्थितीसंबंधीं मनावर विपरित ग्रह होऊं नये, हें होय. अशा रीतीनें कागदांतील मजकुराचें पृथक्करण करून जें आपणांस मिळतें, तें कर्त्याचे विचार व त्यानें सांगीतलेल्या ऐतिहासिक गोष्टी, हें होय.

नंतर त्यानें केलेल्या विधानासंबंधीं विचार करावयाचा. त्यानें लिहिलें हें खरें लिहिलें आहे काय किंवा त्यांत चूक अथवा खोटेपणा झाला आहे? कर्त्याचे मनाची स्थिति कशी होती, त्याला खोटें लिहिण्यासारखी परिस्थिति आली होती काय, इत्यादि मागें सांगीतलेल्या प्रश्नांची मालिका मनांत सारखी जागृत असली पाहिजे. प्रथमतः हें जरा चमत्कारिक व जड वाटेल; पण संवयीनें तें लवकरच अंगवळणी पडून त्याचा जडपणा व चमत्कारिकपणा नाहींसा होईल. एवढेंच नव्हे, तर पृथक्करण व बारीक चर्चा ही एक मनाची स्वाभाविक प्रवृत्तीच होऊन बसेल.

---

## भाग १० वा.

### विशेष गोष्टींचा निर्णय.

कर्त्याचे समज बरोबर असोत किंवा चुकीचे असोत व त्यांची वर्णनें कितीही काल्पनिक असोत, त्यांचा आपणांस कांहीं तरी विचार करणें अवश्य आहे. कारण त्यांचे मुळाशीं सत्याचा कांहीं तरी अंश आपणांस सांपडल्याशिवाय राहणार नाहीं. कल्पनेनें आपण अगदीं नव्या गोष्टी उत्पन्न करतों, असें मुळींच नाहीं. त्यांतील मुख्य तत्व खऱ्या गोष्टीपासून-नच घेतलेलें असतें. एखादा ग्रंथकर्ता काल्पनिक वर्णनें लिहितो. तीं त्यानें पाहिलेल्या किंवा त्याच्या अनुभवास आलेल्या खऱ्या व वास्तव गोष्टींपासून रचलेलीं असतात. तो दुसरीं नवीन कोठलीं तयार करणार? काल्पनिक वर्णनांतलें हें बीजभूत असलेलें वास्तव ज्ञानाचें तत्व आपणांस निराळें काढतां येण्यासारखें आहे.

ज्या काळचे कागदपत्र बहुतेक 'नाहीं'च्याच सदरांतले आहेत, उदाहरणार्थ प्राचीन काल. त्या काळची कांहीं ऐतिहासिक माहिती मिळवावयाची असल्यास, त्यास सामुग्री ह्मटली ह्मणजे, त्या काळचें 'वाङ्मय'—काव्यें, नाटकें, कादंबऱ्या इ० होय. ह्या सामुग्रीपासून ऐतिहासिक माहिती गोळा करण्याची पद्धति '**सशास्त्र**' आहे. पण तिला कांहीं सीमा आहे. ती विसरून तिचें उल्लंघन होण्याचा फार संभव आहे. एतदर्थ, तत्संबंधीं कांहीं विचार येथें सादर करितों.

(१) कर्त्यानें केलेलें नैतिक स्थितीचें वर्णन अगर दुसरें कसलेंही वर्णन त्या वेळचे समाजास सर्वस्वी लागू करतां येत नाहीं. तें कदाचित् कर्त्याचें व्यक्तिविषयकही असण्याचा संभव आहे. त्या वर्णनावरून त्या-काळचे सबंध स्वरूप त्या बरहुकूम असेल, अशी कल्पना करण्याला निदान त्या काळचे, त्या ग्रंथकाराचे समकालीन दुसरे ग्रंथकार काय ह्मणतात त्याच्याशीं दुसऱ्यांचें ह्मणणें ताडून पाहींपर्यंत तरी दम धरला पाहिजे.

(२) ग्रंथकर्त्यानें वर्णन केलेली स्थिति कधीं कधीं केवळ कल्पनामय असण्याचा संभव आहे. त्यांतील तत्वें काय तीं खरीं असतात, एवढें आपणांस ठाऊक आहे. एखाद्या कवीनें आपल्या काव्यांत सोन्याचे दरवाजे व रुप्यांच्या ढाली यांचें वर्णन केलेलें आपण वाचलें ह्मणजे, त्यापासून त्यावेळेस खरोखरीच सोन्याचे दरवाजे व रुप्याच्या ढाली होत्या, असें अनुमान आपणांस काढतां येणार नाहीं. दरवाजे, ढाली, सोनें व रुपें यांचें निरनिराळें अस्तित्व मात्र खास होतें, एवढें कायतें निश्चित सांगतां येईल; या पलीकडे खात्रीलायक असें कांहींच सांगतां येणार नाहीं. ह्मणून, कर्त्याच्या अनुभवास आलेली तत्वें पृथक् पृथक् होईपर्यंत आपपण पृथक्करणाची मजल पोंचविली पाहिजे. त्यापासून त्या वेळचे त्या तत्वाचे उपयोगही कळण्याचा आपणांस संभव आहे.

(३) कोणत्याही गोष्टीची अगर कृतीची त्या वेळेस कल्पना होती, एवढ्यावरून तिचें अस्तित्व सिद्ध होईल; पण ह्मणून ती सर्वसाधारण होती, असें कधींही ह्मणतां येणार नाहीं. ती गोष्ट किंवा कृति कदाचित् अद्वितीय अथवा फारच थोड्या लोकांना माहित असणारी असेल. कवी आणि कादंबरीकार यांस जगाच्या अपवादक भागापैकीं आपलीं वर्णनभूत पात्रें घेण्याची फार आवड असते.

(४) अशा पद्धतीनें मिळालेल्या माहितीसंबंधीं कधीं कधीं कालनिर्णय व स्थलनिर्णय करणें कठीण असतें. कर्त्यानें ती माहिती दुसऱ्या देशांतील व दुसऱ्या काळांतील घेतली असण्याचा संभव आहे.

सारांश, कोणत्याही ग्रंथकाराच्या वेळच्या सामाजिक स्थितीचें एखाद्या वाङ्मयात्मक ग्रंथावरून अनुमान काढण्यापूर्वी एखाद्या अर्वाचीन कादंबरीपासून तिच्या समकालीन रितीभातीविषयीं अनुमान करणें कितपत योग्यतेचें होईल, याचा ज्याचा त्यानें आपल्या मनाशीं किंचित् विचार करावा. दुसऱ्या पक्षीं, ग्रंथकर्त्याचीं विधानें. ग्रंथकर्त्यानें केलेलें स्पष्ट विधान त्याचा खरेपणा ठरविण्यास पुरेसें नाहीं. कारण, चूक किंवा लबाडी याचा त्यांत अंतर्भाव होण्याचा संभव आहे. आतां, बारकाईनें चर्चा केली असतां,

अमका एक निश्चित निकाल लागेल, असें कधींही होणार नाहीं. आपणास चुका होऊं द्यावयाच्या नसल्यास, चर्चा करणें अगदीं जरूर आहे. प्रत्यक्ष सत्यप्राप्ति करून देण्यास चर्चा ही अपुरी आहे. चर्चेनें कोणतीही गोष्ट सिद्ध होणार नाहीं. ती अमक्या एका गोष्टीची संभवनीयता सांगूं शकेल. तिचें काम ह्मटलें ह्मणजे, कागदपत्रांचें पृथक्करण करून निघणाऱ्या विधानांवर 'असमंजस', 'संशयित', 'चुकीचें', 'खोटें', 'खऱ्याची संभाव्यता' इ० योग्यतेचे शिक्के ठोकावयाचे.

चर्चेमुळें भ्रामक व चुकीची माहिती उघड्यावर येऊन तिचा नाश होतो. पण तिच्या बदली खरी माहिती आणून बसविण्याची तिची शक्ति नाहीं. चर्चेपासून खात्रीलायक होणारे निर्णय सर्व नकारात्मक असतात. 'असें नाहीं' एवढें मात्र तिला खात्रीनें सांगतां येतें; पण 'कसें आहे' हें तिला सांगतां येत नाहीं. 'कसें आहे,' हें जरी तिला सांगतां येत नाहीं, तरी 'कसें असावें' हें तिला नक्की सांगतां येतें, हें काय थोडें आहे?

जीं विधानें व अनुमानें आपण काढतों, त्यांना पुष्कळ पुरावा असला ह्मणजे त्यांचा उपयोग 'शास्त्रीय ऐतिहासिक ग्रंथ' लिहिण्याचे कामीं करावयाचा. याकरितां निरनिराळ्या पुराव्यांनिशीं एकच विधान खरें ठरल्यावांचून, तें शास्त्रीय रचनेचे कामीं उपयोगाचें नाहीं. पण, जेथें आधार नाहीं व तें एक विधान करणारा तो एकच ग्रंथकार आहे, तर तें आपणांस टाकून देतां येत नाहीं. अमका ग्रंथकार अमुक ह्मणतो ह्मणून तें नमूद करणें भाग आहे. बाकीच्या शास्त्रांत चांगल्या पुराव्यावांचून कोणतीही गोष्ट दाखल करीत नाहींत. तें त्यांचें करणें बरोबर आहे; पण इतिहासशास्त्रज्ञांस तसें करतां येत नाहीं.

दुसरी एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. जर दोन विधानें अगदीं एकसारखीं नसलीं, पण साधारणपणें जवळ जवळ सारखीं असलीं तर, दोहोंमधला ग्राह्यांश घेऊन निराळें आपल्या पदरचेंच तिसरें एक विधान उत्पन्न करणें बरोबर नाहीं. निरनिराळे कागदपत्र निरनिराळ्या नजरेनें

तीच ऐतिहासिक गोष्ट सिद्ध करीत असल्यास, प्रथमतः ते कागदपत्र अगदीं एकमेकांपासून भिन्न आहेत, त्यांचा एकमेकाशीं संबंध नाहीं, किंवा ते एकाच मनुष्यानें लिहिलेले नाहींत, इत्यादि शंकेचें निरसन करून घ्यावें.

**असंभवनीयता,** ही शास्त्रीय कल्पना नव्हे. ती व्यक्तीप्रमाणें बदलण्याचा संभव असतो. साधारणपणें आपला जिच्याशीं परिचय नाहीं, अशी गोष्ट प्रत्येकास असंभवनीय वाटते. एखाद्या शेतकऱ्याला 'टेलिफोन' ह्मणजे केवळ असंभवनीय वाटेल. 'वर्फ' अशी वस्तु अस्तित्वांत असणें संभवनीय नाहीं, असें सयामच्या राजास वाटलें ! ह्मणून कोणती गोष्ट कोणांस असंभवनीय वाटते, हें नक्की कळणें महत्वाचें व जरूरीचें आहे. शास्त्रज्ञानविरहित जनसमूहाला ती असंभवनीय वाटते काय ? असें असेल तर या लोकांची असंभवनीयतेची कल्पना कुचकामाची होय. कारण त्यांना सर्वच असंभवनीय वाटतें. प्रत्यक्ष ज्ञानाची शास्त्रें देखील त्यांस असंभवनीय वाटतात ! शास्त्रीयज्ञानाच्या मनुष्याला असंभवनीय वाटणारी गोष्ट शास्त्राच्या नियमाला विरुद्ध असली पाहिजे. आणि असें जर खचीत असेल, तर ती गोष्ट आपणांस असंभवनीय मानणें भाग आहे. कारण इतिहासाची अप्रत्यक्ष अवलोकनाची पद्धति इतर शास्त्राच्या प्रत्यक्ष अवलोकनपद्धतीहून अर्थात् गौण आहे. आणि जेथें इतिहासाचें व या शास्त्राचें पटणार नाहीं, तेथें इतिहासानें हार खाणें भाग आहे.

---

## उपसंहार.

इतिहास लिहिण्यास मुख्य साधन कागदपत्र होत; परंतु कागदपत्र अस्तित्वांत असणें किंवा नसणें आपल्या स्वाधीनचें नाहीं. तथापि काळाच्या भयंकर तडाक्यांतून जे कांहीं कागदपत्र वांचले असतील ते जमा करून, त्यांवर आपला निर्वाह करणें, हें आपल्या स्वाधीनचें आहे. तर मग, जें आपल्या स्वाधीनचें आहे, तें करण्याचे कामीं आपण कसूर करतां कामा नये; कसूर केल्यास महा दोपास पात्र होऊं.

जसजसा जास्त काळ लोटत आहे, तसतसा कागदपत्रांचा जास्त क्षय
होऊन त्यांचा लोप होत आहे. जे कागदपत्र नाहींसे झाले, त्यांच्या जागीं
नवे येण्याची आशा नाहीं. तेव्हां, जे कांहीं थोडे थोडके कागदपत्र अजून
मिळण्यासारखे असतील, त्यांचा 'सुरक्षित संग्रह' करून त्यांस अगदीं
नीट जपलें पाहिजे. कारण, आपल्या इतिहासशास्त्राची सर्व मदार त्यांच्या-
वर आहे. इतिहासशास्त्राची जास्त प्रगति होण्याची आशा दिसत नाहीं.
कारण, त्यांचा जीव जे कागदपत्र त्यांचा आपणांजवळील भरणा फारच
अल्प आहे, यापेक्षां तो भरणा जास्त होण्याचा संभव नाहीं. सर्व कागद-
पत्र शोधून, त्यांस उपयोगांत आणण्यांत योग्य अशी कृति केल्यावर चर्चे-
चें काम संपलें. प्राचीन काळच्या कागदपत्रांचा आपणांजवळचा संग्रह
अगदीं तुटपुंजा आहे. व एक दोन पिढ्यांतच प्राचीन काळच्या ऐतिहा-
सिक शोधासंबंधीं चाललेल्या प्रयत्नांस विराम पावावें लागणार आहे.
त्या दिशेनें इतिहासकारांची गति कुंठित झाल्यावर त्यांस आतां दिवसें-
दिवस अर्वाचीन काळाचा अधिकाधिक आश्रय घ्यावा लागेल. अशा रीतीनें
एकोणिसाव्या शतकांतील कल्पनेच्या वातावरणांत उंच उंच भरार्‍या मार-
णारांचा इतिहासाच्या अभ्यासासंबंधीं दांडगा आवेश व मनोरथ यांचा
या वस्तुस्थितीच्या वास्तविक ज्ञानानें चुराडा होऊन जाणार आहे!! इति-
हास प्रत्येक जातीच्या व समाजाच्या तळाचा अगदीं ठाव काढील, व
मानवी जातीच्या उत्पत्तीपर्यंत आपण इत्थंभूत माहिती काढीत जाऊं.
या त्यांच्या आशा सफळ होण्याचा बिलकुल संभव नाहीं. कागदपत्रांच्या
अभावामुळें इतिहासाच्यानें हा ठाव काढवत नाहीं; इतकेंच नव्हे, तर
अर्वाचीन काळच्या फारसें पलीकडे जाण्याची देखील त्यास बिलकुल
शक्ति नाहीं. यामुळें या मंडळीच्या कल्पनातरंगांचें वाफीभवन होऊन
त्यांना अंतर्धान पावणें भाग आहे.

दुसर्‍या शास्त्रांप्रमाणें इतिहासशास्त्राची सामग्री इतिहासकार स्वतः
च्या अवलोकनानें जमा करीत नाहीं; मागील शोधकांनी जमा करून ठेव-
केलेल्या माहितीवर तो आपलें काम करतो. इतर शास्त्रांप्रमाणें इति-

हासशास्त्रांतलें ज्ञान प्रत्यक्षरीतीनें मिळत नाहीं, अप्रत्यक्ष रीतीनें मिळतें. इतिहासशास्त्र हें अवलोकनाचें शास्त्र नसून विचारपद्धतीचें व तर्कशक्तीचें शास्त्र आहे.

कोणत्याही ऐतिहासिक गोष्टी खऱ्या मानण्यापूर्वी त्यांची संशोधनाची पद्धति आपणांस ठाऊक नसल्यास त्यास चर्चेची कसोटी लाविली पाहिजे. कागदपत्रांचा शोध, चर्चा व त्यापासून इतिहास लिहिणें, हीं कामें भारी श्रमाचीं आहेत. यास्तव इतिहासशास्त्रांत श्रमविभागाचें तत्त्व चांगलें पाळलें पाहिजे. जे विद्वान् कागदपत्रांच्या शोधांत गुंतले असतील, त्यांनीं सशास्त्ररीतीनें आपलें सर्व काम करून इतिहास लिहिण्यास इतिहासकाराला जय्यत तयारी करून द्यावी. कोणत्याही श्रमाची कमतरता त्यांत ठेवूं नये. जे कोणी या मिळविलेल्या ऐतिहासिक गोष्टींवरून शास्त्रीय पद्धतीनें इतिहासाची रचना करण्यांत गढून गेले असतील, त्यांनीं आपलें काम एकनिष्टपणें करावें. परंतु विशेषतः इतिहासशास्त्राचा ज्यास जास्त अनुभव आला असेल, अशा विद्वानांनीं शोधाच्या कामांत न पडतां इतिहास रचनेच्या अतिशयित महत्त्वाच्या व कठीण कामांत आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा उपयोग करावा, हें इष्ट होय. अनुभविक व शास्त्रीय ज्ञानाच्या लोकांनीं इतिहासरचनेचें काम हातीं घेतल्यामुळें तो चांगल्या शास्त्रीयपद्धतीनें लिहिला जाऊन सामाजिक उत्क्रान्तीसंबंधानें वगैरे काढावीं लागणारीं अनुमानें त्यांचीं पुष्कळ बरोबर निघण्याचा संभव आहे. नवशिक्या लोकांपेक्षां त्याच्या हातून हजारों पटीनें चुकी होण्याचा संभव कमी आहे. अशा रीतीनें तयार होऊन निघणारे इतिहासग्रंथ खरे व शुद्ध शास्त्रीय होऊन, इतिहासशास्त्रास केवळ ललामभूत होणारे आहेत.

ईश्वरकृपेनें असा एक दिवस येईल कीं, ज्या दिवशीं सर्व कागदपत्र शोधून, शुद्ध करून व त्यांची चर्चा करून तयार झालेले आहेत. एकही कागदपत्र बाकी राहिलेला नाहीं; तो दिवस इतिहासशास्त्राच्या केवळ भाग्याचा होय! त्या दिवशीं इतिहासाची स्थापना झाली, असें

ह्मणावयाचें. इतिहासशास्त्राचा आपणांस पुष्कळ दिशेनें उपयोग आहे. परंतु तत्संबंधीं कित्येकांच्या भ्रामक समजुती आहेत, त्यांचा आम्ही निरास केला आहे.

लोकांना रोजच्या आयुष्यांत प्रत्यक्ष उपयोगीं पडणारे व्यवहारिक ज्ञानाचे धडे इतिहासशास्त्रापासून शिकतां येतात, असा कित्येकांचा समज आहे. परंतु हा निव्वळ भ्रम आहे. मानवी कृति एकाच स्थितींत अशा क्वचित् घडतात. तेव्हां इतिहासांत घडलेल्या प्रसंगाबरहुकूम प्रत्यक्ष दुसरा प्रसंग तुमच्या आयुष्यांत घडून त्या वेळीं त्या ऐतिहासिक प्रसंगाचा धडा तुह्मांला उपयोगी पडेल, असा योग येणें संभवत नाहीं. आमचें असें ह्मणणें आहे कीं, ऐतिहासिक ज्ञानाचा प्रत्यक्ष नाहीं, पण अप्रत्यक्ष असा पुष्कळ उपयोग आहे.

सध्यां ज्या गोष्टी आपण पहातों, त्यांचें मूळ कसें आहे व कोठें आहे, याची माहिती आपणांस इतिहासशास्त्र देतें. पण, इतिहासाचे सर्व काळ सारखे मनोरंजक व महत्वाचे नाहींत. कांहीं राजकीय संस्थांचा उगम आपणांस अगदीं प्राचीन काळांत सांपडतो. परंतु त्यांचें हल्लींचें स्वरूप बनण्यास गेल्या शंभर वर्षांतील त्यांची झपाट्याची प्रगतीच कारण आहे. यामुळें, त्यांच्यासंबंधींचा या शंभर वर्षांतला इतिहास जसा मनोवेधक व महत्वाचा वाटेल, तितका मागील वाटणार नाहीं, हें उघड आहे. त्याप्रमाणें समाजाची गोष्ट आहे. गेल्या शंभर वर्षांत सुधारलेल्या व नांवारूपास आलेल्या प्रत्येक समाजाची वाढ व सुधारणा सारखी झपाट्यानें झालेली आहे. यामुळें गेल्या शंभर वर्षांचा इतिहास मागील दहा शतकांच्या इतिहासाहूनही फार महत्वाचा झाला आहे.

सामाजिक व राजकीय शास्त्रांच्या पूर्ततेला इतिहासाचा उपयोग आहे. त्यांचें आजला दिसणारें स्वरूप कसें बनत आलें आहे, याची माहिती ह्मणजे 'इतिहास आपणास जरूर हवा.'

परंतु सर्वांत इतिहासशास्त्राचा गुण हा आहे कीं, तें **मान**
**सुधारणेचें उत्तम साधन** आहे. मानसिक सुधारणेच्या कामीं त
कित्येक दिशांनीं उपयोग आहे. प्रथमतः, ऐतिहासिक शोध करण्य
शास्त्रीय पद्धतीशीं परिचय झाल्यानें मनाचा भोळेपणा, किंवा कोणत
गोष्टीवर सारासार विचार न करतां चट्कन् विश्वास ठेवावयाचा, हा
मानसिक रोग तो नाश पावतो. नंतर निरनिराळे समाज, भिन्नस
चमत्कारिक देशाचार यांची आपणांस माहिती होऊन मन प्रगल्भ व व
होतें. त्याचप्रमाणें समाजांत फेरबदल कसा होत जातो व चाली
कशा बदलत असतात, हें कळून येऊन कालमानाप्रमाणें समाजांत हे
ज्या फेरबदलाविषयीं वाटणारें निरर्थक भय पार नाहींसें होतें. सा
**सामाजिक सुधारणेला इतिहासशास्त्राची फार मोठी मदत आहे.**

समाप्त.

# बुद्धकालपूर्वील हिंदुधर्माचा इतिहास.

आजच्या व्याख्यानाचा विषय ‘ बुद्धकालपूर्वील हिंदुधर्माचा इतिहास ’ हा आहे. हा विषय ऐकून कोणासही सहज वाटणार आहे कीं, इतका व्यापक विषय माझ्यापेक्षां सर्वतोपरी अधिक योग्यतेच्या गृहस्थाच्या हातीं पडला असता तर बरें झालें असतें. मलाही इतकें सांगितल्यावांचून राहवत नाहीं कीं, मी हा विषय घेतला ही मोठी चूक केली. विषय घेण्यापूर्वी त्याचें महत्व आणि आपली योग्यता हीं मी लक्षांत आणलीं नाहींत, हें मी प्रांजलपणें कबूल करितों; पण विषयाची योजना होऊन गेली आहे, त्याअर्थी त्याच्यासंबंधानें जें कांहीं बोलावयाचें तें मी आपल्याला सांगतों.

हल्लीं आपल्याला जिकडे तिकडे असें ऐकूं येतें कीं, आपल्या हिंदु-लोकांमध्यें धर्माविषयीं अतिशय अनास्था उत्पन्न झाली आहे. ज्या लोकांना इंग्रजी तऱ्हेचें शिक्षण मिळालें आहे, अशा लोकांत धर्माविषयीं अश्रद्धा फार वाढली आहे. ज्या लोकांना जुन्या पद्धतीचें शिक्षण मिळालें आहे, अशी आमची शास्त्रीपुराणिक वगैरे मंडळी मात्र धर्मनिष्ठ आहेत, अशी पुष्कळांची समजूत आहे. आमची भिक्षुक मंडळी आणि तदनुयायी आमच्या कुटुंबांतील बहुतेक स्त्रिया या फार धर्मनिष्ठ आहेत, असेंही पुष्कळांना वाटत आहे; आणि आमच्या देशांतील अशिक्षित मंडळीच्या समुदायानें आपला धर्म संभाळला आहे, आणि ते आपल्या-पुढें या संबंधानें सुशिक्षित लोकांस खालीं पहावयास लावीत आहेत, अशी पुष्कळांची खात्री आहे.

या धर्मसमजुतींत खरेपणा कितपत आहे याची निवड करण्याचें काम मी आपणांकडेसच सोंपवितों. इतकी गोष्ट खरी आहे कीं, आमच्या लोकांनीं विशेषतः सुशिक्षित लोकांनीं यासंबंधानें

फारच अनास्था दाखविली आहे. राष्ट्रीय आणि सामाजिक विषयांकडेच त्यांचा कल फार आहे. धर्माची अथवा धर्मसंबंधीं विशेष विचार करण्याची त्यांना फारशी अवश्यकता वाटत नाहीं असें दिसतें. ही अनास्था फार घातुक आहे. या विषयाचें किती महत्व आहे हें दाखविण्याकरितां मी आपल्यापुढें इतके प्रश्न ठेवितों. आपण सर्व हिंदुधर्माचे अभिमानी आहों; पण आपल्याला जर कोणी विचारिलें 'कायहो, तुमचा हिंदुधर्म ह्मणजे काय? त्याचीं मूलतत्वें कोणचीं आहेत? कोणचीं तत्वें त्यांत व्याप्तिवाचक आहेत? तुमचा देव कोणता? तुमचा धर्मग्रंथ कोणता?' इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें आपल्यापैकीं किती जणांना देतां येतील बरें? या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें मी धाडस करीत नाहीं.

आर्यसमाज, प्रार्थनासमाज, आदिब्रह्मसमाज इत्यादि ज्या संस्था आपल्यांतील मोठमोठ्या नामांकित पुढारी मंडळींनीं हिंदुधर्माचा प्रसार होण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणीं काढल्या आहेत, त्यांसंबंधानें आपलें किती तरी अज्ञान आहे? यांत हिंदुधर्माचा प्रसार होतो अगर दुसऱ्या एखाद्या विसंगत धर्माचा होतो, याची माहितीसुद्धां फारच थोड्यांस असेल. हें आपलें औदासिन्य पाहून दुसऱ्या जातींच्या (विशेषत: युरोपियन) लोकांस मोठें आश्चर्य वाटत असेल यांत संशय नाहीं. आपल्या धर्माचें स्वरूप जाणण्याची इच्छा झाली, तर तें कोणच्या ग्रंथांतून पहावें याचीही पंचाईत पडते. पाश्चात्य लोकांनीं आमच्या वेदांच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या छापून काढाव्या, आमच्या धर्माचें जें उन्नत स्वरूप त्याची, व्याख्यानरूपानें वाखाणणी करावी, आमच्या धर्मग्रंथांचीं पारायणें करून त्यांतील रहस्यें आह्मां हिंदुलोकांना सांगावीं, आणि आह्मीं निरंतर सनातन धर्माची कोरडी शेखी मात्र मारावी; जे कोणी धर्मसंबंधीं विचार करून, ते विचार निर्भीडपणें लोकांपुढें मांडतात त्यांना सुधारक, धर्मलंड, इत्यादि कुत्सित नांवें द्यावीं; 'पाहिलें युरोपियन लोकसुद्धां आमच्या धर्माची कशी वाखाणणी करितात ना! नाहींतर आमचे सुधारक' अशा आनंदानें उड्या माराव्या, मग

ती वाखाणणी कशाबद्दल व कोणच्या काळाबद्दल हें माहिती नसलें तरी चालेल; यापेक्षां आणखी खेदास्पद अशी एखादी गोष्ट असेल असें मला वाटत नाहीं. आपल्या स्वातंत्र्याबरोबर आपल्या मानसिक शक्तींचा ऱ्हास झालेला आहे, आणि धर्मसंबंधीं नुसता विचार करण्यासही आमचें मन आह्मांला सांगत नाहीं, येथपर्यंत आह्मीं उलट खाली आहे. आतां आपण प्रस्तुतच्या विषयाकडे वळूं.

आर्यधर्माचा इतिहास ह्मणजे आर्यांचा इतिहास असें ह्मटलें असतां चालेल. हा इतिहास सुमारें ३००० वर्षांचा आहे. या एवढ्या कालाचे, स्थितिमानानें ६ भाग आपोआपच पडले आहेत, निदान या देशच्या इतिहासकारांनीं तरी पाडले आहेत. पहिला काल इसवी सनापूर्वी २००० वर्षांपासून १४०० पर्यंत ह्मणजे ६०० वर्षें. याला वैदिक काळ अशी संज्ञा आहे. दुसरा काल ह्मणजे इ० स० पू० १४०० पासून, १००० पर्यंतचा ह्मणजे ४०० वर्षांचा. याला महाभारत काळ ह्मटलें तरी चालेल. तिसरा काल १००० पासून २४२ साल-पर्यंत ह्मणजे ७५८ वर्षांचा. याला सूत्रकाल ह्मटलें असतां चालेल. इसवी सनाच्या पूर्वी २४२ सालीं अशोक राजानें बुद्धधर्माची राष्ट्रीय धर्म या नात्यानें स्थापना केली आणि तेव्हांपासून तो इसवी ५०० पर्यंत बुद्धधर्माची हिंदुस्थानांत सरशी होती. आणि ह्मणून या सुमारें ७५० वर्षांच्या कालाला इतिहासकारांनीं बुद्धकाल अशी संज्ञा दिली आहे. तेव्हांपासून मुसलमान लोकांनीं आपला देश काबीज करीपर्यंत ह्मणजे सुमारें इ० स० १००० पर्यंत हिंदुधर्मानें पुनरुज्जीवन झालें असें ह्मटलें असतां वावगें होणार नाहीं. या कालाला हिंदुधर्माचा पुनरुज्जीवनकाल अशी संज्ञा दिली असतां ठीक होईल. मुसलमानी राज्याच्या उन्नतीपासून ह्मणजे सन १२०० पासून १७५० पर्यंत शेवटला भाग समजावा. या शेवटल्या सालापासून तर तहत आतां-पर्यंत आपला इंग्रजांशीं आणि इतर पाश्चात्य राष्ट्रांशीं सख्यसंबंध जडलेला आहे. वेदिक कालापासून आजपर्यंत जे सहा भाग सांगितले, त्या प्रत्येक काळांतील लोकस्थिति, त्यांचे सामाजिक आणि धर्मसंबंधी

विचार, त्यांचे धर्मग्रंथ व त्यावेळचे इतर ग्रंथ या सर्वांना त्या त्या कालानुरूप निरनिराळें वळण लागलेलें दिसतें. आणि ह्मणून प्रत्येक काळाच्या लोकस्थितीची माहिती सांगितली असतां, त्या त्या वेळचें धर्माचें स्वरूप सांगणें फार सुलभ होईल.

आतां पहिला काळ ह्मणचे वैदिक काळ. हल्लीं जे वेद आपणांत उपलब्ध आहेत, त्यांतील फार प्राचीन जो ऋग्वेद तो ऋषींनीं या काळीं लिहिला असावा, असा इतिहासकारांनीं सिद्धांत काढल्यावरून, याला वैदिक काळ हें नाव दिलें आहे. आर्य लोकांची एक शाखा हिंदुस्थानच्या वायव्य प्रांतांत अथवा पंजाबांत येऊन तिनें तेथील रहिवाशांना जिंकिलें, व त्या मुलुखांत तळ दिला. सतलज नदीच्या आलीकडील हिंदुस्थानची माहिती त्या वेळेस त्यांना बिलकुल नव्हती, असें दिसतें. गंगा, यमुना यांचीं नावें क्वचित् स्थळींच ऋग्वेदांत दृष्टीस पडतात. त्या वेळच्या लोकस्थितीचें चित्र बऱ्याच अंशानें आपल्या दृष्टीसमोर उभें करण्यास वेदांशिवाय दुसरें उपलब्ध साधन नाहीं. मूळ रहिवाशांचा मुलूख मिळविण्याची हांव धरणाऱ्या ऋषींचीं वचनें त्यांना अनुरूप अशींच आहेत, यांत नवल नाहीं. ज्यावेळीं जातिभेद ह्मणचे आर्य आणि अनार्य एवढाच फक्त माहित होता, त्यावेळेस अमुक धंदा अमक्यानें करावा असा निर्बंध आणि तद्वाचक जातिशद्ब यांचा उदयही झाला असेल नसेल. ज्यानीं द्रव्य संपादन करावयाचें, शेतकी करावयाची, मोठमोठ्या गोधनांचें व पशूंच्या कळपाचें स्वामित्व संभाळावयाचें, त्यांनींच वेळ पडल्यास हातीं शस्त्र घेउन लढाईला जावयाचें, आणि दुसरे धंदे आटपून राहिल्या वेळांत ईश्वराच्या भक्तिपर ऋचा करावयाच्या, याबरून ही गोष्ट उघड दिसेल. स्वातंत्र्य आणि स्वातंत्र्याचा अभिमान त्या लोकांत पूर्णपणें दिसत होता. या वेळच्या आपल्या पूर्वजांचा धर्म काय होता, आणि त्यांचीं धर्माचीं तत्वें काय होतीं, याचें अनुमान करण्यास वेदग्रंथांशिवाय दुसरा मार्ग नाहीं. तेव्हां त्या ग्रंथांवरून इतिहासकारांनीं आणि इतर शास्त्रज्ञांनीं धर्मासंबंधीं जे विचार प्रकट केले होते. ते मी आपणास सांगतों. यासंबंधानें एका

गोष्टीचा निर्देश केल्यावांचून माझ्याच्यानें राहवत नाहीं. प्रत्येक राष्ट्रांतील लोकांच्या समजुतीप्रमाणेंच आपले वेदग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत, अशी पुष्कळांची समजूत, निदान श्रद्धा आहे. वेदांचें अपौरुषेयत्व प्रस्थापित करण्याकरितां हजारो पंडितांनीं आपलीं आयुष्यें खर्ची घातलीं आहेत. आपल्या भाषेंत वेदांस श्रुतिग्रंथ ह्मणतात. ह्मणजे ईश्वरानें ऋषींना स्वतः सांगितलेले आणि त्यांनीं ऐकून लिहिलेले ग्रंथ. वास्तविक पाहतां असल्या वादांत पडणें ह्मणजे फुकट वेळ घालविणें आहे. पदार्थविज्ञानशास्त्रांच्या नियमाप्रमाणें आणि आधुनिक शास्त्रज्ञांच्या मतानें ही गोष्ट संभवनीय नाहीं. आपल्या धर्मशास्त्रकारांच्या मतानें वेदांचें अपौरुषेयत्व अगदीं निर्विवाद आहे. खुद्द ऋग्वेदांतही दोन्ही प्रकारचे दाखले आहेत, ज्याप्रमाणें रथकारानें रथ तयार करावा, अथवा वस्त्रकारानें उत्तम वस्त्र तयार करावें, त्याप्रमाणें ईश्वराला संतुष्ट करण्याकरितां आह्मीं हें गीत तयार केलें आहे, असें ऋषींनीं ऋग्वेदांत स्पष्ट ह्मटलें आहे. तसेंच ऋचांना ‘ देवदत्तम् ’ अशीही संज्ञा दिलेली आढळते. याविषयीं माझें आपणास इतकेंच ह्मणणें आहे कीं, हा वाद तडजोडीनें मिटण्यासारखा आहे. ह्मणजे प्रत्येकानें थोडथोडें मागें सरलें पाहिजे, व दुसऱ्याचें ह्मणणें कबूल केलें पाहिजे. आपल्या धर्मशास्त्रकारांना इतकी गोष्ट कबूल करणें भाग आहे कीं, ईश्वर आपल्या हातानें धर्मग्रंथ ऋषींच्या हातांत द्यावयाला आला नाहीं. ईश्वरानें आपलें दर्शन स्वरूपतेनें कोणासही दिल्याचें प्रमाण अथवा त्याबद्दलचा पुरावा आधुनिक शास्त्रज्ञांच्या मतें अगदीं पुरेसा नाहीं. तसेंच शास्त्रज्ञांनीं हें कबूल केलें पाहिजे, कीं, ज्यांनीं गायत्री मंत्रासारखे उदात्त मंत्र निर्माण केले, त्यांची आणि साधारण माणसांची तुलना करून उपयोग नाहीं. उदात्त, निर्मळ, आणि पवित्र असे विचार मनांत येऊन त्यांचा प्रवाह ज्या ऋषींच्या वाणींतून बाहेर आला आहे, त्यांनीं आपलें असामर्थ्य कबूल करून, ईश्वरानेंच आपल्या मनांत हे विचार उत्पन्न केले. असा हवाला ईश्वरावर टाकणें अगदीं स्वाभाविक आहे. ‘ कर्ता करविता तोचि एक ’ ही कल्पना त्यांचे मनांत येणें, आणि ती स्वाभाविकपणें लोकांपुढें सांगणें, आणि आपल्या कृतीचे कर्ते आपणच आहों असें क्षणभर विसरणें, हा उन्नत विचारांच्या

मनुष्यांचा स्वाभाविक गुणच आहे. यावरून आपली खात्री होईल कीं, श्रुतिग्रंथ अथवा खरें ह्मटलें ह्मणजे त्यांतले फारच थोडे भाग, ईश्वर-कथित किंवा ईश्वरप्रणीत नाहींत, तथापि त्यांना ईश्वरप्रणीत ह्मटलें असतां मोठा प्रमाद होणार नाहीं. आपला पराधीनपणा कबूल करून, सर्व कर्मांचा भार ईश्वरावर अर्पण करणें हा सर्व धर्मांचा, मग ते जुने असोत, अगर अर्वाचीन असोत, आधारस्तंभ ह्मटलें असतां चालेल.

वैदिक कालच्या ऋषींनीं ज्या देवतांचें आवाहन केलें आहे, त्यांपैकीं मुख्य अग्नि, मित्रावरुण, उषा, इंद्र, वरुण, यम, अदिति, पूषन् अथवा विष्णु, सरस्वती, अश्विनीकुमार आणि द्यौ. या देवतांच्या नांवावरूनच आपणांस कळून येईल कीं, वैदिक कालचा ऋषींचा धर्म ह्मणजे बाह्य-सृष्टीच्या नानाविध विभूतींची आराधना. या सृष्टींतील नानाविध चमत्कारांचें अवलोकन करून सहजीं ज्या ज्या कल्पना मोकळ्या मनाच्या मनुष्याच्या अंतःकरणांत येणें स्वाभाविक आहे, त्याच कल्पना त्या-वेळच्या ऋषींच्या मनांत आल्या, यांत कांहींच नवल नाहीं. ज्या विस्तीर्ण छताखालीं आपण वास करितों, तें नभोमंडळ, ज्याच्या प्रकाशा-मुळें आपण सर्व कारभार करितों, असा तेजस्वी देदीप्यमान मरीचिमाली सूर्यनारायण, उज्वल आणि रक्तवर्ण महावस्त्र परिधान केल्याप्रमाणें आनंद देणारी उषा, आपल्या प्रभावानें मोठमोठे वृक्ष उन्मूलन करणारा आणि आपल्या प्रभावानें मनुष्यमात्राच्या मनांत भीति उत्पन्न करणारा झंझावात, शीतनिवारक व यज्ञयागांना अवश्यक असा अग्नि, इत्यादि सृष्ट पदार्थांच्या विभूतींमुळें आनंद आणि भय पावून त्यांनीं आपणावर रुष्ट होऊं नये व आपल्यावर कृपा करावी, अशाप्रकारचें स्तवन करण्यास मनुष्याचें मन सहजीं प्रवृत्त झालें असेल. नसतें झालें तर आश्चर्य. तसेंच सूर्यचंद्राचें नियमित आगमन व गमन, नक्षत्रांचें वेळेवर उगवणें, ऋतूंची परंपरा, इत्यादि सर्व सृष्टींतील नियम पाहून त्याचे कोणी तरी नियंते असतील अशी कल्पना करून कोणी इंद्राला मानणें, कोणी सूर्याला मानणें, कोणी पृथ्वीला मानणें हें स्वाभाविकच होय. या सर्व देवतांमध्यें इंद्र आणि वरुण या प्रधान देवता ऋग्वेदांत

नानल्या आहेत. इंद्र हा आपल्या प्रभावानें पाऊस पाडतो अशी समजूत असल्यामुळें, इंद्राला सर्व देवतांमध्यें त्यांनीं अग्रेसरत्व दिलें आहे. ' वरुण ' हा शब्द ' वृ = आच्छादन करणें ' या धातूपासून निघाला आहे, त्याचा अर्थ आच्छादन करणारा असा आहे. रात्रीच्या आकाशाला वरुण हा शद्ब ऋग्वेदांत आढळतो. दिवसाच्या आकाशाला मित्र अशी संज्ञा आहे. यावरून आपणास दिसून येईल कीं, हल्लीं जीं आपलीं प्रधान दैवतें आहेत, त्यांतील कोणालाही त्यावेळीं प्रधानस्थान नव्हतें. विष्णु, शंकर, ब्रह्मा आणि रमा, उमा, सावित्री यांच्यापेक्षां इंद्र आणि वरुण, सरस्वती आणि उषा हे श्रेष्ट मानले जात होते. वैदिक कालांत विष्णु याची पूजा सूर्य ह्मणून करीत होते. हल्लीं जें विष्णूला महत्व मिळालें आहे, तें वैदिककाळांत नव्हतें. अग्नीपेक्षां त्याची ज्यास्त योग्यता मानीत नव्हते. या देवतांचे तीन विभाग यास्कांनीं केले आहेत. पहिला विभाग भूलोकस्थ देवता ह्मणजे पृथ्वी, अग्नि, सरस्वती इत्यादि. दुसरा अंतरिक्षांतील देवता ह्मणजे इंद्र, मरुत्, वायु, पर्जन्य इत्यादि. आणि तिसरा नभोमंडळांतील देवता ह्मणजे सूर्य किंवा पूषन्, द्यौः, वरुण इत्यादि. तीनपासून तेहतीस कोटींपावेतों हल्लीं देवतांचीं संख्या गेली आहे.

ऋग्वेदांत एक देव सर्वांहून श्रेष्ठ किंवा कांहीं देव बाकी देवांहून श्रेष्ठ अशी कल्पना फारशी नव्हती. जरी इंद्र, वरुण, द्यावापृथिवी, किंवा पूषन् या देवतांस बऱ्याच ठिकाणीं प्रधानत्व दिलें आहे, तथापि तें प्रसंगानुरूपच आहे असें दिसतें. ज्या विभूतीची आराधना करावयाची त्या विभूतीला या वेळीं सर्व अन्य विभूतींपेक्षां अग्रस्थान द्यावयाचें, अथवा ज्या ऋषीला जी विभूति विशेष वाटेल, त्यानें तिला बाकीच्या सर्व देवतांपेक्षां श्रेष्ठ करून ठेवावयाचें इतकाच त्यांत अर्थ दिसतो. अशाप्रकारच्या धर्माला इंग्रजींत ' हेनोथीइझम् ' किंवा पृथक् देवतापूजा ही संज्ञा दिली आहे. सरस्वती, पर्जन्य, वायु इत्यादि कांहीं देवतांवरून असेंही अनुमान करण्यास जागा आहे कीं, देवता या शद्बानें फक्त गीतविषय आणि ऋषी या शब्दानें फक्त गीतकर्ता

इतकाच अर्थ मानला जात होता. प्रत्येक देवता ह्मणजे ईश्वरवाचकच समजली जात होती, असें नाहीं.

वेदांच्या संबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे आणि ती ही कीं, वेदांमध्यें एक ठाम निश्चित धर्माचें प्रतिपादन केलें नाहीं. कांहीं ऋषींनीं बाह्य सृष्टीच्या विभूतींपलीकडे, आपल्या कल्पनेनें भरारी मारली आहे, आणि या सृष्ट विभूती कोणी तरी निर्माण केल्या अशी त्यांची कल्पना होऊन त्या करणाऱ्यांकडे त्यांचें लक्ष लागलें. वेद ह्मणजे एकाच ऋषीनें एकाच वेळीं एकाच ठिकाणीं प्रसिद्ध केलेला आणि लिहिलेला ग्रंथ नसून अनेक ऋषींनी निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या देवतांप्रीत्यर्थ केलेल्या स्तुतिपर स्तोत्रांचा एक समुदाय आहे. तेव्हां असा समुदाय ह्मणजे सुमारें ४०० वर्षांचा मनुष्याच्या कल्पनांचा व मनाच्या प्रगतीचा इतिहासच आहे, असें ह्मटलें असतां चालेल. अगदीं प्रथमतः बाह्यसृष्टीच्या सौंदर्याला भुलून व सृष्टीच्या नानाविध स्वरूपांनाच देवता मानून राहणाऱ्या लहान मुलांसारख्या निःशंक आणि निर्मल मनाच्या प्रवृत्तीपासून तों सृष्टीच्या बाह्य जवनिकेच्या आंत प्रवेश करून या बाह्यस्वरूपाविषयीं उदासीन झालेलें आणि हीं स्वरूपें ज्याचीं आहेत, त्या जगदाधार जगन्नियंत्याकडे लक्ष लागून प्रौढ जिज्ञासुवृत्ति धारण करणारें उदात्त आणि शंकाकुल मन, या सर्वांपर्यंत एकट्या ऋग्वेदांत मानवी विचाराची मजल पोंचली आहे. ऋग्वेदसंहितेचें अध्ययन करून या देशाच्या आणि पाश्चात्य पंडितांनीं त्यावेळच्या लोकस्थितीसंबंधानें जीं कांहीं ठळक विधानें केलीं आहेत, तिकडे आपण वळूं:—

१ ऋग्वेदांत मूर्तिपूजेचा उल्लेख दिसत नाहीं. वेदांत कोठेंही देवळें किंवा त्यांत स्थापन केलेल्या मूर्तींची पूजेसंबंधानें चर्चा केलेली नाहीं. प्रत्येक गृहस्थानें आपल्या घरीं अग्नि सिद्ध करावा, आपल्या स्त्रियेच्या मदतीनें सोमरस तयार करावा, आणि त्या सोमरसानें अग्नीला आहुति देऊन अन्य ऋषिप्रणीत अथवा स्वकपोलकल्पित स्तोत्रांनीं देवांची आराधना करावी; व या ऐहिक सुखांची, ह्मणजे धनधान्य, पुत्रपौत्र, पशु-

समृद्धि इत्यादिकांची आपणास प्राप्ति व्हावी, ह्मणून तदधिष्ठित देवतांपाशीं मागणी करावी, हीच त्यावेळच्या ईश्वराराधनेची पद्धति होती. धातुनिर्मित अगर पाषाणनिर्मित नानाविध आकृती करून, त्यांमध्यें प्राणप्रतिष्ठा करून, त्या मूर्तींमध्यें दैविकशक्ती आहेत, असें मानून त्यांची पूजा करण्याची कल्पना वैदिक ऋषींच्या मनांत मुळींच नव्हती असें दिसतें.

२ या निर्दिष्ट केलेल्या काळांत जातिभेद नव्हता. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार जातींचा उदय अद्यापि झाला नव्हता. क्षत्रिय शद्ब आढळतो, पण तो जातिवाचक नसून शूर वीर असा गुणवाचक आहे. विप्र आणि ब्राह्मण हे शद्बही जातिवाचक नसून, शाहणे आणि ऋचा करणारे या अर्थी गुणवाचक होते. विश्वामित्र, वसिष्ठ, इत्यादि स्तोत्र करणाऱ्या ऋषींची जात अमुक होती, हें ठरविण्यांत पुष्कळांनीं पौराणिक काळांत मेहनत केली आहे. परंतु वास्तविक पाहतां तो ब्राह्मणही नव्हता, आणि क्षत्रियही नव्हता. जातिभेदापूर्वीच्या काळांतील तो एक ऋषी होता, इतकें ह्मणणें जास्त सयुक्तिक दिसतें. जातिभेद वैदिक काळांत मानिला नव्हता, असें ह्मणण्यास दोन्ही प्रकारचा पुरावा आहे. एक तर या ६००।७०० वर्षांतल्या ऋचांमध्यें लोकस्थितीचा ह्मणजे कृषिकर्म, लग्नविधि, स्त्रियांची स्थिति, ज्योतिषादि शास्त्रें या सर्वांचा उल्लेख असून, जातिभेदासंबंधानें कोठेंही उल्लेख नाहीं. ऋग्वेदासारख्या २०००० कवितांच्या संग्रहामध्यें कोठेंही जातिभेदाचा नामनिर्देश नाहीं. अशी गोष्ट, जातिभेद प्रचारांत असता तर कधींही संभवली नसती. एवढाच पुरावा वास्तविकपणें बस आहे. तथापि याहीपेक्षां दृढतर पुरावा सुदैवानें वेदांतच सांपडतो. एका ऋषीनें आपली पीठिका ऋग्वेदाच्या नवव्या मंडळांत सांगितली आहे. ती अशी ' पहा. मी एक ऋचाकार आहे. माझा पिता वैद्य आहे, आणि माझी माता दळणकांडण करणारी आहे. ज्याप्रमाणें एकाच कुरणांत अनेक गाई अनेक दिशांनीं जातात, त्याप्रमाणें आह्मी अनेक धंदे करीत आहों, इ. ' ह्या वेळचे ऋषी ह्मणजे सर्वसंगपरित्याग केलेले एकाच आश्रमांत खिळलेले नसून, ऐहिक व्यवहारांत मग्न असत.

वेळेस लढाईला तयार, वेळेस शेतकी करण्यास तयार, आणि वेळेस ईश्वरस्तुतिपर स्तोत्रें करण्यांत तयार, असे होते. सर्व लोकांशीं त्यांचा आहारव्यवहार व बेटीव्यवहार होता. आतां कांहीं ऋषी फार विद्वान् असल्यामुळें त्यांना इतर लोक यज्ञ करण्याचेवेळीं आपल्या येथें बोलावून द्रव्य वस्त्रें वगैरे देत असत. परंतु त्यामध्यें जातीचा संबंध नसून, फक्त त्यांच्या जास्त विद्वत्तेमुळेंच त्यांना द्रव्य आणि मान मिळत होता, असें दिसतें.

त्यावेळच्या स्त्रियांच्या वर्णनावरून त्यांपैकीं पुष्कळ स्त्रिया पुरुषांप्रमाणेंच शिक्षित असून कांहींची मजल स्वतः ऋचा रचण्यापर्यंत पोहोंचली होती. विश्ववरेसारख्या पवित्र साध्वीचीं नांवें आपल्याला वैदिक ऋषींत दृष्टीस पडतात. स्त्रियांनीं लग्न केलेंच पाहिजे असा निर्बंध त्या वेळेस दिसत नाहीं. पुष्कळ स्त्रिया आमरणांत अविवाहित राहून आपल्या विद्येनें, सौजन्यानें आणि सहवासानें आपल्या पित्यांचीं घरें उज्वल करीत होत्या. त्यावेळीं स्वयंवराची चाल होती, असें ह्मणण्यास आधार आहे. तथापि मुलींचीं लग्नें करण्याचें काम मुख्यत्वेंकरून त्यांच्या मातापित्यांवर आणि इतर पालकांवरच होतें, असें स्पष्ट दिसतें. स्त्रियांच्या शरीराची वाढ हीच त्यांच्या विवाहकालची इयत्ता होती असें दिसतें. अगदीं अल्पवयीं लग्न करणें त्या वेळच्या ऋषींना संमत होतेंसें दिसत नाहीं. मेलेल्या पतीबरोबर सहगमन करणें अथवा सती जाणें हेंही धर्मसंमत आहे, असें आढळून येईल.

९ मनुष्य मेल्यानंतर त्याचा दहनविधि करण्याची चाल होती, असें दिसतें. तसेंच कांहीं प्रसंगीं मनुष्यांस पुरण्याची चाल त्या वेळेस होती. मनुष्य मेल्यानंतर त्याला पारलौकिक सुख मिळतें, अशी कल्पना वैदिक ऋषींच्या मनांत हळू हळू उत्पन्न झाली असें दिसतें. यमधर्म हा त्यावेळीं मृतमानवांची अधिष्ठात्री देवता होती. परंतु त्यावेळीं यमधर्म म्हणजे रेड्यावर बसणारा, अति विक्राळ रूप धारण करणारा, मनुष्यांचा अंत करणारा यमपुरीचा राजा नसून, स्वर्गाचा राजा ही कल्पना

होती. त्याची आराधना भयप्रेरित नसून आनंद आणि भक्तिप्रेरित अशी होती.

६ अवतार घेऊन देव आपलें सांनिध्य सर्व लोकांना भासवितो, ही कल्पना वेदकालीं नव्हती. त्यांच्या मतानें ईश्वर हा चांगल्या सन्मार्गवर्ती मनुष्यावर अनुग्रह करितो, आणि कुमार्गवर्ती मनुष्यांस दंड करितो. तो पापी जनावरही समदृष्टीनें पाहणारा आहे.

७ मनुष्य पापी आहे, ही कल्पना आणि ईश्वर हा पापिजनांनें पाप नाहींसें करण्यास समर्थ आहे ही कल्पना वेदांवरून आढळते. तसेंच देवाविषयीं आस्तिक्यबुद्धि, त्याच्या दयाळूपणाविषयीं, त्याच्या सामर्थ्याविषयीं त्याच्या रक्षणक्षमतेविषयीं पूर्ण श्रद्धा हींही त्यामध्यें आढळतात. आणि पुढें त्या श्रद्धेच्या बाजूनेंच त्याच्या आस्तित्याच्या सत्याबद्दल स्वाभाविक शंकाही वैदिक ऋषींच्या मनांत उत्पन्न झाल्या सारखी दिसते. ऋग्वेदाच्या ८व्या मंडळांत एका ऋषीनें एका गृहस्थास सांगितलें ' बाबारे, तुला जर शक्ति पाहिजे असेल, तर इंद्राचा स्तव कर. पण हें सर्व इंद्र असल्यास ठीक. कोणी म्हणतात इंद्र आहे कशावरून? त्याला कोणी पाहिला आहे? तर मग आम्ही कोणाची आराधना करावी? ' असें शंकाकुल कवीचें मन पाहून इंद्र जणू स्वतः त्या कवीच्या मार्फत आपल्या भक्तांला सांगतो ' ए बा भक्ता! हा मी आहे. माझ्याकडे पहा. मी शक्ति आणि सामर्थ्य यांत सर्वांहून श्रेष्ठ आहे.' तात्पर्य या ऋचेवरून, कवीचें मन ईश्वराविषयीं साशंक झालें, आणि पुनः त्या शंकेचें समाधान त्यानें त्यानेंच करून घेतलें.

८ अगदीं पूर्वीपासून हिंदु लोकांचा, आपले मेलेले पितर हे हा लोक सोडिल्यानंतर सदेहपणें दुसऱ्या लोकांत म्हणजे या यमलोकांत राहतात असा विश्वास बनून राहिला आहे. तेव्हां पितरांनीं आपल्याला योग्य वेळेला सल्लामसलत द्यावी व आपणावर अनुग्रह करावा या करितां पितृपूजा किंवा पितृयज्ञ याचा प्रचार अगदीं ऋग्वेद कालापासून आहे

असावा. जसे जसे आपले पितर वरवरचे होत जातील, तसतसा त्यांचे अंगीं अलौकिकपणा ज्यास्त येत जातो व त्यांस देवांचे पंक्तीस बसवि- ण्यास हरकत नाहीं, अशी समजूत आर्य लोकांची होत गेली.

तथापि या कालीं श्राद्धाची कल्पना आली नव्हती. जशी सृष्टीच्या विभूतींची पूजा प्रचारांत होती, त्याचप्रमाणें वैदिक देवतांबरोबर पितृ- देवतांनाही अग्नीची आहुति देऊन, त्यांचें संतर्पण करणें ही साधी कल्पना त्यावेळीं होती.

तेव्हां ऋग्वेदकालच्या हिंदुधर्माचीं अंगें ह्मणजे सृष्टीच्या नानाविध विभूतींची आराधना, आपल्यावर अनुग्रह करण्याची आणि आपल्याला पापविमुक्त करण्याची देवतापितरांची क्षमता यांमध्यें अंतर्भूत आहे, असें ह्मटलें असतां चालेल. आणि या देवतांचें आवाहन, मूर्तिमार्फत न करितां, अग्नींत आहुति टाकिली असतां तो सर्वांस ती पोंचवितो. ह्या समजुतीमुळें यज्ञानें सर्वांचें संतर्पण करणें व त्या संतर्पणाचे वेळीं जीं आपणांस स्तुतिपर गीतें सुचतील तीं ह्मणणें व ऐहिक सुखें आपणांस पाहिजे असतील तीं घेणें असें होतें.

वैदिक काळांतील कवितांमध्यें प्राण्याला अनेकवेळां पशुतिर्यक् योनींतून परिभ्रमण करावें लागतें, ही कल्पना दिसत नाहीं. आली- कडील हिंदुधर्माप्रमाणें ही जन्मपरंपरा प्रत्येक प्राण्यास त्याच्या पापपुण्या- प्रमाणें भोगावी लागते; तथापि वैदिकधर्मांत सर्व धर्माचा आधारस्तंभ असा जो मोक्षावर विश्वास तो दृष्टीस पडतो. प्राणिमात्राला त्याच्या सत्कृतीनें अमरत्व मिळूं शकतें, आणि जन्ममरणाच्या परंपरेंतून तो चांगल्या कर्मानें सुटूं शकतो. ह्या सिद्धांतावर वैदिक ऋषींचा विश्वास होता. आपला आत्मा अमर आहे, आणि आपल्याला सदैव अमरत्व मिळूं शकेल ही कल्पना त्यांच्या मनांत पूर्णपणें ठसली होती. चांगलीं कर्में केलीं ह्मणजे त्याला स्वर्गांत सुख प्राप्त होतें आणि त्याच्या सर्व प्रकारच्या इच्छा परिपूर्ण होतात हे विचार धर्मदृष्ट्या मोठे आवश्यक आहेत. पापाचरण केलें असतां आपणांस दंड होईल हीही कल्पना त्यावेळेस होती. आपल्या पापपुण्याचा झाडा ईश्वरापाशीं द्यावा लागतो,

आणि त्याप्रमाणें परलोकीं आपणाला सुख किंवा दुःख भोगावयाला लागतें ह्या कल्पनेनें जगांतील बहुतेक धर्माचे लोक आपल्या आचरणाची खबरदारी घेत आहेत व पापनिवृत्त होत आहेत असें सांगितलें ह्मणजे, या कल्पनेचें धर्माच्या बाबतींत किती महत्व आहे तें कळेल.

आतां सांगितलेल्या एकंदर गोष्टींवरून आपल्या ध्यानांत येईल कीं, वैदिक ऋषींचा धर्म ह्मणजे फार सरळ, साधा, आपल्याला संकटांत धीर देणारा असून त्याच्या भोंवतीं क्रियाकर्माचें आणि इतर गोष्टींचें अवडंबर जमलें नव्हतें. ऋग्वेदांतील पुष्कळ कविता अशा आहेत कीं, त्या १९व्या शतकांतील शास्त्रानुयायी मंडळीस वेडगळच वाटणार. पुष्कळ विचार कोते आहेत. कांहीं ऋषींनीं देवाच्या ठायीं कांहीं अयोग्य आणि आपल्या कल्पनेला विरुद्ध अशा कामक्रोधादिक गुणांचा आरोप केला आहे. यज्ञापासून त्यांना फार आनंद होतो, आणि ते यज्ञाकरितां अगदीं उद्युक्त आहेत, अशी कल्पना केली आहे; परंतु जशा एखाद्या रम्य उपवनांत सर्वच फुलें सुवासिक नसून तीं वेंचावीं लागतात, त्याप्रमाणें या विस्तीर्ण ग्रंथोद्यानांतून मनाला संतोष देणारीं अशीं पुष्कळ सुमनें हुडकून काढावीं लागतात. स्वातंत्र्यप्रिय परंतु साध्या आणि निष्कपट, स्वावलंबी लोकांना योग्य असा धर्म वैदिक धर्म आहे असें ह्मटलें असतां चालेल. प्रत्येक धर्माला किंवा धर्मतत्वाला आधुनिक शास्त्राच्या कसोटीला लावून पाहिलें तर त्यांतून किती तत्वें टिकतील याचा भरंवसा देतां येत नाहीं; परंतु ज्या अंतस्थ तृष्णेनें सर्व जग विव्हळत आहे, ती तृष्णा अंशतः तरी घालविणारें जीवन त्या ऋषींच्या धर्मांत सांपडतें असें ह्मटलें असतां, सत्याचा अतिक्रम होणार नाहीं. श्रद्धा, भक्ति आणि ईश्वरांविषयीं प्रीति हींच कोणत्याही धर्माचीं मुख्य अंगें आहेत, आणि माझ्या मतानें, जरी या सर्वांपेक्षां सत्याची इच्छा आणि ईश्वराच्या अज्ञेयत्वामुळें उत्पन्न होणारी आदरबुद्धि यांस श्रेष्ठस्थान दिलें पाहिजे, तरी वैदिक धर्मापासून कोणच्याही राष्ट्राचें नुकसान व्हावें, व त्याच्या ऐहिक व्यवस्थेवर त्याचे अनिष्ट परिणाम व्हावे, असा धर्म तो खचित नव्हता. तथापि यास धर्माबरोबर जी

एक थोतांड वृत्ति उदय पावत गेली, तिचीं कारणें पुढील कालांतील स्थिति पाहून आपल्याला दिसून येतील. धर्माचा ज्या दिशेनें व्युत्क्रम व्हावयाला पाहिजे होता, त्या दिशेनें न होतां भलत्याच दिशेकडे त्याचा ओघ गेला.

असो ; आतां दुसरा काल ह्मटला ह्मणजे इसवी सनापूर्वी १४०० ते १०००. या कालाला माझ्या मतें ब्राह्मणोपनिषत्काल ह्मटलें असतां चालेल. या काळामध्यें आपले लोक सतलज आणि सरस्वती नदीच्या पूर्वेस सर्व बंगालभर आणि वायव्यप्रांतभर पसरून गंगानदीच्या किनाऱ्यानें त्यांणीं अनेक वसाहती केल्या. गंगा आणि यमुना या दोन नद्यांमधील सर्व भाग त्यांनीं व्यापून, त्यामध्यें मोठमोठीं आणि बलिष्ठ अशीं राज्यें स्थापन केलीं. या ४०० वर्षांत त्यांची सर्व बाबतींत सुधारणा होत गेली. प्रत्येक राजाच्या पदरीं विद्वान् लोक चाकरीस राहूं लागले. यज्ञयागादि विधि पहिल्याप्रमाणें बेताबातानें न होतां मोठ्या डामडौलानें होऊं लागले. राष्ट्रांतील संपत्ति वाढल्यामुळें नाना प्रकारच्या कलांना उत्तेजन मिळत गेलें. त्यांची मुलूख वाढविण्याची तृष्णाही बळावत गेल्यामुळें, लढाईकरितां बरीच मंडळी पहिल्यापासून शस्त्रास्त्रांत व धनुर्विद्येंत पारंगतता मिळण्याकरितां एकमेकांवर चढाओढ करूं लागली व अशा लोकांना यज्ञाच्या वेळीं अगर रोजच्या प्रार्थनेच्या वेळीं ह्मणावयास लागणारीं स्तोत्रें ह्मणण्याची इच्छा राहिली नाहीं ह्मणा, अगर फुरसत राहिली नाहीं ह्मणा, त्यामुळें एका विवक्षित वर्गापासून ते आपला कार्यभाग उरकून घेऊं लागले, आणि त्या विवक्षित वर्गालाही ही सर्व विद्या आपणापाशींच आहे आणि ती आपणापाशींच राहिली पाहिजे अशी सहजीं इच्छा उत्पन्न होऊन ते त्याचा क्लिष्टपणा वाढवीत गेले, व जेणेंकरून इतर मंडळीला ती विद्या सुसाध्य होणार नाहीं, अशा उपायांमध्यें त्यांचें चित्त मग्न झालें. साध्या होमाचे ऐवजीं, त्यांणीं क्रियाकर्मांचा अवडंबर माजविला. पूजनद्रव्यें आणि पूजनविधि साधा सोडून देऊन त्याची रेलचेल करून मांडली आणि विधि लांबलचक व दुर्बोध केला. होमांच्या स्थंडिलांची

लांबीरुंदी अमुक पाहिजे, अग्नि सिद्ध करावयाचा तो अमुक तऱ्हेनेंच केला पाहिजे, साध्या मंत्राऐवजीं गायनयुक्त मंत्र पाहिजेत अशी त्यांनीं योजना केली. तात्पर्य मुख्यत्वेंकरून त्या विद्येची गठडी आपल्याकडून कोणीही हिसकावून घेऊं शकणार नाहीं, अशी तजवीज त्या वर्गानें केली. अनार्य लोकांना ह्मणजे हिंदुस्थानचे मूळ रहिवाशी यांना थोडेसे हक्क ह्मणजे फक्त हिंदु ह्मणविण्याचे हक्क देऊन, त्यांनीं आपल्या उपयोगीं तर पडावें परंतु त्यांची स्थिति तर सुधारूं नये अशी व्यवस्था केली. तात्पर्य वैदिक विद्येंत पारंगत व सर्वांहून विद्येनें श्रेष्ठ असा एक वर्ग; लढाईला उत्सुक आणि तत्संबंधीं विद्येमध्यें निष्णात अशा लढवय्या मंडळीचा एक निराळा वर्ग; या व पहिल्या वर्गाच्या सुखाकरितां अनेक कलाकौशल्यें व धंदे काढून आपली ऐहिक संपत्ति वाढविणारा एक वर्ग; आणि हिंदु ह्मणवून घेण्यापलीकडे राष्ट्रीय, सामाजिक व राजकीय बाबतींत कोणच्याही प्रकारचे हक्क नसणारा एक चवथा वर्ग हे चार वर्ग; या काळांत उदय पावूं लागले. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या जातिवैशिष्ट्याचें बीजारोपण या दुर्भागी राष्ट्रांत झालें. ब्राह्मण आणि क्षत्रिय या गुणवाचक शब्दांचा उपयोग जातिवाचक होऊं लागला. शहाणा असो अगर नसो, अमुक कुलांत जन्म घेतला ह्मणजे तो ब्राह्मण, आणि शूद्र असो अगर नसो, अमुक वंशांत जन्म घेतला ह्मणजे तो क्षत्रिय, असा वर्णभेद सुरू झाला.

या कालांत ब्रह्मा, विष्णु, महेश, उमा, सावित्री इत्यादि देवतांची सरशी होऊन वैदिक देवांचें महत्व कमी झालें. देवळें वगैरेंचा उल्लेख या कालांतील लेखांत कोठें कोठें आढळतो. हस्तनिर्मित वस्तूंमध्यें सुद्धां प्राणप्रतिष्ठा करून त्यांस देव मानून त्यांचें पूजन करूं लागले होते. साधारण ज्ञानाच्या मनुष्याला अज्ञेय अशा वस्तूंचें ज्ञान होणें कठीण असल्यामुळें, आपल्यासमोर दृश्य वस्तूंमध्यें अज्ञेय ईश्वराचे गुण आहेत असें कल्पून त्याची पूजा ते करूं लागले. भगवद्गीतेंतसुद्धां मूर्तिपूजेचा भगवंतांनीं निषेध न करितां तो एक मार्ग अज्ञानांना भक्तीचा आहे असें सांगितलें आहे. या ह्मणण्यांत बराच खरेपणा आहे असें

कोणीही विकारवश न झालेला मनुष्य कबूल करील. देवळांत नुसतें उभें राहून ईश्वराचा धांवा करणारे, अथवा गुडघे टेंकून ईश्वरास हांका मारणारी अशिक्षित मंडळी, कांहीं तरी मूर्ति मनांत आणिल्याशिवाय भजन अथवा भक्ति कशा रीतीनें करीत असतील, ती कल्पना आपणा मूर्तिपूजकांस सांगतां यावयाची नाहीं. आह्मांस तर मूर्तिपूजेंत विशेष थट्टा करण्यासारखें कांहीं दिसत नाहीं. त्यांत सुधारणा फारच करावी लागेल, यांत तिळप्राय शंका नाहीं; तथापि मूर्तिपूजा ह्मणजे अगदीं महत्पाप किंवा ईश्वराची थट्टा खचितच नाहीं. असो. पितृपूजेचे ठिकाणीं या कालांत श्राद्धें, प्रेतविधि इत्यादि अनेक विधि झाले; ह्मणजे ज्याप्रमाणें ईश्वराचे ठिकाणीं स्थापना होऊं लागली, त्याप्रमाणें पितृतर्पणाचेवेळीं त्याचे जागीं ब्राह्मणाची योजना होऊं लागली. 'श्रद्धया दत्तं इति श्राद्धम्' असा मूळ अर्थ असतां त्याचा किती विपर्यास झाला तो पहा. या कालांतच प्रारंभीं मृत पितरांच्या स्मरणार्थ मूल्यवान वस्त्रें, किंवा धनधान्य देण्याची चाल पडली. पुढें त्याच्या ऐवजीं प्रतिवर्षीं पितरांच्या ठिकाणीं आणि देवांच्या ठिकाणीं ब्राह्मणांची योजना करून त्यांजला भोजन घालण्याची आणि दान करण्याची चाल पडली.

या वेळेच्या ग्रंथांकडे पाहिलें तरी हीच व्यवस्था दिसून येते. या कालांतील ग्रंथ ह्मटले ह्मणजे यजुर्वेद, सामवेद आणि कांहींसा अथर्ववेद, त्यांचे ब्राह्मण आणि त्यांचीं आरण्यकें हे होत. सर्व वेदांत ऋग्वेद हाच फार प्राचीन असून बाकीचे वेद त्याचे बरेच मागून झालेले आहेत. मोठमोठ्या यज्ञांत एकाच ऋषीकडे अगर उपाध्यायाकडे सर्व काम सोंपविलेलें नसे. संपत्तीच्या विस्ताराबरोबर यज्ञाचेंही डंबर माजत गेलें. मुख्यत्वेंकरून चार उपाध्यायांची जरूरी प्रत्येक यज्ञाच्या वेळेस पडत असे. ब्रह्मा, होता, अध्वर्यु, आणि उद्गाता हीं त्या चार उपाध्यायांचीं नांवें असत. सर्व विधि मंत्रयुक्त आणि विध्युक्त झाला कीं नाहीं हें पहावयाचें काम ब्राह्मणाचें होतें. आलीकडे सर्व साधारण कामांत जो भाग आपल्या उपाध्यायांच्या वांटणीस येतो,

तो त्यावेळेस सर्व ब्राह्मणांच्या वांटणीस येत असे. होत्यानें काम फक्त ऋग्वेदांतील मंत्र ह्मणावयाचें. तेव्हां त्या मंत्रांपलीकडील निराळे ग्रंथ पहाण्याची त्याला जरूर नव्हती. परंतु अध्वर्यु आणि उद्गाता यांची गोष्ट तशी नव्हती. कोणच्या जागेवर यज्ञ करावयाचा, त्याची लांबी-रुंदी काय असावयाची, त्या जागेवर स्थंडिल तयार करावयाचें, यज्ञ-चित्रें यथासांग तयार करावयाचीं, बली द्यावयाचा, पशूची योजना करावयाची वगैरे कामें त्याजकडे असत. या सर्व बाबती नियम-बद्ध करण्याकरितां अनेक ऋषींनीं मिळून एक ग्रंथ तयार केला आणि तोच ग्रंथ यजुर्वेद. याचे भाग दोन. एक शुक्ल यजुर्वेद आणि एक कृष्ण यजुर्वेद. परंतु त्या पोट भागाचे सध्या आपल्याला प्रयो-जन नाहीं. उद्गाता यानें निवडक ऋचा तालसुरांत बसवून त्या ह्मणावयाच्या असत. तेव्हां अशा ऋचांचा समुदाय एकत्र करून त्यांचा एक स्वतंत्र ग्रंथ बनविण्याचें काम सुरू झालें. या ग्रंथालाच सामवेद ह्मणतात. वास्तविक पहातां सामवेदांतील बहुतेक सर्व ऋचा ऋग्वेद संहितेंतून घेतलेल्या आहेत. त्यांत नवीन असें कांहीं नाहीं. अथर्ववेद हा ह्या तिन्ही वेदांच्या फारच मागून झालेला आहे व त्याला पहिल्या तीन वेदांच्या पंक्तीस बसावयाला फार अवधि लागली. मी ज्या कालाची माहिती आपणांस सांगतों आहे, त्या वेळीं या चतुर्थ वेदाची गणना वेदांत होत नव्हती. त्रयी हा शब्द आपणांस अवगत असेलच. या वेदांत धर्मसंबंधीं वेडगळ कल्पनांचा भरणा असून मंत्रतंत्रांची यांत रेलचेल. अमुक मंत्र ह्मटल्यानें अर्थसिद्धि होते. अमुक मंत्र ह्मटल्यानें रोग बरे होतात, प्रवासास निघतेवेळीं अमुक मंत्र ह्मणावयाचा, इत्यादि नानाप्रकारच्या कल्पनांचा यांत भरणा आहे. विषारी जनावरापासूनही बरें करण्याचे मंत्र यांत दिलेले आहेत. आतां ब्राह्मण आणि उपनिषदें ह्मणजे काय, तसेंच आरण्यक ह्मणजे काय, हें थोडक्यांत सांगतों.

प्रत्येक वेदांतील ऋचांचा गूढ अर्थ विशद करण्याकरितां आणि अमुक ऋचांचा अर्थ अमुकच आहे हें ठरविण्याकरितां अनेक ऋषींनीं

वेळोवेळां जे वाद केले, त्या प्रत्येक वादाला ब्राह्मण अशी संज्ञा असून, प्रत्येक वेदांतील एकंदर वादसमुदायालाही ब्राह्मण अशी संज्ञा आहे. प्रत्येक वेदाचे निरनिराळे ब्राह्मण असून, ज्या ज्या ऋषींनीं ते प्रसिद्ध अगर एका ठिकाणीं केले, त्या त्या ऋषींचीं त्यांना नांवें दिलीं आहेत. जसें ऋग्वेदांतील ऐतरेय ब्राह्मण. आरण्यकें हे ब्राह्मण ग्रंथाचेच भाग असून, जे भाग अरण्यांत वाचण्याजोगे आहेत, त्यांना ही संज्ञा दिलेली आहे. याशिवाय ग्रंथरचनेसंबंधानें दोन्ही ग्रंथांत फारसा फरक नाहीं. जसें ऐतरेय ब्राह्मण आणि ऐतरेय आरण्यक. या आरण्यकांचें महत्व यांच्यांतील उपनिषदांमुळें वाढलें आहे. ऐतरेय आरण्यकांचें महत्व तदंतर्गत त्याच नांवाच्या उपनिषदांवर अवलंबून आहे. आपल्या प्राचीन ऋषींनीं पृथ्वीच्या सृष्टिस्थितिलयाविषयीं, परलोकांविषयीं ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं, किंवा इतर अशाच महत्वाच्या विषयांसंबंधानें ज्या कल्पना व जे बुद्धिवाद प्रकट केले आहेत, ते या नांवानें प्रसिद्ध आहेत. शंकराचार्यांच्या काळापर्यंत १० उपनिषदें प्रसिद्ध होतीं. त्यांनीं आपल्या वेदांतसूत्रांमध्यें या दाही उपनिषदांचा वेळोवेळीं दाखला दिला आहे. या उपनिषदांना श्रुतिग्रंथांतच अंतर्भूत केल्यामुळें आणि त्यांचा अधिकार प्रमाण मानल्यामुळें अगदीं अर्वाचीन कालापर्यंत या प्रकारचे ग्रंथ वाढतां वाढतां २०० पर्यंत वाढले आहेत. आणि अकबर बादशहाच्या अमलांत, जी एक सार्वत्रिक धर्मासंबंधीं ह्मणजे हिंदु आणि मुसलमान यांना ग्राह्य असा धर्म स्थापपण्याची कल्पना त्याचे मनांत आली, त्या धर्माचें विवरण अल्लोपनिषद या नावानें बाहेर आलें.

हीं उपनिषदें या दुसऱ्या कालाच्या अखेर लिहिलीं गेलीं असावीं, ह्मणजे ब्राह्मणग्रंथ तयार झाल्यावर बरेच वर्षांनीं उपनिषदें झालीं असावीं. यज्ञांतील क्रियाकर्माचें डंबर या दुसऱ्या कालाच्या आरंभीं इतकें माजलें कीं, या क्रियांचें एकीकरण करण्याकरितां स्वतंत्र ग्रंथ लिहावे लागले. ब्राह्मण ही जाति होऊन त्या जातीचें स्तोम फारच वाढत गेलें. लहानशा क्रियांकरितां क्षत्रियांनासुद्धां त्यांच्या तोंडाकडे पहावें लागं लागलें.

ब्राह्मणांतसुद्धां विद्या थोडी, दंभ फार अशी स्थिति झाली. ही स्थिति कुठवर टिकणार? ब्राह्मणांचा पगडा आपल्यावर कां असावा, अशी कल्पना सहजच इतर ज्ञातींच्या लोकांच्या मनांत येऊं लागली असावी. क्रियाकर्मांचें स्तोम वाढलें ह्मणजे मूळ हेतुचें ह्मणजे ईश्वरस्तुतीचें सहजच विस्मरण पडतें. धर्म ह्मणजे या क्रियाबाहुल्यांत आहे, अशी ब्राह्मणांनीं इतर ज्ञातींची समजूत केली किंवा त्यांनासुद्धां तसें वाटूं लागलें, यांत नवल नाहीं. स्थंडिलाचा जरा कोंपरा चुकला, किंवा ज्या समिधा १२ पाहिजेत त्यांतून कांहीं न मिळाल्या, कीं कर्म बिघडलें, फलप्राप्तींत बिघाड आला, अशी धर्मसंबंधीं कल्पना आपल्या दुर्भाग्यानें पसरूं लागली. तेव्हां साहजिकच पुष्कळ क्षत्रियांच्या मनांत येऊं लागलें कीं, या ब्राह्मणांचें वर्चस्व आपल्यावर कां असावें? आपल्यापेक्षां विद्येनें अगर बुद्धीनें अधिक नसून धर्माच्या बाबतींत सर्वस्वी त्यांच्याच ओंजळीनें पाणी पिणें हें त्या क्षत्रियांस कोठून रुचणार? नुसत्या कोरड्या कर्मांत काय आहे असें सहजच समजून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. आणि या कर्मांचें महत्व कमी झालें, ह्मणजे आपणालाही ब्राह्मणांवर फारसें अवलंबून रहावें लागणार नाहीं अशी समजूत झाल्यानें तर, कर्मांविषयीं दिवसेंदिवस त्यांच्या मनांत तिटकारा आला. कर्माच्या बाह्य देखाव्याला झिडकारून देऊन, या सृष्टींतील बाह्य उपाधींच्या पडद्यांच्या आंत शिरून, आंत ईश्वर कोठें असेल अशी जागा हुडकून पाहूं लागणाऱ्या क्षत्रियांनीं तसेंच आपण आलों कोठून, आपण जाणार कोठें, हें जगत् कोणी निर्माण केलें, एवढ्या जगड्व्याळ कारभाराचा चालक कोठें असेल, असें आपली बुद्धि कुंठित करून टाकण्यासारखे प्रश्न मनांत उद्भवून, ब्राह्मणांच्या वर्चस्वामुळें त्रासून गेलेले, परंतु त्यांच्या जाळ्यांत पूर्णपणें अडकून न गेल्यामुळें स्वतंत्र विचार करण्याचा अवकाश व प्रवृत्ति ज्यांना झाली, अशा लोकांनीं हे उदात्त आणि मनोरंजक ग्रंथ रचले. या ग्रंथांमध्यें मनुष्याच्या कल्पनेनें अदृश्य, अज्ञेय आणि अतर्क्य अशा ईश्वराच्या कृतीविषयीं मानवी मनानें किती भरारी मारली आहे, हें कळून येतें.

आधुनिक शास्त्रप्रमाणेंसुद्धां पदार्थांच्या आदिअंताविषयीं किंवा मनुष्य मेला असतां कोठें जातो, मनुष्यांत प्राण कसा येतो, ईश्वराचें स्वरूप कसें आहे, इत्यादि गोष्टींसंबंधानें ठाम सिद्धांत ठरला आहे. या गोष्टी मनुष्याच्या मर्यादित आणि संकुचित बुद्धीस अप्राप्त आणि अज्ञेय आहेत. असें जरी आहे, तरी असल्या विषयासंबंधानें मानवी मनानें सुमारें ३००० वर्षांपूर्वी काय विधानें केली आहेत, व अशा बिकट प्रश्नांविषयीं विचार करण्यापर्यंत त्यांची मजल येऊन पोहोंचली होती, हें पाहून कोणाही हिंदूला आपल्या पूर्वजांविषयीं अभिमान आणि कौतुक वाटल्यावाचून राहणार नाहीं. ईश्वर एकच आहे, तोच चराचर विश्वाला व्यापून आहे, आणि ईश्वराशिवाय दुसरें कांहीं नाहीं, प्रकृति आणि पुरुष दोन नसून प्रकृति ही पुरुषांतर्गतच आहे, अशी उदात्त कल्पना, हीच उपनिषदांचें मुख्य मर्म आहे असें ह्मटलें असतां वावगें होणार नाहीं. या दृश्य जगाच्या सृष्टिस्थित्यंताचें पर्यवसान त्यांत आहे. हाच त्यांचा मुख्य प्रतिपादनाचा विषय. छांदोग्योपनिषदांत, तिसऱ्या अध्यायांत, चतुर्दश खंडांत या परमात्मस्वरूपाविषयीं वर्णन दिलें आहे, तें येथें दिल्यावाचून माझ्याच्यानें राहवत नाहीं.

'मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्पः आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादरः ॥ २ ॥ एष म आत्माऽनार्हृदयेऽणीयान् व्रीहेर्वा, यवाद्वा, सर्षपाद्वा, श्यामाकाद्वा, श्यामाकतंडुलाद्वैष्यमः आत्माऽन्तर्हृदये ज्यायान् पृथिव्याः ज्यायान् अंतरिक्षाज्ज्यायान, दिवोज्ज्यायान् एभ्यो लोकेभ्यः ॥ ३ ॥ सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वमिदमभ्यात्तोऽवाकमनादरः एष म आत्माऽन्तर्हृदयं एतत् ब्रह्म.

याचा अर्थः—मनोमय, ज्याचें प्राण हेंच शरीर, प्रकाश हें ज्याचें रूप, सत्य हेच ज्याचे विचार, आकाश हाच ज्याचा आत्मा, सर्व कर्मांचा, व्यसनांचा, सुगंधांचा आणि सर्व रुचींचा स्थानभाव, जो या सर्वांस व्यापून राहिला आहे, जो बोलत नाहीं आणि जो संभ्रमसहित

आहे असा माझा अंतरात्मा आहे. यवापेक्षांही लहान, व्रीहिपेक्षांही लहान, मोहरीपेक्षांही लहान, राजगिऱ्यापेक्षांही लहान, राजगिऱ्यांतील तांदुळापेक्षांही लहान, तसेंच जें पृथ्वीपेक्षां मोठें, आकाशापेक्षां मोठें, सर्व स्वर्गापेक्षां मोठें, सर्व विश्वापेक्षां मोठें असें तें ब्रह्म आहे.

या सर्व चराचर, गोचर, अगोचर वस्तूंना व्यापून राहिलेला, त्यांचा प्राणरूप झालेला जो तोच ईश्वर ही कल्पना प्रथम उपनिषदांतच आढळते. 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' हेंच ब्रह्माचें तत्व समजलें पाहिजे. हीच कल्पना नाना तऱ्हेनें त्यांनीं निरूपण केलेली आहे. त्यापैकीं एक दोन येथें सांगतों. याच छांदोग्य उपनिषदांत ६व्या अध्यायांत १३व्या खंडांत मीठ आणि पाणी यांचा दृष्टांत घेउन उद्दालक अरुणेय यानें आपल्या श्वेतकेतु नामक पुत्राला उपदेश केला आहे. श्वेतकेतु हा आपल्या गुरूपाशीं १२ वर्षें अभ्यास करून, परत बापाच्या घरीं आला. त्याला वेदाभ्यासाचा अभिमान झालेला पाहून, त्याचा अभिमान दूर करण्याकरितां ईश्वराच्या सर्वगततेविषयीं त्याला उपदेश केलेला आहे. 'विद्यमानमपि वस्तु नोपलभ्यते प्रकारान्तरेण तु उपलभ्यते इति' हा प्रश्नविषय होता. बापानें मुलाला सांगितलें बाळ, जा, एक पेलाभर पाणी घे. एक खडा मिठाचा टाक, आणि उद्यां सकाळीं माझ्यापाशीं ये ह्मणजे मी तुला हा विषय समजावून देईन. मुलानें बापाच्या आज्ञे-प्रमाणें पाण्यांत मीठ टाकलें. तो खडा अर्थात्‌च विरघळून गेला. दुसऱ्या दिवशीं मुलाला बापानें विचारलें 'मला तो खडा दाखवितोस का'? मुलगा ह्मणाला तो वितळून गेला. नंतर बापानें त्याला तोंडा-वरच्या पाण्याचें आचमन घ्यावयाला सांगितलें. मुलानें सांगितलें पाणी खारट लागतें. नंतर थोडें पाणी टाकून पेल्याच्या मध्यभागांतील पाणी चाखून पहावयास सांगितलें, तेंही अर्थात्‌च खारट लागलें. सरतेशेवटीं अगदीं तळांतील पाणी चाखूनही खारट लागलें, असें मुलानें सांगितल्यावर बापानें त्या दृष्टांतानें आपल्या शरीरांतर्गत आत्म्याचें निरूपण केलें. ज्याप्रमाणें या पाण्यांतील मीठ दृष्टीनें किंवा स्पर्शानें कळत नाहीं; परंतु जिव्हेनें त्याचें अस्तित्व सिद्ध होतें. त्याप्रमाणेंच 'जगन्मूलरूप

सतोऽस्मिन्देहे सत्वं अवगतं भवति ' जगाचें मूळ जें सत् त्याचाही भाव देहामध्यें असून, आपल्या व्यावहारिक इंद्रियांनीं दिसत नाहीं; परंतु सर्वभागीं देहांत तें भरलें आहे यांत संशय नाहीं. ज्याप्रमाणें अनेक मधुकर असंख्य वृक्षांतून मधुपाला एकरूप आणितात, आणि तें एकरूप झाल्यावर मग अमुक झाडांतील मधु कोणता हें जाणण्याची अशक्यता आहे किंवा सागरांमध्यें हजारो ठिकाणांहून अनेक नद्यांचे प्रवाह येऊन सागराशीं ते प्रवाह एकरूप झाल्यावर अमुक नदीचा प्रवाह अमुकच आहे हें सांगणें जसें मुष्किल आहे. जसे अनेक रस मधुतादात्म्य पावतात, जसे अनेक नदीप्रवाह सागरतादात्म्य पावतात, तसेच हे सृष्टप्रवाहही त्या सताशीं तादात्म्य पावतात, आणि मग अमुक अमक्या योनींतील आहे असें सांगणें मुष्कील पडतें. ह्या दृष्टांतांत या मानवी आत्म्याला अनेक योनींतून परिभ्रमण करावें लागतें, ही कल्पना व्यक्त झालेली दिसते. असो.

केनोपनिषदांत एका जिज्ञासूनें प्रश्न केलेला आहे ' केनेषितं पतति प्रेषितं मनः । केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः केनेषितां वाचामिमां वदन्ति चक्षुः श्रोत्रं को देवो युनक्ति। ह्याजवर गुरूंनीं उत्तर दिलें आहे. श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यत् वाक्यो ह वाचं स तु प्राणस्य प्राणः चक्षुषः चक्षुः धीराः प्रेत्यास्माल्लोकाद् मृता भवंति । यद्वाचा नाभ्युदितं येन वागभ्युद्यते तदेव ब्रह्म त्वंविद्धि नेदं यदिदमुपासते । यच्चक्षुषा न पश्यति तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते । यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतं तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।

या प्रश्नोत्तरांवरून आपल्या स्पष्ट ध्यानांत येईल कीं, ब्राह्मणांच्या शुष्क क्रियाकर्मांनीं विटलेल्या मनानें अज्ञेय प्रदेशांत परिभ्रमण केलें आहे. आतां हा भाग बराच लांबल्यामुळें थोडक्यांत एक दोन गोष्टींचा निर्देश करून तो आटोपतों. उपनिषदांत 'पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनं ' या उक्तीप्रमाणें अनेक जन्मपरंपरांतून मनुष्याच्या आत्म्याला जावें लागतें, या सिद्धांताविषयीं बऱ्याच ग्रंथ-

कारांनी विवरण केलें आहे. वैदिक कालांत प्राण्याला अनेक योनीं-तून जन्मसंसृति करावी लागते, ही कल्पना झाली नव्हती. चांगल्या कर्मानें मोक्ष मिळतो, ही कल्पना त्या काळची होती व उपनिषदांतूनही या जन्मपरंपरेपासून मुक्ति मनुष्य निष्काम झाला ह्मणजे मिळते, असें प्रतिपादन केलेलें आढळतें. सर्व प्राणिमात्र, मग ते कोणत्याही योनींतले असोत, सर्व ब्रह्माप्रत मिळून तल्लीन होतात आणि तदनंतर वासनारहित, शांत, जितात्म असे जे प्राणी असतात, त्यांस परब्रह्माशीं एकरूपता मिळते. बाकींना पुन: जननमरणाकरितां त्या त्या कर्मानु-सार नाना योनींत जावें लागतें, असा तर्क कांहीं उपनिषदांत आढळतो. आत्मा परमात्म्याशीं तादात्म्य पावलेल्या अगर पावणाऱ्या मनुष्यांचा आनंद छांदोग्योपनिषदांत ८ व्या अध्यायांत १४ व्या खंडांत सांगि-तलेला आहे. ' प्रजापते: सभां वेश्म प्रपद्ये यशोऽहं भवामि ब्राह्मणानां यशो राज्ञां यशो विशां यशोऽहं अनुप्रापये '. हीं वाक्यें वाचल्यानंतर बुद्धधर्मांतील निर्वाणाची कल्पना, हिंदुधर्मांतील आत्म्याची परमात्म्याशीं सरूपता अथवा तादात्म्य यांवरूनच निघाली असावी, असा तर्क मनांत आल्यावांचून राहत नाहीं. हीच कल्पना काठकोपनिषदांत नचिकेता आणि मृत्यु यांच्या संवादांत स्पष्टपणें दिसते.

नचिकेता याचे बापापाशीं यज्ञसमयीं देण्याला अवश्यक अशी संपत्ति नसल्यामुळें, नचिकेताचे मनांत विचार आला कीं, आपण बापाला विचारावें कीं, मला कोणत्याही ऋत्विजाला देऊन टाक, ह्मणजे बापाची यज्ञसिद्धि होईल. असा विचार करून बापापाशीं येऊन त्याणें विचारलें ' मला कोणास देतां '? बापानें कांहीं उत्तर दिलें नाहीं तरी नचिकेतानें पुन्हा दोन वेळां तोच प्रश्न केला. बाप त्याजमुळें रागावून त्यानें ह्मटलें कीं, मी तुला मृत्यूला अर्पण करितों. मुलगा पुढें मृत्यूचे दरबारीं गेला, व तेथें त्याणें त्याजपासून तीन वर मिळविले. तिसरा वर मागण्याची वेळ आली त्यावेळीं नचिकेतानें प्रश्न केला:—

येयं प्रेते विचिकित्सा मनुष्ये अस्तीत्येके नायमस्तीति चैके ।
एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाहं वराणां एष वरस्तृतीयः ॥

' मनुष्य मेल्यानंतर कोणी ह्मणतात कीं तो असतो, आणि कोणी ह्मणतात तो नाहीं. या संशयाची निवृत्ति करावी हाच तिसरा वर मला द्यावा.' मृत्यूला मोठें संकट पडलें. आपली गुप्त गोष्ट सांगावयाला तो तयार होईना. त्यानें त्याला पाहिजे तें इतर देऊं केलें. शेवटीं तो आयकेनासा झाला, असें पाहून आणि वचनबद्ध होत्साता त्यानें नचिकेताला सांगितलें कीं, ' बाबा जे ज्ञानी आत्मविचार करून दुर्दर्शी अज्ञेय प्रदेशांत वास करणारा पुराण पुरुष जो ईश्वर याचें स्वरूप ओळखतात, ते मरणाकरितां हर्षविषाद मानीत नाहींत. हें आत्मतत्व ज्यांनीं ऐकून समजून घेतलें आहे, आणि जें परमात्मस्वरूपाप्रत पोचले आहेत, ते आनंदित होतात. ब्रह्माचीं द्वारें त्यांना मोकळीं आहेत, ह्मणजे ते मुक्ति पावतात.

या उपनिषदांतील आतां सांगितलेले व आणखी असेच नानाविध विचारतरंग वाचून कोणा हिंदूचें मन क्षणभर गुंग होणार नाहीं? या विश्वाच्या सृष्टिस्थितिलयाविषयीं आणि मनुष्याच्या मरणोत्तर स्थितिविषयीं ठाम सिद्धांत करणें कोणासही शक्य नाहीं. परंतु जिवंतपणीं मनन करण्याला आणि मरणसमयीं मनाला समाधान देण्याला, वर सांगितलेल्या उदात्त विचारापेक्षां आणखी उदात्त विचार कोठें तरी सांपडतील काय?

वैदिक काळांत सृष्टीच्या अनेक विभूतींची पूजा समजली जात होती, आणि ऋग्वेदाच्या अखेर अखेर ज्या कल्पनांचा उगम झालेला होता त्या कल्पनांचा विकास या उपनिषत्कालांत झाला असें ह्मटलें असतां चालेल. त्यावेळीं 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म', या तत्वाची पूर्णपणें स्थापना झाली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. यज्ञयागादि क्रियांचें अति स्तोम सहजीं वाढून, यजुर्वेदासारखे वेद आणि ब्राह्मणासारखे ग्रंथ तयार होऊन, पुढें त्याच क्रियाकर्मांच्या निगडबंधनांतून मुक्त होऊन, चराचर विश्वव्यापक ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं सिद्धांत करून, सर्व जगत् ईश्वरांत अंतर्लीन मानणें, हाच खरा धर्म हिंदु लोकांचा बनून गेला. जातिभेदाचा

प्रादुर्भाव झाला असूनही, त्यापासून राष्ट्राचा फारसा तोटा झाला नव्हता. लोकांत स्वातंत्र्यबीजाचा अंकुर जिवंत असल्यामुळें, ब्राह्मणांचें स्तोम जितक्यास तितकेंच होतें. सायंकाळीं आणि प्रातःकाळीं होमहवन करणें जरी बंद झालें नव्हतें, आणि यागाकरितां पशू मारणें धर्मसंमत समजलें जात होतें, तरी त्याची किंमत लोकांना कळूं लागली. अज्ञात सृष्टींत मानवी मन संचार करूं लागून अनेक विचारसुमनें त्याला दृग्गोचर होऊं लागलीं, वैदिक कालांतील देवतांची महती कमी होऊन, परब्रह्मरूपाविषयीं मन जिज्ञासु झालें. हीच या काळच्या धर्माची प्रगति होय. मनुष्याला धर्माची जरूरी आहे, ही गोष्ट जर खरी असेल, तर ज्यामुळें हा ऐहिक लोक सुखकर होईल, आणि ज्यामुळें मरणकाळ अति कठीण वाटणार नाहीं, असा धर्म असणें अत्यंत जरूर आहे. आणि उपनिषत्कालीं जो हिंदुधर्म स्थापित झाला, तो असा होता असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. शोपनहोरनामक एका शार्मण्यदेशीय पंडितानें उपनिषदांविषयीं ह्मटलें आहे कीं, उपनिषदें हीं मला फार सुखकर आहेत. माझ्या जीवनकालीं तीं मला सुख देत आहेत, आणि मरणसमयींसुद्धां सुख देण्याविषयीं माझी त्यांच्यावरच भिस्त आहे.

उपनिषद्काल झाल्यानंतर तिसरा काल ह्मटला ह्मणजे इसवी सनाच्या पूर्वी १००० वर्षांपासून तों बुद्धधर्माची ध्वजा अशोकराजानें सर्व हिंदुस्थानभर पसरिली त्या कालापर्यंत—ह्मणजे इसवी सनापूर्वी २४२व्या सालापर्यंत—या कालामध्यें हिंदूंच्या सर्व शास्त्रांना एकप्रकारचें रूप मिळालें असें ह्मटलें असतां चालेल. आजपर्यंत प्रत्येक विषयावरचे ग्रंथ पद्धतवार रचलेले नसून ते संवादरूपानें प्रसिद्ध झाले होते. हरएक शास्त्रांचें मार्मिक रीतीनें अध्ययन करून, संक्षिप्त पण व्यापक आणि मार्थ शब्दांनीं त्यांचे स्वतंत्र ग्रंथ तयार केले. यावरूनच याला सूत्रकाल ह्मटलें तरी चालेल.

उपनिषत्कालांत, निरनिराळ्या उपनिषदांत जे वेदान्ताचें अंकुर उत्पन्न झाले, त्या अंकुरांचें वर्गीकरण अथवा एकीकरण करून त्यांचीं वेदान्तसूत्रें बनलीं. हीं सूत्रें बादरायण ऋषींनीं केलीं असा समज आहे. ज्याप्रमाणें प्रत्येक शास्त्रांत अनवस्थेपासून, शास्त्रीय रीतीनें लिहिलेले ग्रंथ या काळांत रचले गेले, तसेंच धर्मविषयक, विचारासंबंधींही सर्व विचार एकवट करून, शास्त्रीय रीतीनें ह्या सूत्रांत त्याचें विवेचन केलें आहे. आणि याच सूत्रांवरील भाष्य शंकराचार्यांनीं करून, पुढें बुद्धलोकांस धर्मसंबंधीं वादांत जिंकून, हिंदुधर्माची सरशी करून दाखविली. तात्पर्य, ह्या काळांत आपला धर्म ह्मणजे वेदांतधर्म बनला असें ह्मटलें असतां चालेल.

वेदान्त या शब्दाचा अर्थ वेदाचा अन्त, ह्मणजे श्रुति ग्रंथांतील शेवटील ग्रंथ, अगर श्रुतिग्रंथांचें पर्यवसान अगर शेवट असा आहे. वास्तविक पहातां वेदान्त ह्मणजे तत्वज्ञानाचा ( Philosophy ) एक अगर अनेक ग्रंथ आहेत, अशी एकदम अटकळ उत्पन्न होते, व कांहीं अंशीं ती खरी आहे. फरक इतकाच आहे कीं, हीं वेदान्तसूत्रें ह्मणजे तत्वज्ञान आणि धर्म या दोन्हींवरील ग्रंथ आहेत. पाश्चात्य राष्ट्रांतील तत्वज्ञान आणि धर्म यांची फारकत दृष्टीस पडते, तशी हिंदुधर्मांत नाहीं, ही मोठी लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. यज्ञयागादि क्रियांचा ज्यामध्यें नायनाट होऊन, आणि ऋग्वेद काळांतील अति पूज्य मानलेल्या देवतांचेंही महत्व कमी होऊन, फक्त अज्ञेय आणि अतर्क्य अशा एका देवाची भक्ति हीच खरी भक्ति असें मानणारा धर्म ह्मणजे लौकिक धर्माशीं बराच विसंगत आहे, असें एकदम लक्षांत येइल; परंतु ज्या रीतीनें ऋग्वेदऋचांना श्रुतित्व मिळालें आहे, तद्वत्च या उपनिषत् व सूत्र ग्रंथांनाही मिळालें आहे. ही गोष्ट लक्ष्यांत आणिली ह्मणजे लोकांच्या किंवा ऋषींच्या मनांची, त्या उभय ग्रंथांत किंवा त्यांणीं प्रतिपादलेल्या धर्मांत विसंगतपणा नाहीं, अशी खात्री होती. या खात्रीचें बीज खालील गोष्टींत आहे. आमच्या धर्मामध्यें एक मोठी खुबी ही आहे कीं, आमच्यांत शिक्षितांना आणि अशिक्षि-

तांना, तसेंच लहानांना व वयोवृद्धांना, एकच धर्माचीं एकच तत्वें सारखीं हितावह होणार नाहींत, अशी समजूत असल्यामुळें, जीं तत्वें अज्ञानांना सुबोध आणि साध्य आहेत, तीं त्यांजकरितां कायम ठेऊन, ज्यांचीं मनें,' अज्ञानतिमिरांतून बाहेर पडून ज्ञानवृद्धत्वामुळें आणि वयोवृद्धत्वामुळें त्यांची प्रगति झाली आहे, त्यांचेकरितां हीं उपनिषदांतील तत्वें राखिलीं आहेत. अज्ञेयवाद किंवा 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' हें एखाद्या मुलाला सांगणें ह्मणजे, त्या ब्रह्माची आणि त्या विद्येची थट्टा करणें होय. आमच्या धर्मकारांनीं उपनिषद् ग्रंथ शिकण्याची योग्यता कोणाची हें सांगितलें आहे, त्यावरून हा जो उदात्त धर्म हा सर्व साधारण नव्हता असें मानण्यास बिलकुल हरकत नाहीं. बाकीच्या बहुतेक धर्मांतून, ही गोष्ट दृष्टीस पडत नाहीं. त्यांचेमध्यें, लहानास वृद्धांस, अज्ञानास आणि ज्ञानवानांस एकच धर्म सांगितला आहे. असें झाल्यापासून तो जितका हितावह व सुबोध व्हावा, तितका तो सर्वांस होत नाहीं.

आपल्या हिंदूंत जे चार आश्रम सांगितले आहेत, त्यांतील ब्रह्मचर्य कालांत हिंदूंचा धर्म ह्मटला ह्मणजे अध्ययनापलीकडे नव्हता असें ह्मटलें असतां चालेल. गृहस्थाश्रमांत यज्ञयागादि कर्मांचें अंगीकरण करणें भाग आहे. आणि क्रियाकर्मांत कांहीं नाहीं, असें मानण्याची त्यांस मोकळीक नव्हती. धर्मग्रंथांत आणि श्रुतिग्रंथांत जें सांगितलें आहे, त्याचा अधिकार पूर्णपणें मानून त्याप्रमाणें वर्तन केलें ह्मणजे, त्यानें धर्माचरण केलें असें त्यावेळीं लोक मानीत होते. परंतु 'कृतांतकटकामलध्वज जरेची' छाया मनुष्यावर पडली ह्मणजे मग त्याला, आपलें घरदार सोडून वनांत अथवा रम्य उपवनांत जाण्याची परवानगी होती. आणि अशा वेळीं गृहयागादि कर्में करण्याची त्यांस जरूर आपल्या धर्मानें ठेविली नाहीं. त्यावेळीं आमच्या शरीरांतून षड्रिपूंचें जयकरून दमन होईल, अशीं शरीराला आयास देणारीं व्रतें करून, आपण आलों कोठून व जाणार कोठें इत्यादि गहन विषयांचा विचार करण्याची त्याची योग्यता झाली असें मानलें होतें. आणि ह्मणूनच, ज्या ग्रंथांत अशा

प्रकारच्या विषयांचें विवेचन केलें आहे, असे ग्रंथ आरण्यकें या नांवानें प्रसिद्ध आहेत.

असो; वेदान्त शिकणाऱ्यानें, फक्त दोन आश्रमांतून आलें पाहिजे इतकें बस नव्हतें. यानें शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधि आणि श्रद्धा यांचा अभ्यास केला पाहिजे. तसेंच ऐहिक सुखाची त्यांणें परवा करितां कामा नये. सारांश, जगाच्या हासपरिहासापासून, आणि ऐहिक विषयांपासून मन परावृत्त करून, नंतर या परब्रह्माकडे मनुष्यानें मन लावल्यासच त्यास फलप्राप्ति होईल, अशी आमच्या धर्मशास्त्रकारांची पूर्ण खात्री होती.

असो; या सूत्रकालांत वेदान्ताची पुरी प्रगति होऊन जीवात्मा आणि परमात्मा यांचें ऐक्य स्थापन करण्यांत आलें आहे. मनुष्यमात्र हा इश्वराचाच अंश व विभूति आहे आणि आपल्या आत्म्याचें परमात्म्याशीं तादात्म्य होणें हाच मोक्ष, या तत्वाची स्थापना झाली. या ब्रह्माचें स्वरूप ह्मणजे सच्चिदानंदस्वरूपी आहे. एवढेच अस्तिवाचक गुण आहेत. बाकी त्याचें वर्णन करणें ह्मणजे तो अमुक नाहीं, तमुक नाहीं, गुणविशिष्ट नाहीं, रूपविशिष्ट नाहीं इत्यादि.

असो; आतां वर सांगितलेल्या गोष्टींवरून या दोन कालांत हिंदुधर्माचें स्वरूप ह्मटलें ह्मणजे साधारण लोकांचा व समाजाचा धर्म ह्मटला ह्मणजे.

१ मूर्तीचें ठिकांणीं इश्वराचे गुण कल्पून त्यांची पूजा करणें.

२ ब्राह्मणांचे अंगीं पितरांचे अंगचे गुण कल्पून त्यांचें संतर्पण करणें.

३ जातिधर्म मानून प्रत्येक जातीला घालून दिलेले नियम नियमित रीतीनें पाळणें इत्यादि.

४ प्रत्येक कामांत आणि प्रत्येक गोष्टींत नियमित कर्मांचें अङ्गीकरण करणें.

५ सामान्य जनांच्या वरील लोकांचा धर्म ह्मणजे वेदांतील धर्म जो श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितला आहे तो.

यज्ञयागादि क्रियांचें महत्व अतिशय मानणें. प्रत्येक गृहस्थाच्या पाठीमागें पंचमहायज्ञांचें गाडें या वेळीं लागलें असें दिसतें. ह्मणजे जीवात्मा आणि परमात्मा यांचें ऐक्य आणि प्रकृति आणि पुरुष यांचें ऐक्य ह्मणजे चराचरविश्वात्मक ईश्वर आहे असा भरंवसा ठेवणें हा होय. भगवद्गीतेप्रमाणें हें दृश्य विश्व सत्य नसून नश्वर आहे. आणि खऱ्या जगाचीही छाया याच्या पाठीमागें आहे. शाश्वत, अविनाशी आणि न बदलणारें असें जग आहे. सुखदुःख, पापपुण्य इत्यादि हे मनाचे विकल्प आहेत. मनुष्याला अविद्येमुळें किंवा मायेमुळें, आपण अमुक आहों आणि आपण व्यवहार करितों हें मिथ्या ज्ञान होण्यामुळेंच त्याला सुखदुःखाची भावना होते. वास्तविक पहातां मनुष्य हा कांहीं करीत नाहीं, व त्याचें अस्तित्व हाही भ्रम आहे.

या मायेपासून आणि अविद्येपासून मुक्त होण्याला भगवंतांनीं दोन उपाय सांगितले आहेत, एक ज्ञानमार्ग आणि दुसरा भक्तिमार्ग. परंतु त्यांतही आपल्या सर्व कर्मांचा भार ईश्वरावर घालून, आणि फलाकांक्षा न धरून, सर्वस्वी ईश्वरावर भक्ति ठेवणें, हा फारच सुलभ मार्ग आहे. ज्ञान आणि भक्ति संपादन करण्याला अनेक मार्ग सांगितले आहेत. असो; ईश्वराधीन मनुष्य झाल्यावर सर्व पापांपासून आणि कर्मांपासून तो मुक्त होतो. मग त्याला पापपुण्य शिवत नाहीं.

या व अशाच प्रकारच्या इतर कल्पना बौद्धधर्मापूर्वी हिंदुधर्मांत प्रचलित होत्या. हिंदु लोकांचें राज्य या काळांत दक्षिण आणि पूर्व-पश्चिम दिशेला दूरवर पसरून बहुतेक ठिकाणीं त्यांचीं संस्थानें झालीं. गोदावरी आणि कृष्णा नद्यांच्या काठीं हिंदु राज्यें झळकूं लागलीं. याच काळांत मनु, याज्ञवल्क्य, पराशर इत्यादि स्मृतिकारांनीं स्मृतिग्रंथ तयार केले. षड्दर्शनकार, कपिल, पतंजलि, गौतम, कणाद, जैमिनी

बादरायण यांनीं आपापले ग्रंथ तयार केले. पाणिनीसारखे वैय्याकरण याच काळांत होऊन गेले. बुद्धधर्माचा प्रसार याच काळांत होऊन गौतम-बुद्धाला लोक अवतार मानूं लागले. या कालामध्यें हिंदुधर्माला जें स्वरूप प्राप्त झालें तें फार मनोरंजक असून त्यापासून फार बोध घेण्यासारखा आहे; परंतु आपल्या विषयाची मर्यादा येथवरच असल्यामुळें, मी आपला निबंध येथेंच संपवितों, व यापासून तुह्मांला व मला दोघांनाही फारच प्राचीनकाळचे आपले प्रख्यात पूर्वज कसे होते हें जास्त उत्तम रीतीनें समजून घेण्याची इच्छा उत्पन्न होवो असें मी इच्छितों.

# विज्ञानशतक भर्तृहरीचें काय?

On him confer the Poet's sacred name
Whose lofty voice declares the heavenly flame.

Horace.

वे० शा० सं० रा० रा० कृष्णशास्त्री घुले, राहणार नागपूर यांचे-कडून ' श्री भर्तृहरिविरचितं विज्ञानशतकं प्रज्ञाख्यटीकोपोद्घातटिप्पण्यादियुतम् ' अशा पूर्ण नामाभिधानानें त्यांनीं स्वतःच प्रसिद्ध केलेलें पुस्तक, आमचेकडे आल्यास आज जवळ जवळ चार महिने लोटले; परंतु त्याचा आह्मांस यथास्थितपणें परामर्श घेण्याची सवड झाली नाहीं, याबद्दल थोडीशी दिलगिरी वाटते. प्रस्तुत पुस्तक भर्तृहरीचें विज्ञान-शतक; अर्थात् नीति, शृंगार व वैराग्य या तीन शतकांहून भिन्न असें चवथें शतक उपलब्ध झालेलें पाहून, संस्कृतज्ञास आनंदानें भरतें आल्याशिवाय राहणार नाहीं. भर्तृहरीचीं प्रसिद्ध तीन शतकें वाचून पहाणाऱ्या मनुष्यास बोध व आल्हाद झाला नाहीं, तर त्यानें अक्षरांची सर्वथा ओळख विसरून टाकावी, अशी आह्मीं त्यास शिफारस खास करूं. जगतीतलावरील कोणच्याही भाषेचें अध्ययन करण्याची त्यास खटपट नको, व कोणाही माणसाची संगत धरण्याची त्याला गरज नाहीं. व्याघ्र, वराह, सिंह, महिष आदिकरून प्राण्यांमध्यें अनिरुद्ध संचार करून, त्यांच्याशीं समशील होण्यास त्यास बिलकुल हरकत नाहीं. सारांश, मानुष्य ह्मणून जेथें आढळेल, तेथें तेथें भर्तृहरीच्या सुप्रसिद्ध शतकत्रया-पासून मनोरंजन व शिक्षणाचा एकदम लाभ झाल्याविना राहणार नाहीं. हजारो वेळां तेंच तें भर्तृहरीचें पद्य वाचलें, तरी त्याचा कंटाळा येत नाहीं; इतकेंच नव्हे, तरी उत्तरोत्तर वृद्धिंगत पावणाऱ्या निरतिशय ' नवः परनिर्वृतीचा ' अनुभव होतो. काव्यरसापुढें इतर सर्व रस तुच्छ आहेत, या सदुक्तीचा प्रत्यय पटतो. कालिदासभवभूत्यादि इतर कवींच्या काव्याप्रमाणें पुनःपुनः आस्वाद घेतल्यानें, भर्तृहरीच्या

काव्याची गोडी वाढत जाते. उघडच आहे, क्षणोक्षणीं ज्यांत नवीनतेचा भास होतो तेंच रमणीयतेचें ल्द्गत, ह्मणून माघ कवीनें ह्मटलें आहे,

दृष्टोऽपि शैलः स मुहुर्मुरारेरपूर्ववद्विस्मयमाततान ।
क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं रमणीयतायाः ॥
सर्ग ४ श्लोक १७.

अशा प्रकारचें कवितेज, कीं जेणेंकरून मानवी मानसांतील अंधकाराचा सर्वथा लोप होऊन जातो, तें ईश्वरी तेज ज्या विरल व्यक्तींच्या वाणींतून निघालेल्या उक्तींत सदैव भासमान होतें, त्यांच्या उक्तींचा आमच्याजवळ जेवढा संचय आहे, त्यांत आणखी भर पडल्यानें अत्यानंद व्हावा यांत नवल काय? प्रासादिक व प्रतिभाशाली कवी, पृथ्वीवरील कोणत्याही देशांत असोत, त्यांचीं मनें सारखींच असतात. कवित्वशक्तीची अमूल्य परमेश्वरी देणगी त्यांना सारखीच असते. जगांत साधू असतात त्यांस मान मिळतो; परंतु मान मिळावा ह्मणून साधूचें ढोंग करणारे भोंदू, हरतऱ्हा करून लोकांस झकवितात. त्यांचा भोंदूपणा कालेंकरून बाहेर पडतो व त्यांची डोमकावळी वृत्ति जनांस पूर्णपणें समजून, त्यांची अखेर फटफजीती होते. ही गोष्ट, प्रतिभाशून्य असून, उज्वल प्रतिभाशाली कवींच्या यशाचा लोभ धरणाऱ्या कवींची. परंतु इतर गोष्टीप्रमाणें उत्तममध्यमाधम प्रकार कवींतही आहेतच. परंतु कवी ह्मणजे सुकवि ज्याला ह्मणावा, त्या अस्सल कोटींत भर्तृहरीची आह्मी गणना करीत आलों आहों; आणि त्याची कविता आमच्याजवळ जितकी असावी अशी इच्छा आहे, तितकी नाहीं ह्मणून त्याचें एकादें शतक नवीन मिळालें, ह्मणजे अत्यंत आनंद होण्याजोगा आहे. तशी गोष्ट इतरांची नाहीं. एकादा किराताचा सर्ग किंवा एकादा रघुवंशाचा सर्ग नवीन मिळाल्यास तितकी हौस वाटणार नाहीं. एखादें कालिदासाचें नवीन नाटक मिळालें तरी आह्मी इतके आनंदित होणार नाहीं; पण तेंच मेघदूतासारखा नवीनच संविधानक घरून रचलेला कालिदासाचा ग्रंथ सांपडला, ह्मणजे त्यावर आमच्या उड्या पडतील. असा कांहीं अंशीं प्रकार भर्तृहरीचा आहे.

आतां परीक्षणाविषयक पुस्तक हातीं पडतांच अशीच कांहीं मनो-वृत्ति झाली. पुस्तक वाचून पाहिल्यावर मात्र तिचा सर्वथा भंग झाला-याचें कारण या पुस्तकांतील काव्य अधम आहे ह्मणून नव्हे. खरो-खर पाहतां यांतील कांहीं पद्यें फारच मनोहर आहेत. कोठें कोठें तर भर्तृहरीच साक्षात् भासतो. परंतु त्याविषयीं, ही भर्तृहरिकृति ह्मणून जो आनंद झाला होता, तो नाहींसा झाल्याबरोबर एकप्रकारें मनास विरसता आली. हें शतक भर्तृहरिकृत आहे असें प्रतिपादन करण्याचा, अर्वाचीन विचारसरणीचें अवलंबन करून, रा० रा० घुले शास्त्री यांणीं यत्न केला आहे. त्यांनीं दर्शविलेल्या प्रमाणावरून आमची तशी खात्री होत नाहीं. यावरून भर्तृहरिकृत शतकें ह्मणजे, सुप्रसिद्ध तीन शतकें व प्रस्तुत आमच्या मेजावरील मनोहर पुस्तक, यांचें कर्तृत्व एकाच कवीकडे आहे असा आमचा ग्रह होत नाहीं. या-संबंधानें आमचें स्वतःचें ह्मणणें काय आहे व रा० रा० कृष्ण शास्त्री घुले यांच्या प्रतिपादनाविषयीं आमचा अभिप्राय काय आहे, हें नमूद करण्याचा आज आमचा विचार आहे.

संस्कृत सारस्वत किंवा वाङ्मय जितकें अमूप, मनोहर व शिक्षणप्रद आहे, तितकेंच तें इतिहासदृष्टया विचार करणारास बुलकावण्या दाख-विणारें आहे. निरनिराळे संस्कृत कवी व त्यांचे ग्रंथ यांचा कालनिर्णय करणें अत्यंत मुष्कील आहे. आंतर व बाह्य प्रमाणांनीं कांहीं पंडि-तांनीं कालनिर्णय करण्याची खटपट केली आहे; परंतु जेथें बाह्य प्रमाणांचा अभाव आहे, त्याठिकाणीं केवळ आंतर प्रमाणांच्या पायावर उभारलेल्या इमारती अगदीं डळमळीत झाल्या आहेत. याची प्रतीति पाहणें झाल्यास, वेदाच्या कालाविषयीं जे वाद व लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांचेंच उदाहरण बस आहे. प्राचीनार्वाचीनत्व ठरविण्यासाठीं जीं तत्वें एका पंडितानें पतकरावीं, त्याच तत्वास अप्रयोजक समजून दुसऱ्यानें जुमानू नये, असा प्रकार झाला आहे. या संबंधांत डॉक्टर हो व प्रो० मॅक्स म्यूलर यांचे लेख पाहतां आढळून येईल कीं, ज्या सूक्तास एक अति प्राचीन समजतो, त्याच सूक्तास दुसरा अर्वाचीन

ह्मणतो. आंतर प्रमाणें त्याज्य आहेत, असें आमचें ह्मणणें नाहीं; परंतु त्यावर भिस्त ठेऊन वसविलेले सिद्धांत खरे ठरण्यापेक्षां अनिश्चित ठरण्याचा संभव अधिक असतो. एकाद्या चिंतकाचा अमुक एक ग्रह झाला ह्मणजे त्यास सर्व प्रमाणें आपल्याच ग्रहाचें समर्थन करितात असा भास होतो. अगदीं भक्कम व न डळमळणारी ऐतिहासिक गोष्ट एक तरी जगांत असेल कीं नाहीं याची वानवाच आहे, असें कित्येक तत्ववेत्त्यांचें ह्मणणें आहे; ह्मणून आपल्यापुढें आहे तें खरें; मागील गोष्टीबद्दल आग्रह व अभिमान धरून बोलणें हा अविचार आहे, असेंच त्यांचें ह्मणणें पडतें. ह्या तत्वाचा अंगीकार केला असतां सर्व इतिहासशास्त्रावरच, ' मूले कुठार ' येईल. तितकी धांव मारून यावत् स्थापित सिद्धांतावर हरताळ फिरविण्याचा आमचा मानस नाहीं; परंतु साधकबाधक प्रमाणें देऊन एकादी ऐतिहासिक गोष्ट सिद्ध केली असली, ह्मणजे तिचा सत्वर स्वीकार करणें आमच्या मतीस फार जड जातें, व पदोपदीं मन साशंक झाल्यावांचून राहत नाहीं. याचें कारण, दुसरें कांहीं नाहीं. वक्ता किंवा लेखक, दोन्ही बाजू न पहातां आपल्या मतास किंवा ग्रहास समर्थक असेंच प्राय: विवेचन करतो. अशाप्रकारें आमचें मन ऐतिहासिक विधानासंबंधानें द्विधा झालें ह्मणजे स्थलकालनिर्णयाचा नाद सोडून, केवळ आध्यात्मिक व बौद्धिकच उपयोग सर्व वाङ्मयापासून करून घ्यावा असें वाटतें. पर्वतप्राय श्रम करून सर्षपमात्र फलप्राप्ति व तीही अनिश्चित करून घेण्यापेक्षां, साक्षात् आनंद व तो अपरिमित घ्यावा अशीच प्रवृत्ति होते.

हें आमचें ह्मणणें एक उदाहरण घेतल्यानें अधिक स्पष्ट होईल. भवभूतीच्या कालनिर्णयाविषयीं ( ७ व्या शतकाचा शेवट ) शंका नाहीं. याचें कारण, गुरुवर्य डा० भांडारकर यांच्या मालतीमाधवांतील प्रस्तावनेंत निर्दिष्ट केल्याप्रमाणें, बाह्य प्रमाणें उपलब्ध आहेत. परंतु त्या महानाटककारानें लिहिलेल्या नाटकांचा कालक्रम मात्र ठरविण्याची खटपट करूं नये, असें आह्मांस वाटतें. त्या नादास लागून विशिष्ट पदांच्या व पदसमुदायांच्या अर्थाची ओढाताण करावयाची

व नसती सार्थकता त्यांत आणावयाची, हा मार्ग आम्हांस पसंत नाहीं. काय ह्मणे, महावीरचरित हा रामायणकथेचा पूर्वभाग आहे, व तें नाटक उत्तररामचरितापेक्षां काव्यगुणदृष्ट्या कमी प्रकारचें आहे. तेव्हां प्रथम भवभूतीनें महावीरचरित लिहिलें, व नंतर उत्तरराम रचिलें. या दोन प्रमाणांच्या विरुद्ध असेंही ह्मणणें शक्य आहे कीं, करुणरसाचा परिपोष करण्याचें मनांत आणून, रामचरिताचा उत्तरभाग आधारभूत धरून कवीनें सुरेख नाटक केलें, व नंतर पूर्वकथेचें एक नाटक लिहून, रामकथेचें वर्णन आपल्या हातून पूर्ण व्हावें असें वाटल्यावरून. महावीर-चरित रचिलें नसेल कशावरून? दुसऱ्या प्रमाणाविषयींही असेंच. प्रथम चांगलें लिहून मग कमी प्रतीचें लिहिणें अशक्य नाहीं. यास निश्चितपणें, ज्या राष्ट्रांच्या वाङ्मयाचा इतिहास माहित आहे, त्यांत आधार सांपडतो. प्रसिद्ध कवि वर्डस्वर्थ यानें १७९९ पासून १८०९ पर्यंत जसें सुरेख काव्य केलें, तसें पुढें १८५० पर्यंतच्या त्याच्या आयुष्याच्या ४० वर्षांत झालें नाहीं. तसेंच सर वॉल्टर स्कॉट १८३२ त मरण पावला; परंतु त्याच्या बुद्धींतील काव्यनिर्झर १८१५ तच आटलें. त्यापुढें त्यानें मुळीं कविता लिहिलीच नाहीं. त्यास वाटलेंच कीं, आतां तो रस कांहीं उतरावयाचा नाहीं. असो; केवळ एकदेशीय अनुमानावर बसविलेले सिद्धांत अनिश्चित ठरण्याचा कसा संभव आहे, त्याचा एक मासला वाचकांस दाखविला.

अशाच प्रकारचे मासले भर्तृहरीच्या प्रसिद्ध तीन शतकां-संबंधानें आहेत. कोणी ह्मणतो, त्या सर्व कविता एकानें केल्याच नव्हेत; तर कोणी तरी आपल्या टिप्पणवहींत चांगले चांगले वेंचे उत-रून ठेवले होते, तेंच हें शतकत्रय. यास पुरावा ह्मटला तर इतकाच कीं, यांतील श्लोक इतर पुस्तकांत सांपडतात. कालिदासाच्या शाकुंतलांत एक, विशाखदत्ताच्या मुद्राराक्षसांत दोन व शूद्रकाच्या मृच्छकटिकांत एक; परंतु यासंबंधानें पूर्वपक्ष करणाऱ्या मंडळीस आणखी कांहीं दुसरें बोलतां येत नाहीं. हे श्लोक शतकांत नाटकांतून कोणी मागाहून घातले असतील, अगर नाटककारांनीं शतकांतून घेतले असतील

किंवा जनप्रवादाप्रमाणें हे सर्वतोमुखी असल्यामुळें, त्यावर कालिदासादिकवींचा किंवा शतककारांचा विशेष हक्क नसल्यानें, प्रसंगास अनुसरून आपापल्या पुस्तकांत वाटेल त्यानें ग्रथित करावे, असें स्वातंत्र्य असेल. अशा नानाप्रकारच्या कोट्या सुचवून भर्तृहरीचें शतकत्रयरचयितृत्व स्थापित करण्याचा प्रघात आहे. कोणी ह्मणतात कीं, भर्तृहरि राजा होता व त्याचे दरबारच्या कोणी कवीनें हीं अप्रतिम पद्यें करून, राजकर्तृक ह्मणून प्रसिद्ध केलीं. कसेंही असो. हीं शतकें ज्यानें केलीं त्यास भर्तृहरि ह्मणण्यास आह्मांस कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. कारण, या शतकांशिवाय भर्तृहरीविषयीं व्यक्तिदृष्ट्या खात्रीलायख माहिती बिलकुल नाहीं. आपल्या भार्येच्या दुर्वर्तनामुळें त्यास वैराग्य उत्पन्न झालें, अशी दंतकथा आहे; तिला आधार काय तो एक श्लोक. त्यावर बिलकुल विश्वास ठेवणें शक्य नाहीं; कारण, दुसरें कांहीं प्रमाणें असल्याशिवाय, इतर ठिकाणाप्रमाणें प्रथमपुरुषाचा अर्थ, सर्वसाधारण जन असाच घेणें भाग आहे. **भर्तृहरिनिर्वेद** ह्मणून **काव्यमालेंत** प्रसिद्ध झालेलें नाटक आहे. त्यांतील कथानकावरून, त्याची राणी उत्तम पतिव्रता होती असें ह्मणावें लागेल. या नाटकांत ( काव्यमाला पु० २९) आपली पत्नी मरण पावल्यावर राजा शोकविव्हल झाला असतां, एका गोसाव्यानें, त्याचप्रमाणें आपल्या फुटलेल्या मडकीबद्दल आक्रोश-करण्यास प्रारंभ केला. राजानें तें ऐकून फुटलेली मडकी पुनः कशी मिळेल असा बुद्धिवाद सांगून, गोसाव्याचें समाधान करण्याचा यत्न केला. परंतु तोच बुद्धिवाद आपल्या गळ्यांत पडल्यानें त्याच्या बुद्धीस वैराग्य उत्पन्न झालें, असें वर्णिलें आहे. हाही दंतकथेचाच भाग दिसतो. नाटक करण्यास संविधानक बरें आहे. **हरिहरोपाध्यायानें** त्याचा उपयोगही चांगला केला आहे. परंतु भर्तृहरीविषयीं यथार्थ ज्ञान करून घेण्याच्या मार्गांत आमचें एकही पाऊल पुढें पडत नाहीं.

ज्या तीन शतकांविषयीं इतकी अपुरी माहिती आहे, व शाकुंतल, मृच्छकटिक, मुद्राराक्षस, शार्ङ्गधरपद्धति व दशरूपावलोक इत्यादि ग्रंथांत, ह्या शतकत्रयांतील उतारे आहेत, त्यांस बरेंच पुराणत्व

देण्याकडे आजपावेतों कल झाला आहे. परंतु ज्याच्या कालाचा निश्चित निर्णय करणें अशक्य होऊन बसलें आहे, त्याचा एक शंभर श्लोकी हस्तलेख, भर्तृहरिकृत विज्ञानशतक नामेंकरून उपलब्ध झाल्या बरोबर, ठाम निर्णय करूं पाहणें हे जरा धाडसाचेंच आहे असें आह्मांस वाटतें. सकृद्दर्शनीं विज्ञानशतकाच्या भर्तृहरिकृतृकत्वासंबंधानें शंका येते ती ही कीं, हें एकटेंच इतकें अप्रसिद्ध किंवा सर्वथा अश्रुत कां रहावें? मि० कोल्ब्रुकचें 'तीन किंवा चार' हें ह्मणणें आह्मास विस्मृति-मूलकच वाटतें. तीन शतकें सर्व लोकांस प्रिय होऊन बसलीं आहेत; आणि चवथ्याचा पत्ता देखील नसावा हें आश्चर्य आहे? प्रसिद्ध झाल्यानंतरदेखील याची प्रत कोठेंच बाहेर येत नाहीं, हाही चमत्कार आहे; परंतु हा आक्षेप कांहीं मोठासा नाहीं. कारण, प्रत्येक नवीन उपलब्ध झालेल्या ग्रंथावर हा येण्याचा संभव आहे. परंतु या पुस्तकाच्या आणखी कांहीं प्रती मिळेपर्यंत, एकेवेळीं तरी हें शतक लोकप्रिय होतें, असें सिद्ध होणार नाहीं. प्रस्तुत पुस्तकांत अव्यक्त स्थलें अनेक राहिलीं आहेत. ज्या सन्मान्य कुलांत हें पुस्तक सापडलें, त्यांत तरी याचें पौन:पुन्यानें अध्ययन होत होतें, असेंही दिसत नाहीं. कारण, शंभर श्लोकांत सुमारें पंचवीस तीसाहून अधिक ठिकाणीं संदिग्ध स्थलें असल्यानें, शास्त्रीबोवांस त्यांची पूर्तता करून घेणें भाग पडलें आहे. या एवढ्या गोष्टीवरूनच आह्मास वाटतें कीं, हा ग्रंथ नुसता जसा सांपडला तसा छापून काढला असता-तर बरें झालें असतें. त्यांत शुद्धाशुद्धी करावयास नको होती. आतां केली आहे. तीं स्थलें कांहीं शास्त्रीबोवांनीं लपविलीं नाहींत; उलट एका अर्थी विचाराची पूर्तता करण्यासाठीं त्यांची मदत होते. परंतु यांत एक विशेष असा आहे कीं, संदिग्ध स्थलांचा एकाद्यानें केलेला निर्णय एकदम पुढें आला म्हणजे तोच खरा वाटूं लागतो. मग वाचकांच्या बुद्धीस अवकाश नाहींसा होतो. यासाठीं मूळ तसेंच देऊन, अखेर टीपेंत, निदान त्या पानाच्या खालीं तरी दिल्यानें तितकी वाचकास मोकळीक राहते व स्वतंत्र प्रयत्न करण्यास अवकाश मिळतो. नुसत्या पुस्तकांतच प्रकाशन करून, नंतर कांहीं प्रती दुसऱ्या ठिकाणाहून मिळतात किंवा कसें [illegible] [illegible]

पाहून, मग या पुस्तकास प्रस्तावना किंवा- ग्रंथस्वरूपविवेचनलेख लिहिला असतां तर बरें झालें असतें, असें आमच्या अल्प मतीला वाटतें. नुसता ग्रंथ पाहून चार लोकांचें ह्मणणें काय पडतें तें पाहण्यानें, शास्त्रीबोवांस आपली प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं मदत झाली असती. त्यांच्या हातीं आलेला ग्रंथ— त्यांतील काहीं पद्यें फार सरळ व मनोहर आहेत; व सरतेशेवटीं भर्तृहरिचें नांव व हा ग्रंथ आपल्या परमपूज्य पूर्वजांच्या संग्रहीं सांपडलेला असा—प्रसिद्ध करून वे० शा० सं० रा० रा० कृष्ण-शास्त्री घुले यांनीं आपल्या देशबांधवांवर मोठे उपकार केले आहेत यांत शंका नाहीं. परंतु हें पुस्तक प्रसिद्ध भर्तृहरीचेंच असें ह्मणण्याचें कामीं जरा घाई केली असें आह्मांस वाटतें. आह्मीसुद्धां जें विवेचन पुढें करणार आहों, त्यास दुसरी बाजू सांपडणार नाहींच असा हट्ट नाहीं. पण ' वादे वादे जायते तत्वबोधः '; केवळ प्रांजलपणानें व सद्बुद्धीनें वाद चालविला ह्मणजे झालें.

आतां प्रस्तुत पुस्तक अलीकडील कालांत झालें असावें असें ह्मणण्यास व विशेषतः तें भर्तृहरीचें नसावें असें आह्मांस कां वाटतें तें सांगण्यास प्रारंभ करितों. जसे अनेक कालिदास झाले, तसे अनेक भर्तृहरीही होऊन गेले असतील. लुप्त ग्रंथांत आणखी कित्येक शतकें लुप्त झालीं असतील. शतकांची प्रवृत्ति घालून देणारा महाभर्तृहरी होऊन गेल्यावर, शतकें करून भर्तृहरीचें नांव घालण्याचा कदाचित् प्रघात पडला असेल; कदाचित् अगदीं १७ व्या शतकांत खरोखर भर्तृहरी नांवाच्या एखाद्या कवीनें हें शतक निर्माण केलें असेल. महाभर्तृहरी प्रमाणभूत मानून, त्याच धोरणावर एक चवथें शतक करूनही ठेविलें असेल. कसेंही असो या तर्कजालांत पडण्यांत अर्थ नाहीं.

सकृद्दर्शनीं पुस्तक उघडल्याबरोबर, मंगलाचरणाचा श्लोक पाहि-ल्याबरोबर विज्ञानशतक शतकत्रयकर्त्याचें नसावें असें वाटूं लागतें. त्या तीनीही शतकांत कोठेंही पूज्यत्वानें गणपतीचा उल्लेख दिसत नाहीं, मग मंगलाचरण तर राहू द्या. ' विघ्ननगातें भग्न कराया ' गण-पतीस, संस्कृत कवींनीं बोलाविलें नाहीं असें आह्मीं ह्मणत नाहीं. त्याची

भक्तिभावानें चेष्टा करून, भवभूतीनें त्याला याच
आहे. परंतु तीन शतकांत ज्याचा स्तव नाहीं,
चवथ्या शतकांत अग्रस्थान मिळावें हें संभवनी
विज्ञानशतक या नावांस साजेल असें तर मंग
परंतु आपल्या समाजांतील नित्य संप्रदायाप्रमाणें
गणपतिं हवामहे ' असें ह्मटल्याशिवाय या कवीस
झालें नाहीं, असा आमचा ग्रह झाला आहे. पु
तीय ह्मणून द्वितीयमंगलाचरण केलें आहे. तें
वैराग्य शतकांस अनुसरून आहे. तथापि हें शत
रीचें असतें, तर त्या दोन शतकांचेंच मंगलाचरण
ठेविलें असतें, असा एक आमच्या विचाराचा प्रवा
केल्याशिवाय आह्मांस राहवत नाहीं.

२. नुसतें वरवर पाहण्यावरूनही दिसून येणार
आहे कीं, प्रस्तुत शतक एकाद्या अर्वाचीन कवी
गणवृत्तांत लिहिलेलें आहे. शतकत्रयामध्यें मोठी
नाहीं; परंतु अनुष्टुप् व आर्या हीं लहान वृत्तें म
व सुकविकृतीचें सौंदर्य व स्वारस्य वृत्तावर अवलंबून
अत्यंत उदात्त व गंभीर विचार, या छोटेखानी वृ
दृष्टीस पडतात.

असो; अशाप्रकारें भर्तृहरीच्या शतकत्रयांतील
अगदीं लहान व कविदंभाभावाची पूर्ण मात्र प
प्रस्तुत विज्ञानशतकांत नाहीं. अनुष्टुप् व आ
विज्ञानशतकांच्या भर्तृहरीस आहे असें नाहीं; तर
वृत्तें ह्मणजे इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, उपजाति, वंश
विलंबित वगैरे प्रायः काव्यवाङ्मयांत पदोपदीं
वृत्तांचा या शतकांत पूर्ण अभाव आहे. यापैकी
प्राचीन भर्तृहरीचे अतिमनोहर व हृदयास भि
आहेत. आतां हें खरें कीं, इतर दोन्ही

शतकांत मोठ्या वृत्तांतील श्लोक अधिक आहेत; पण त्या शतकांत देखील लहान वृत्तांवर कवीची अगदीं इतराजी नाहीं. वैराग्य शतकांत सुमारें ३८ शार्दूलविक्रीडित वृत्तांतील श्लोक आहेत. २७ शिखरिणी आहेत, ९ स्रग्धरा व बाकीचे सुमोर ४० श्लोक इतर लहानमोठ्या वृत्तांत आहेत. त्यांत निदान १० तरी अनुष्टुप् खास आहेत. एकंदरींत अर्वाचीन भर्तृहरीची ही अल्पाक्षरवृत्तपराङ्मुखता प्राचीन भर्तृहरीशीं त्याचें तादात्म्य करून देण्यास विघ्नभूत होत आहे, हें पुढील आंकड्यावरून चटदिशीं लक्षांत येईल. सर्व **विज्ञानशतकांत** काय तीं सातच वृत्तें आहेत.

| | |
|---|---|
| शार्दूलविक्रीडित—४० | हरिणी—४ |
| शिखरिणी—२२ | मंदाक्रांता—४ |
| स्रग्धरा—१९ | मालिनी—२ |
| वसंततिलका—१० | |

३. प्रसिद्ध शतकत्रयांत जी सुबोधता व जो प्रसाद सर्वत्र दिसून येतो, ती सुबोधता व तो प्रसाद प्रस्तुत **विज्ञानशतकांत** अनुभवास येत नाहीं, ही गोष्ट आंकड्यानें सिद्ध करतां येण्याजोगी नाहीं. यासंबंधांत आपली खात्री करून घेण्यासाठीं, तें शतक वाचूनच पाहिलें पाहिजे. **विज्ञानशतकांतील** कांहीं श्लोक सरळ व सुबोध आहेत. ह्मणून नुसतें कोणाचें तरी काव्य ह्मणून पुढें आलें असतें तर आह्मीं त्याचें अभिनंदन केलें असतें; परंतु भर्तृहरीचें ह्मणून पुढें आल्यावर, त्यास इतकें उच्चस्थान बिलकुल देववत नाहीं. भर्तृहरीचीं शतकें पाहून पुढें पुष्कळांनीं शतकें केलीं आहेत; त्यांपैकीं कांहीं **काव्यमालेंत** प्रसिद्धही झालीं आहेत, व त्यांतील विचार पुष्कळ अंशीं भर्तृहरीच्या विचाराशीं साम्य पावतात. त्या सर्व शतकांची व **जगन्नाथ पंडितरायांच्या भामिनीविलासांतील** निरनिराळ्या विलासांची पद्धति एकच आहे. अशाप्रकारच्या स्फुट काव्यांची कल्पना कदाचित् भर्तृहरीपासूनच उद्भवली असेल व त्याचें अनुकरण करणाऱ्यांपैकींच एक **विज्ञानशतकाचा** कर्ता हाही असावा असा आमचा ग्रह झाला आहे. कमीअधिक मानानें या

अनुकारकांची योग्यता ठरवितां येण्याजोगी आहे. त्या विवेचनाचें हें स्थल नाहीं. शिवाय या कवीची कृति शुद्ध अशी वाचकवृन्दापुढें आलेलीही नाहीं. शास्त्रीबोवास एकच प्रत मिळाली, त्यांत श्लोकांच्या संख्येच्या जवळजवळ निमी स्थलें अशुद्ध किंवा अस्पष्ट पाठानीं आहेत. एक श्लोक ( १७ ) अगदीं सर्वथा वाचकांस हात टेकविणारा आहे, ह्मणजे बिलकुल अर्थबोध होत नाहीं. एक श्लोक तर ( ८९ ) अजीबातच सांपडत नाहीं. शिवाय ठिकठिकाणीं शास्त्रीबोवानीं शुद्ध करून छापिलेलीं स्थलें आहेत. अशा स्थितीतूनही कवीचें काव्य-निर्माणकौशल्य बऱ्याच उच्च प्रकारचें आहे असें दिसतें ; परंतु अस्सल कवीची प्रतिभा त्यांत नाहीं हें खास. एकही नवीन कल्पना व नवीन मजेदार पद्धतीची रचना त्यांत दिसत नाहीं. भर्तृहरिसारखे विचार जेथें आहेत, तेथें त्याचीच सरळ सुबोध वाक्यरचना नसल्या-कारणानें, रत्न उकिरड्यावर पडल्याप्रमाणें दिसतें. एकंदरीनें भर्तृहरीच्या वैराग्यशतकाच्या धर्तीवर एक शतक लिहून, त्यास विज्ञानशतक नांव देणारा हा भर्तृहरीनामक अर्वाचीन कवि असावा अशी कल्पना होते आहे. चांगल्या कवींचे विचार उचलून, ते आपल्या शद्बांनीं व्यक्त करून दाखविण्यापेक्षां, त्याचे ते मूळच पाठ केलेले चांगलें. परंतु विज्ञान-शतकाच्या कर्त्यास हें आवडलें नाहींसें दिसतें. पुढील दोन श्लोकांची तुलना करावी, अशी आह्मी वाचकांस सूचना करितों.

वै० श०—यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः
स पण्डितः स श्रुतवान्गुणज्ञः ।
स एव वक्ता स च दर्शनीयः
सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ति ॥ ४१ ॥

वि० श०—आढ्यः कश्चिदपंडितोऽपि विदुषां सेव्यः सदा धार्मिको
विश्वेषामुपजारको मृगदृशामानन्दकन्दाकरः ।
कर्पूरद्युतिकीर्तिभूषितहरिद्भूमण्डले गीयते
शश्वद्बन्दिजनैर्महीतनुभृतः पुण्येन कस्योदयः ॥८२॥

४. आतां प्राचीन भर्तृहरीच्या कृतीमध्यें ज्या क्लिष्ट शब्दांचा प्रयोग आला नाहीं, व येण्याचा संभव कमी अशा कांहीं शब्दांचा प्रयोग विज्ञानशतकांत आल्यानें हें शतक त्या भर्तृहरीचें नव्हे असें वाटतें. उदाहरणार्थ :—

| | |
|---|---|
| ३८ उत्क्रान्तिभाज: = मरणाधीना: | ८२ उपजारक = मोहजनक. |
| ४९ सुपर्वस्रवन्ती = गंगा | ८६ हित्वा = विलयं नीत्वा. |
| ५३ सर्वंसहा = पृथ्वी | ८६ उपरीहा = मोक्षेच्छा. |
| ६१ प्रालेयाचल = हिमालय | ९९ दुश्चक्ष = भीमदर्शन. |

५. शतकत्रयांत भर्तृहरीनें कित्येक व्याकरणदृष्ट्या प्रमाद केले आहेत; परंतु त्या ठिकाणीं दुर्बोधता आली नाहीं. विज्ञानशतकांतील पुढील प्रयोग पाहून तसे प्रयोग प्राचीन तीन शतकांत नसल्यामुळें, त्यांचें भिन्न-कर्तृकत्व मानावें हेंच बरें दिसतें.

| | |
|---|---|
| ११ प्रबलदुरितानीतविधुरम् | २७ चेतोमुकुन्दप्रिय: |
| १२ श्रुतिजनितविश्वासमुषित: | ३० संपत्तिगृहा: |
| १६ अवगतगुण: | ३० उन्मुल |
| २६ अहोऽस्त्यर्थे | ५१ अर्थार्थिततया |
| २६ श्रुतिशतगुरुभ्याम् | १०२ सुविशदत्रयम् |

६. संसाराविषयीं वैरस्य उत्पन्न करण्याच्या बुद्धीनें केलेला श्लोक (८०) वाचून पाहतां, त्यांतील कांहीं शब्द, अगदीं अलीकडील ह्मणजे मराठी भाषेंतील आहेत असे भासतात. 'हिक्काकासभगंदरोदर महामदज्वरैराकुल:' यांपैकीं हिक्का व भगंदर पूर्वभर्तृहरीच्या वेळीं नसतील असें वाटतें. तसेंच 'दलयति कीलदन्तान्' ( ४९ ) ही लोकोक्ति मराठी भाषेंतील दिसते. हें अर्वाचीनत्वाचें चिन्ह आहे.

७. विज्ञानशकांचें अर्वाचीनत्व अधिक स्पष्टपणें स्थापण्याजोगे त्यांत पांच ( २८, ६१, ६६, ६७, ९६ ) श्लोक आहेत; त्यांत मुसलमानांपासून हिंदुभूमीस झालेल्या त्रासाचें वर्णन असावें असा भास होतो. म्लेच्छ ह्मणजे शक असें शास्त्रीबोवांचें ह्मणणें आहे; पण त्यांच्या जुलुमास, शास्त्रीबोवांचेच

म्हणण्याप्रमाणें कवीच्या पूर्वी दोन शतकें होऊन गेलीं होतीं, असें मानण्यापेक्षां सद्यःस्थितीस अनुलक्षूनच हीं पद्यें असावींत असें समजणें अधिक सयुक्तिक होणार नाहीं काय? असें शास्त्रीबोवांस आम्ही सविनय सुचवितों. भागीरथीच्या दोन्ही तटांवर म्लेछांचा अंमल असल्यामुळें धर्माचरणास विघ्न होतें, व यवननृपति राज्य करीत आहे हें शकापेक्षां मुसलमानी लोकांस अधिक लागू पडेल असें वाटतें.

भर्तृहरीचा वैराग्यशतकांतील श्लोक सामान्य असल्यानें, त्यापासून कांहींच अनुमान काढतां येणार नाहीं. त्यांतील ' क्षितितलभुजः शास्त्रविमुखान् '(२८)याचा व ' प्रभवः स्मयदूपिताः' ( वै. श. २ ) याचा अर्थ जवळजवळ एकच. विद्येचा कोणी भोक्ता नाहीं, इतकीच कवीची रड आहे. हल्लींसुद्धां लोकांचें लक्ष लावण्यासाठीं, विद्येचा लोप झाला, कोणास ज्ञानाची गरज नाहीं, अशी ओरड सुरू आहेच. हें म्हणणें वेगळें आणि पुढील श्लोकांत वर्णन केलेल्या धांगडधिंग्यामुळें विद्यादेवीचें काय होईल हें म्हणणें वेगळें.

निस्सारा वसुधाधुना समजनि प्रौढप्रतापानल-
ज्वालाजालसमाकुला द्विपघटासंघट्टविक्षोभिता ।
म्लेच्छानां रथवाजिपत्तिनिवहैरुन्मीलिता कीदृशी-
यं विद्या भवितेति हन्त न सखे जानीमहे मोहिताः ॥ ६६ ॥

मागच्या पुढच्या श्लोकावरून अविंधांच्या राज्यास कावलेल्या कवीचे उद्गार आपण वाचीत आहों असा स्पष्ट ग्रह होतो.

८. विज्ञानशतकाचें अर्वाचीनत्व स्थापन करण्याजोगें दुसरें एक प्रमाण असें आहे कीं, त्यांत प्रसिद्ध शतकत्रयापेक्षां शंकराचार्यांच्या वेदांततत्त्वांचा उल्लेख स्पष्टपणें आहे. शंकराचार्यांचें 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असें प्रतिपादन आहे. उपनिषदांचा सिद्धांत अद्वैत व आचार्यांचाही तोच: परंतु त्यांतील भेदाचें निरूपण विद्वद्वर्य डा. भांडारकर यांच्या व्याख्यानाच्या साहाय्यानें शास्त्रीबोवांनीं आपल्या प्रस्तावनेंत सुरेख केलें आहे. त्याचा मथितार्थ इतकाच कीं. दूध व दहीं हीं जशीं एकच, तसें जगांतील सर्व

पदार्थ एकरूप होत. दुधाचें रूपांतर दहीं. पण रूपांतर झालें ह्मणजे कांहीं वस्त्वंतर ह्मणजे वस्तूचा निराळेपणा होतो असें नाहीं. ह्मणून अद्वैत मत खरें असा उपनिषदांचा रोख आहे. परंतु **आचार्य** ह्मणतात कीं, मानवी बुद्धि अविद्येनें अगर मायेनें ग्रस्त झाल्याकारणानें, तीस जगांतील पदार्थ खरे वाटतात; वस्तुतः सर्व खोटें आहे, ब्रह्म तेवढें खरें. त्याचे ठिकाणीं निरनिराळ्या स्वरूपाचे भ्रम उत्पन्न होतात. जसें स्वप्नांत एकादा माणूस घोड्यावर बसून फेरफटका करतो व जागा झाल्यावर तें खोटें असें जाणतो, तद्वत् हे सर्व जगांतील व्यवहार आहेत. पुढें पडलेल्या दोरीस पाहून आपण साप साप ह्मणून भिऊन पळत नाहीं काय? पण शांतपणें पाहिल्यावर आपल्या भ्रमाचा निरास होतो. तसा भ्रमाचा निरास होईपर्यंत, आपण अमुक्त राहणार आणि मुक्ति ह्मणजे दुसरें कांहीं नाहीं; आपण व ब्रह्म असे दोन नाहीं हें उमजणें. असो; तात्पर्य इतकेंच कीं **विज्ञानश-तकांत शंकराचार्यांचे** दृष्टांत व कांहीं त्यांच्या परिभाषा ( १२, १९, २९, २६, ३३, ८६, ८८, ९०, ९१) वगैरे स्पष्टपणें आल्या आहेत. तसा प्रकार प्रसिद्ध शतकत्रयांत नाहीं. यावरून **विज्ञानशतक शंकरा-चार्यांच्या** नंतर झालें असें ह्मणावें. परंतु त्या बरोबर इतर शतकांस अलीकडे ओढतां येणें शक्य नाहीं, असें आह्मांस वाटतें.

९. याहूनही **विज्ञानशतकाचें** अर्वाचीनत्व व भिन्नकर्तृकत्व स्थापनकर-ण्यास सबळ पुरावा आहे; तो हा कीं, भर्तृहरीच्या वैराग्यशतकांत अगर इतर शतकांत **ब्रह्मा, विष्णु, महेश्वर** याच तीन देवांचा उल्लेख आहे. त्यांत भर्तृहरीनें आपला सर्वांविषयीं समभाव प्रकट केला आहे. अधिक भक्ति एकापेक्षां दुसऱ्यावर आहे असें ह्मटलें, तर ती **शिवावर** आहे असें स्पष्ट ह्मटलें आहे.(वै.९९) परंतु **विज्ञानशतकांत** तसें नाहीं. काशीचा, गंगेचा व विश्वेश्वराचा स्तव आहेच; परंतु **चक्रपाणि, श्रीकृष्ण, श्रीरंग, गोपाल, मुकुंद** हीं भागवतसंप्रदायाचीं नावें आलीं आहेत. कृष्णाचें हें गोपीरमणाचें स्वरूप प्राचीन कवींत, अर्थात् **कालिदासभवभूत्यादिकांत** दृग्गोचर होत नाहीं. यावरून वाचकांनीं श्लोक १३, २७, ४८,

९७, ८९, १०० हे पाहून विचार करावा कीं, याप्रकारचा श्रीरंग-भक्त किंवा

' पुष्पन्नीलोत्पलाभे मुरजिति कमलावल्लभे गोपलीले '  ९७

' दत्तचित्त ' असा जर भर्तृहरि असेल, तर वरीलप्रमाणें शंकराविषयीं उद्गार काढील कीं काय ? सर्व देव येथून तेथून एकच, असें ह्मणून क्षणभर हें शक्य धरलें, तरी पूर्वींच्या शतकांत यांचा एकदोनदां तरी उल्लेख आला नसता काय ?

आतां या शतकांत सुमारें १० श्लोक तरी सापडतील कीं, तेवढेच दाखविले तर, ते भर्तृहरिचे नव्हेत असें ह्मणण्यास फार अडचण पडली असती. ह्मणण्याचा अर्थ इतकाच कीं, या श्लोकांमध्यें भर्तृहरीच्या नाण्याचा आवाज आहे. अशांपैकीं एकच येथें मासल्यासाठीं देतों.

शिव शिव महाभ्रान्तिस्थानं सतां विदुषामपि
प्रकृतिचपला धात्रा सृष्टाः स्त्रियो हरिणीदृशः ।
विजहति धनं प्राणैः साकं यतस्तदवाप्तये
जगति मनुजा रागाकृष्टास्तदेकपरायणाः ॥ ९८ ॥

येथवर आह्मांस वाटलें त्या दिशेनें पुस्तकपरीक्षण केलें आहे. शास्त्रीबोवांनीं समकर्तृकत्व स्थापन करण्याविषयीं पुढें आणलेल्या युक्तींचें विवेचन—खंडन ह्मणत नाहीं—वर येऊन गेलें आहे. शब्दसादृश्य व विचारसादृश्य किंवा एतदुभयसाम्य यावरून कांहींच सिद्धांत बांधितां येत नाहीं. एकंदरीनें **विज्ञानशतक** हें एका अर्वाचीन विद्वान् पंडिता-कडून झालेलें भर्तृहरीच्या वैराग्यशतकाचें अनुकरण किंवा नक्कल आहे, असें आह्मांस वाटतें. स्त्रीनिंदा, गंगावर्णन, काशीस्तव, तपोवैय्यर्थ्य संसारतुच्छता, इत्यादि प्रकरणें जशींच्या तशींच नवीन, पण अधिक मनोरम नव्हे, अशा रीतीनें रचिलेलीं दृष्टीस पडतात. कांहींचा मूळांत संकोच असल्यास येथें विस्तार आहे, व कांहीं सुरेख विचार अजी गाळले आहेत. क्वचित् अर्वाचीन वेदांतशास्त्रीय परिभाषा श्लोकांत

वातल्यानें दुर्बोधता आली आहे, व ते श्लोक काव्य या रुचिर पदवीस मुकले आहेत.

भर्तृहरीनें वैराग्यशतक रचिलें असतें तर त्यांत काय विषय आला असतां हें सांगणें फार कठीण आहे; पण नुसती वैराग्यशतकाची पुनरावृत्ति मात्र खचित काढली नसती, असा आमच्या अल्प मतीचा अभिप्राय आहे. वैराग्य खंड्य आहे, त्याज्य व निंद्य आहे, जगास कंटाळून भ्याडपणें अरण्यवासाचा अंगीकार करण्यांत पौरुष नाहीं व मोक्षप्राप्तीहि नाहीं असा भगवद्गीतेचा संकलित सदुपदेश आहे. काव्य-ग्रंथांतही मोहापासून पळून जाणाऱ्या भागुबाईस नीतिमान् ह्मणणें ह्मणजे नपुंसकास सत्वस्थ ह्मणावें लागेल, दुर्बलाची क्षमाशील ह्मणून स्तुति करावी लागेल, व निष्कांचन मनुष्याचा व्यसनपराङ्मुखतेबद्दल धन्यवाद गावा लागेल. तसें बिलकुल नीतिशास्त्रास पसंत नाहीं. **गोल्डस्मिथ** कवि ह्मणतो:—

'Virtue is not virtue that tumbles'

तसेंच कविकुलगुरु **कालिदासाची** ही उक्ति स्मरणीय आहे.

'विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः'

तात्पर्य, सांगावयाचें इतकेंच कीं, वैराग्य हा संसारास वैतागलेल्या माणसाचा आश्रय; परंतु शूर कार्यक्षम सत्वशाली पुरुषास संसारांत राहून निखिल प्राणिजाताच्या हितासाठीं झटणें, हेंच उचित आहे. आणि **रामदासगुरु श्रीसमर्थ** यांणीं आपल्या **वैराग्यशतकानंतर** जें ज्ञानशतक रचिलें आहे, त्यांत हेच विचार आहेत. त्यापैकीं एक अभंग देऊन हा लेख संपवितों.

ब्रह्मारण्य सेवी। साधू तो एकला।
जना नाहीं आला। उपेगासी॥ ८८॥

---

# वररुचीचा काल.

वररुचीच्या ' प्राकृतप्रकाश ' नांवाच्या व्याकरणग्रंथांत महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी व पैशाची ह्या चार मुख्य प्राकृत भाषांचें वर्णन आढळतें. ह्या ग्रंथांत आमच्या मराठी भाषेची जननी जी प्राचीन महाराष्ट्री तीस, इतर सर्व प्राकृत भाषांपेक्षां अधिक मान व श्रेष्ठत्व दिलें आहे. अर्थात् प्राकृत भाषांचें हें व्याकरण वररुचीनें ज्या काळीं रचलें, त्या काळीं भरतखंडांत मुख्य ह्मणून मानलेली व अति भरभराटीच्या स्थितींत असलेली भाषा महाराष्ट्रीच होती यांत संशय नाहीं. ह्मणून तो काल कोणता ह्याची माहिती प्रत्येक महाराष्ट्रीयास असणें अवश्य आहे.

'प्राकृतप्रकाश' रचणाऱ्या वररुचीचा काल ठरला ह्मणजे प्राचीन महाराष्ट्री भाषेच्या उत्कर्षाचा काल आपोआप निश्चित होईल, हें उघड आहे. वररुचि हा सर्व प्राकृत वैय्याकरणांत प्रथम नसला तरी तो प्राचीन होय, ह्याविषयीं वाद नाहीं. कारण, संस्कृत वैय्याकरणांमध्यें पाणिनीस मान मिळतो, तोच मान प्राकृत वैय्याकरणांत वररुचीस देण्यांत येतो. प्राय: सर्व प्राकृत व्याकरणकर्त्यांनीं त्याचेंच अनुकरण केलें आहे. व त्यास " प्राकृत शास्त्राचें " आदिगुरुत्व दिलें आहे. शाकल्य, भरत, कोहल व पाणिनि ह्यांचीही आदिगुरुमंडळींत गणना आहे, व ते वररुचीहून

---

१ मलयगिरी व केदारभट्ट नांवाचे दोन प्राचीन ग्रंथकार, पाणिनीनें प्राकृत भाषेचें व्याकरण केलें आहे, असा उपन्यास करितात.

पाणिनिर्भगवान् प्राकृतलक्षणमपि वक्ति संस्कृतादन्यत्। ( केदारभट्ट )

प्राकृते हि लिंगं व्यभिचारि, यदाह पाणिनि: स्वप्राकृतलक्षणे

मलयगिरी

हा पाणिनी कोण असावा अगर कोणत्या शतकांत उदयास आला असावा, त्याविषयीं कांहींच माहिती कळत नाहीं.

प्राचीन दिसतात. परंतु त्यांचे ग्रंथ कोणास कोठेंही उपलब्ध नसल्या-मुळें वररुचीच्या ग्रंथासच " आदिप्राकृतव्याकरण " ह्मणण्याचा परिपाठ आहे. परंतु एवढ्यावरून वररुचीचा काल कोणता, तें कांहींच ठर-वितां येत नाहीं. तथापि---

॥ रत्नानि वै वररुचिर्नव विक्रमस्य ॥

ह्या सर्वतोमुखी असलेल्या सुप्रसिद्ध श्लोकावरून तो इ. स. पूर्वीच्या प्रथम शतकांत हयातींत होता, असा एतद्देशीय संस्कृतज्ञ पंडितांचा समज फार दिवसांपासून आहे, हें निर्विवाद सिद्ध होतें. विद्वद्वर्य डा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर ह्यांनीं रचलेल्या 'दखनचा प्राचीन इतिहास' नांवाच्या ग्रंथांत शातवाहन वंशीय राजाच्या अमलांत महाराष्ट्रीय भाषेची जी भरभराटीची स्थिति वर्णिली आहे, तीवरून विचार करतां, वररुचीच्या कालाविषयीं आमच्या प्राचीन पंडितांचा समज चुकीचा नाहीं, असेंच ह्मणावें लागतें. सुप्रसिद्ध इतिहासकार डा. हंटर ह्यांचेंही असेंच मत आहे. प्रो. लासेन ह्यांच्या मतें इ. स. पहिल्या शत-काच्या मध्यभागीं ह्मणजे ज्या कालीं शालिवाहन हाल ह्यांनीं सप्तशती रचिली त्या काळीं वररुचीचा आविर्भाव झाला होता. सोमदेवकृत 'कथासरित्सागर' नांवाच्या ग्रंथांत अशी आख्यायिका आहे कीं, वररुचि ह्यांनीं सांगितलेल्या कथा काणभूतीपासून ऐकून घेऊन प्रतिष्ठानाधिपति शातवाहन राजाच्या गुणाढ्य नामक सभापंडितानें "बृह-त्कथा " ग्रंथ रचला. ह्यावरून तो वररुचि शातवाहनाचा समकालीन अगर त्याहून किंचित् पूर्वी प्रादुर्भूत झाला असवा असें ठरतें. डा. भांडारकरांनीं वररुचीचा काळ निश्चितपणें ठरविला नाहीं. परंतु उज्जयिनीचा राजा विक्रमादित्य व त्याचे नवरत्न हे ज्याकाळीं उदयास आले होते, त्या काळीं तो हयातींत होता व तो विक्रमाच्या नवरत्नां-

---

2. The Prákrita (that is naturally evolved dialects) found their earliest extant exposition in the grammar of Vararuchi, about the first century B. C.".——W W Hunter's Indian Empire p. 36.

पैकींच एक होता असें ते मानितात[3]. डॉ० बुल्हर, डा० पिटर्सन व प्रो० किल्हॉर्न ह्यांचीं मतें व लुधियाना येथील पंडित ज्वालासहाय ह्यांनीं ' एशियाटिक क्वार्टर्लि रिव्ह्यु ' नांवाच्या त्रैमासिकांत विक्रमाच्या कालाविषयीं चार वर्षांपूर्वीं जो निबंध लिहिला होता, त्यांतील निर्दिष्ट केलेलीं प्रमाणें, जर विश्वसनीय व समर्थनीय ह्मणून मानिलीं, तर विक्रमादित्य व वररुचि ह्यांच्या कालांविषयीं स्वदेशीय पंडितांचें व तसेंच डा. हंटर यांचें मत सत्य ह्मणून ग्रहण केल्याशिवाय गति नाहीं.

" नंदाचें राज्य मगध देशांत असतां वररुचीनें ' प्राकृतप्रकाश ' रचला " असें प्रो. भागवत ह्यांचें ह्मणणें आहे, व " महाराष्ट्र सारस्वत " ह्या निबंधाचे कर्ते रा. रा. वि. ल. भावे बी. एस्सी. ह्यांनींही तेंच मत ग्राह्य मानून आपल्या निबंधांत नमूद केलें आहे. वररुचि हा जितका प्राचीन ठरेल, तितकी महाराष्ट्री भाषाही प्राचीन ठरेल व आह्मांसही तितका आनंदच होईल. परंतु वररुचीस विक्रमशकापेक्षां अधिक प्राचीन मानण्यास काय आधार आहे, तें वाचकांस कळविण्याची तसदी रा. भागवत ह्यांनीं घेतली नाहीं व रा० भावे ह्यांसही त्याविषयीं स्वतंत्र रीतीनें कांहीं शोध करण्याची अवश्यकता वाटली नाहीं, असें दिसतें. वररुचीस, नंदाच्या समकालीन ह्मणजे शालिवाहन शकाचे सुमारें सव्वाचारशें वर्षां-पूर्वींचा मानण्यास जर कांहीं प्रमाण असेल, तर तें सोमदेवकृत 'कथासरित्सागर' ग्रंथांत वर्णिलेल्या एका आख्यायिकेवर अवलंबून आहे, असें आह्मांस वाटतें. पाणिनीच्या सूत्रावर वार्त्तिकें रचणारा जो कात्यायन त्यासच वररुचि ह्मणत व तो मगधपति नंदाचा समकालीन होता, असा उल्लेख सोमदेवाच्या ग्रंथांत आढळतो. त्या उल्लेखावरून वार्त्तिककार व वररुचि हे दोघे एकच असावेत, असा सकृद्दर्शनीं भास होण्याचा संभव आहे. ह्या भ्रमाचें पुष्टीकरण करणारी दुसरी एक आख्यायिका प्रचारांत आहे, तीही येथें सांगतों.

---

3. The date of this author is uncertain, though there is reason to believe that he was one of the nine gems of the court of Vikramaditya. (Early History of the Deccan. p. 12. 1895 Ed.

सिंहली लोकांत अशी एक परंपरागत दंतकथा प्रसिद्ध आहे—व ती समूलक आहे, असेंही आतां सिद्ध झालें आहे—कीं, त्या लोकांची धर्म-भाषा जी पालि व जीस अति प्राचीन बौद्धधर्म ग्रंथांत " मागधी " ही संज्ञा दिलेली आढळते, त्या भाषेचें व्याकरण " कच्चायणो " नांवाच्या कोणा एका विद्वानानें केलें आहे. कच्चायणो हें संस्कृत कात्यायन शब्दाचें प्राकृतरूप आहे. ह्या दोन आख्यायिकेची एकवाक्यता केली म्हणजे, प्राकृतप्रकाशकार वररुचि, पालि भाषेचा व्याकरणकर्ता कात्यायन व वार्त्तिककार कात्यायन वररुचि हे तिघेही एकच असावेत, असें अनुमान करण्याकडे मन धांवतें. पण तसें अनुमान काढल्यास तें अगदीं चुकीचें होईल, असें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

सिंहली आख्यायिकेचा नायक कच्चायणो ( कात्यायन ) व वररुचि ( प्राकृतप्रकाशकर्ता ) हे एक नव्हेत, हें त्या दोघांच्या ग्रंथावरून व मतांवरून स्पष्ट करून येण्यासारखें आहे. कच्चायणाच्या मतें मागधी ( पालि ) भाषा सर्व भाषांची मातृस्थानीया होय. तो म्हणतो—

' स मागधी मूल भाषा नरेय आदि कप्पिक । '

परंतु वररुचि हा महाराष्ट्रीस सर्व प्राकृतभाषांची जननी समजतो, व त्याच्या ग्रंथांत मागधी नामक पालिभाषेचा उल्लेखही कोठेंच आढळत नाहीं. मि० जेम्स अल्विस ह्यांनीं कांहीं वर्षांमागें कोलंबो येथें कच्चायणकृत पालि व्याकरणाचा सहावा अध्यांय इंग्लिश भाषांतरासह छापून प्रसिद्ध केला आहे, तो वाचला असतां, वररुचि व कच्चायण यांच्या भिन्नत्वाविषयीं शंका राहत नाहीं, असें प्रो० कॉवेल व प्रो० वेबर ह्यांचें मत आहे.

तसेंच पाणिनीच्या सूत्रावर वार्तिकें रचणारा कात्यायन वररुचि व प्राकृतप्रकाशकर्ता वररुचि ह्या दोघांच्या एकत्वाविषयींही शंका घेण्यास पुष्कळ जागा आहे.

---

4. Vide Prakrit Prakash of Vararuchi by E. B. Cowell (2nd. issue) Advertisement to the 2nd. issue.

(१) वररुचि नांवाचे एकाधिक ग्रंथकार असणें अशक्य किंवा असंभवनीय नाहीं. कारण, वररुचि हें नांव गुणविशेषांवरून पडण्यासारखें आहे. 'कथासरित्सागरां'त ह्या शब्दांची व्युत्पत्ति अशी दिली आहे—

> नाम्ना वररुचिश्चायं तत्तदस्मै हि रोचते।
> यद्यद्वरं भवेत्किंचित् ..... .... ॥

कथापीठ लंबक १, तरंग २, श्लोक ७०.

ह्या व्युत्पत्तीवरून आमच्या अनुमानास बळकटी येते. वास्तविक पाहतां वस्तुस्थिति ही अशीच आहे. विक्रमादित्य व कालिदास ह्याप्रमाणें वररुचि नांवाचे ग्रंथकार एकाहून अधिक होते, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. 'भोजप्रबंध' नांवाचा एक ग्रंथ आमच्या अवलोकनांत आहे, त्यांत धाराधिपति जो भोजराज त्याच्या सभेंत वररुचि नांवाचा एक विद्वान् होता, असें वर्णन आहे. ह्या भोजराजाच्या सभेंतील पंडितांच्या नाम-मालिकेंतील एका वररुचीच्या नांवाखेरीज विक्रमाच्या नवरत्नांतील इतर कोणाही विद्वानांच्या नांवाचा उल्लेख त्या ग्रंथांत[५] नाहीं, ही एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे, व ह्यावरून नवरत्नांत उल्लेखलेल्या वररुचीहून भिन्न असा कोणी तेंच नांव धारण करणारा पंडित भोजराजाच्या सभेंत होता असें ह्मणावें लागतें. हलायुधकृत 'अभिधानरत्नमाला' नामक कोशग्रंथांत कोशकार ह्या नात्यानें वररुचीचा उल्लेख[६] आढळतो. तसेंच अमरकोशाच्या टीकाकारांनीं आपआपल्या टीकेंत जागोजाग प्राचीन कोशकारांचा जो नामनिर्देश केला आहे, त्यावरून कात्यायन व वररुचि ह्या नांवाचे परस्पराहून अगदीं भिन्न असे दोघे कोशकार प्राचीन काळीं

---

५ वल्लालकृत भोजप्रबंध पृ. १९ जगदीश्वर छापखान्यांतून विक्रम शके १९४०त प्रसिद्ध झालेली आवृत्ति पहा.

6. Vide Preface to Wilson's Sanskrit Dictionary.

होऊन गेले, असें मानल्याशिवाय गति नाहीं. ह्या विवेचनावरून विक्रमाच्या नवरत्नांतील वररुचि, भोजराजाच्या सभेंतील वररुचि व कोशकार वररुचि हे एक व अभिन्न होत, असें निश्चयात्मकपणें कोण ह्मणूं शकेल? तसेंच कोशकार कात्यायन नंदाच्या वेळचा वार्त्तिककार कात्यायन, स्मृतिकार कात्यायन, अनुक्रमणिकर्ता कात्यायन व सूत्रकार कात्यायन हे सर्व एकच होत, अगर पूर्वोक्त वररूचीशीं अभिन्न होत, असें ह्मणणारा साहसिक पुरुषही विरळाच सांपडेल. ह्मणून नामसादृश्यावरून प्राकृतप्रकाशकारांचें व वार्तिककाराचें एक-व्यक्तित्व कल्पिणें सर्वथैव धोक्याचें होईल, असें आह्मांस वाटतें.

[ २ ] दुसरें असें कीं, वार्त्तिककार कात्यायनाचें अपर नाम वररुचि असलें तरी त्यांनींच प्राकृतभाषेचें व्याकरण रचलें होतें, असें मानण्यास कांहीं प्रमाण अगर पुरावा नाहीं, व कथासरित्सागरांतही तसा उल्लेख नाहीं. आतां हें खरें आहे कीं, त्या वररुचि व कात्या-यनाच्या आख्यायिकेंत सोमदेवांनीं बराच गोंधळ केलेला आहे; पण त्याचा उलगडा करणें ह्मणजे फार कठीण काम आहे, असें आह्मांस वाटत नाहीं. कारण, त्यांनीं पाणिनी, व्याडी, वार्त्तिक-कार कात्यायन, महाराज नंद, चंद्रगुप्त, शातवाहन व बृहत्कथेचा कर्ता गुणाढ्य ह्यां सर्वांस सामयिक समजण्यांत चुक केली आहे, हें ज्यास भारत-वर्षीय पुराणत्त्वांची ह्मणजे प्राचीन इतिहासाची यत्किंचित् ही माहिती आहे, त्यासही कळून येईल. नंद, चंद्रगुप्त व कात्यायन हे पाणिनि व व्याडीहून अर्वाचीन असून शातवाहन व गुणाढ्य ह्यां पेक्षां प्राचीन होत. हें पुष्कळ प्रमाणांवरून सिद्ध झालेलें आहे. ह्मणून आमचा तर्क असा धांवतो कीं, वर लिहिलेल्या राजन्य वर्गास व विद्वन्मंडळीस समकालिन समजण्यांत 'कथासरित्सागरकारा'नें जसा भ्रम केला आहे, तद्वत्च त्याचा वार्तिककार कात्यायनाचें व विक्रम शातवाहनाच्या काळांत हयातींत असलेल्या वररुचीचें एकत्व-प्रति-पादक लेख निःसंशय भ्रांतिमूलक होय.

---

७ सटीक अमरकोश— वामनाचार्य झळकीकरकृत प्रस्तावना पृष्ठ ४.

( ३ ) प्राकृतप्रकाश हें वररुचिकृत होय, असाच उल्लेख त्याच्या प्रत्येक परिच्छेदाच्या शेवटीं आहे.

( ४ ) त्या ग्रंथाच्या भामहकृत टीकेंत हीं—

" वररुचि-रचित प्राकृतलक्षणसूत्राणि लक्ष्यमार्गेण " ।

असें ह्मटलेलें आहे. त्यांत कोठेंही कात्यायनाचें नांव नाहीं.

( ५ ) तसेंच मार्कंडेयकवींद्रविरचित " प्राकृतसर्वस्व " नांवाच्या ग्रंथाच्या प्रारंभीं प्राकृत शास्त्र रचणाऱ्या पूर्वाचार्यांचा जो नामनिर्देश केला आहे, त्यांत

" शाकल्य-भरत-कोहल-वररुचि भामह--वसंतराजाद्यैः
प्रोक्तान् ग्रंथान् नाना लक्ष्याणिच्च निपुणमालोक्य
× × × × मार्कंडेयकवींद्रः प्राकृतसर्वस्वमारभते " ।

येथेंही वररूचीच्या नांवाशीं कात्यायनाचा कांहीं संबंध दिसत नाहीं.

( ६ ) वसंतराजकृत ' प्राकृतसंजीवनी ' व क्रमदीश्वरविरचित ' संक्षिप्तसार ' वगैरे ग्रंथ वररुचीच्या ग्रंथाचें अर्थवैशद्य करण्याकरितां रचलेले असून, त्यांत कोणत्याही ठिकाणीं प्राकृतप्रकाशकाराचें व वार्त्तिककाराचें अभिन्नत्व कल्पिण्यासारखा उल्लेख असल्याचें आमच्या माहितींत नाहीं. तेव्हां प्राकृतप्रकाशकाराशीं कात्यायनाचा जर कांहीं संबंध असता, तर वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथकलापांत त्याविषयींचें कांहीं तरी निदर्शन सांपडलें असतें, अशी अपेक्षा आह्मीं करूं शकतों.

( ७ ) प्राकृतप्रकाशांत महाराष्ट्रीभाषेचें जें वर्चस्व दिसून येतें, तें शातवाहनवंशीय राजाच्या अंमलांतच तीस प्रथम प्राप्त झालें होतें. नंदाच्या वेळेस त्या भाषेस तितकें महत्व आलें होतें, असें ह्मणण्यास ऐतिहासिक आधार मुळींच नाहीं. पालिभाषेचें किंवा तिच्या मातृरूपिणी ' गाथा ' भाषेचें प्रस्थ नंदाच्याकाळीं फार वाढलें होतें असें डा० भांडारकर, डा० राजेंद्रलाल मित्र, प्रो० मोक्षमुल्लर, हजसन, वेबर, बेनफे, व जॅन-म्यूर वगैरे सर्व भारतीय प्राचीन भाषाकोविदांचें मत आहे.

प्राचीन महाराष्ट्रीभाषेला जेव्हां भरती आली होती, त्यावेळेस प्राचीन पालिभाषा हळूं हळूं प्रचारांतून जात होती, हें प्राचीन शिलालेखांच्या भाषेचें पर्यालोचन केलें ह्मणजे दिसून येतें. पालि व महाराष्ट्रीभाषा लागोपाठ एकामागून दुसरी उदयास आल्याकारणानें, त्या दोहोंमध्यें जसें पुष्कळ साम्य दिसतें, तसें त्यांच्यांत अंतरही बरेंच आढळतें. महाराष्ट्री, शौरसेनी व मागधी ह्या भाषा एकाच काळीं प्रचारांत होत्या. तथापि त्यांत जो भेद दृष्टीस पडतो, तो भिन्नदेशजन्य आहे; परंतु पालि व महाराष्ट्री ह्या दोहोंत जें अंतर आहे, तें तशा प्रकारचें नसून कालांतरानें पडलेलें आहे, व त्या अंतराच्या स्वरूपावरून विचार करितां पालि ही महाराष्ट्रीपेक्षां प्राचीन ठरते.

---

८. The more reasonable conjecture appears to be that the Gatha is the Production of bards who were contemporaries or immediate successors of Sakya Singh. Dr. Rajendra Lall Mitra.

The Problem seems to have been solved at last by a native scholar Babu Rajendra Lall. Babu Rajendra Lall is right and we look upon the dialect of the Gatha as a specimen of Sanskrit, spoken by the followers of Buddha about the time of Ashok and later. Prof. Max Mullar. "डा० हजसन, प्रो० वनफे, जॉन म्यूर, व प्रो० वेबर ह्यांचीहि अशीच मतें आहेत. विस्तारभयास्तव तीं येथें दाखल करितां आलीं नाहींत. महाराष्ट्री व पालि ह्यांच्या परस्पर संबंधाविषयीं असें ह्मणतात कीं—" The latter—Prakrit— do not represent the derivative form of speech which stands nearer to the Sanskrit, and we are in a position to point out a dialect which approaches yet more closely to the latter than the prakrits do, I mean the Pali. John Muir.

These two dialects (Maharashtri and Shaurseni) stand the nearest to the Pali, though it is decidedly older than they are. (Professor Lassen). The Pali varies in many particulars from the language of Magadha and approximates to the principal Prakrit or Marathi dialects. Professor Benfey.

The ancient representatives of these—the Maharashtri and the Shaurseni and the Magadhi, as well as an earlier form of speech, the Pali—show extensive corruptions of Sanskrit Sounds, reducible however to a few general laws. Dr. R. G. Bhandarkar's History of the Deccan. p. 4 new Ed.

वररुचीच्या प्राकृतप्रकाशांत लोकप्रचारांतून गेलेल्या प्राचीन पालिभाषेचा उल्लेख नसण्याचेंही हेंच एक कारण असावें. पालिभाषा जर त्यावेळीं प्रचारांतून गेली नसती, तर वररुचीनें तिजविषयीं एखादा शब्द तरी लिहिला असतां, अशी अपेक्षा करणें गैरवाजवी होणार नाहीं. तसेंच, चंडकृत ' प्राकृतलक्षणम् ' नांवाचा एक ग्रंथ आमच्या पाहण्यांत आला आहे, तो कलकत्ता येथील एशियाटिक् सोसायटीच्या विद्यमानें मि० हॅर्नले ह्यांनीं इ० स० १८८० त छापून प्रसिद्ध केला आहे. हा ग्रंथ वररुचीच्या ग्रंथाहून प्राचीन मानण्यास पुष्कळ कारणें आहेत. ( हेमचंद्राचे प्राकृत व्याकरण बहुतेक चंडकृत प्राकृत ' लक्षणाच्या ' आधारानें रचलेलें आहे. ) ह्या ग्रंथांत प्राकृतभाषेच्या महाराष्ट्री व शौरसेनी ह्या पोटभेदांचा उल्लेख आढळत नाहीं. ह्यांत ज्या प्राकृतभाषेचे नियम सांगितले आहेत, तीशीं प्राचीन महाराष्ट्रीभाषेचें पुष्कळ साम्य असून ती महाराष्ट्रीपेक्षां प्राचीन दिसते. किंबहुना, तीस प्राचीन महाराष्ट्रीचे व शौरसेनीचें प्राचीनतमरूप ह्मटलें असतांही चालेल. असें असतां चंडानें जेव्हां " महाराष्ट्री व शौरसेनी" नांवाचा उल्लेख आपल्या ग्रंथांत कोठेंच केला नाहीं, तेव्हां त्यांनीं ज्या काळीं ग्रंथ लिहिला त्या काळीं प्रचारांत असलेल्या मुख्य प्राकृतभाषेंत महाराष्ट्री, शौरससेनी वगैरे भेद पडले नसावे असें बळकट अनुमान होतें. ही वस्तुस्थिति लक्षांत आणिली ह्मणजे आह्मी पूर्वी निर्दिष्ट केलेल्या कोटिक्रमास अनुसरून वररुचीचें प्राकृत व्याकरण इसवी सनाच्या आरंभीं अगर फार झालें तर आमच्या स्वदेशीय प्राचीन पंडितांच्या समजुतीस अनुसरून विक्रमशकाच्या प्रारंभाच्या सुमारास रचलें गेलें असावें, असें ह्मटल्याशिवाय गति नाहीं. कांहीं पंडितांचें असेंही मत आहे कीं, शालिवाहन शतकाच्या तिसऱ्या शतकानंतर प्राकृतप्रकाशकार आविर्भूत झाला असावा. पण त्यांच्या ह्या ह्मणण्यास आधार काय, तें अद्यापि आमच्या पाहण्यांत कोठेंच आलें नाहीं. ह्मणून तसें होईपर्यंत आह्मांस ह्या लेखांत प्रतिपादलेला सिद्धांत ग्राह्य वाटतो. वार्त्तिककाराशीं

प्राकृतप्रकाशकाराचा संबंध कल्पिणें ऐतिहासिकदृष्ट्या फार धोक्याचें आहे, हें पूर्वी दाखविलेंच आहे.

एवंच प्राकृतप्रकाशकार वररुचीचा जो काळ वर ठरविण्यांत आला आहे, तोच, ह्मणजे इ० सनाचा प्रारंभ काळ हाच प्राचीन महाराष्ट्र भाषेच्या उत्कर्षाचा काळ होय.

# ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

---

# खाल्डिया देशाविषयीं या ५०--६० वर्षांत लागलेले नवीन शोध.

हा निबंध

रा. रा. त्र्यंबक गुरुनाथ काळे

यांनीं लिहिला

तो

रा. रा. विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

संपादक ग्रंथमाला, यांनीं

कोल्हापूर, 'श्रीसमर्थप्रसाद' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

---

१९०५.

---

किंमत ८५ आणे.

# अनुक्रमणिका.

# * खाल्डियासंबंधीं नवी माहिती.

## प्रकरण १ लें

### विषयप्रवेश.

इराणच्या पश्चिमेस, युफ्रेटीस व टैग्रीस या दोन नद्यांमध्यें असलेल्या प्रदेशास **खाल्डिया** ह्मणत असत. याच्या उत्तरेस ॲसीरिया व झॉग्रॉस पर्वत, पूर्वेस इराण देश व इलामप्रांत, दक्षिणेस इराणी आखात व पश्चिमेस अरबस्थानचा उत्तर प्रदेश हीं आहेत. या **खाल्डियांत** दोन भाग मानीत असत. उत्तर भागास ॲक्कड ह्मणत; व दक्षिण भागास **शुमीर** ह्मणत. हे **शुमीर**–**ॲक्कड** प्रदेश मिळून प्राचीन **खाल्डिया** देश होत असे. येथील अति प्राचीन लोकांस व त्यांच्या भाषेस वरील दोन प्रदेशांवरून **शुमीरो–ॲक्केडियन** असें ह्मणण्यांत येतें. संक्षिप्त रूपानें ह्मणावयाचें असल्यास त्यांस फक्त **ॲक्केडियनच** ह्मणतात. तेव्हां, शुमीरो–ॲक्केडियन–किंवा नुसतेंच ॲक्केडियन लोक अतिप्राचीन काळीं **खाल्डियामध्यें** राहत असत, व त्यांना व त्यांच्या भाषेला तें नांव शुमीर व ॲक्कड या दोन भागांवरूनच पडलें, हें उघड होतें.

मेसोपोटेमिया यांमध्यें वर सांगितलेला खाल्डिया देश व त्याच्या उत्तरेकडचा ॲसीरिया देश हे दोन्ही येतात. मेसोपोटेमिया ह्मणजे “ दोन नद्यांमधील प्रदेश ” होय! हा प्रदेश पूर्व व पश्चिम यांच्या वाटेंत असल्यामुळें विजयी सेनांची ही एक रणभूमीच होऊन बसली आहे. त्यामुळें येथें अनेक रणें माजून अनेक राज्यक्रांत्या झालेल्या आहेत. कुरुक्षेत्राप्रमाणें जगांतील हें एक मोठेंच रणांगण झालें आहे.

---

* हा निबंध पुणें येथील ‘ Student’s Literary Union ’ पुढें ता. १० जुलै १९०४ रोजीं वाचण्यांत आला .

## मेसोपोटेमियावरील स्थित्यंतरें!

टैग्रिस नदीच्या कांठचें मोठें, जुनाट, प्रसिद्धीस आलेलें निनिव्हे शहर ख्रि० पू० ६०६ च्या सुमारास नाश पावलें. हें निनिव्हे शहर शेंकडों वर्षेंपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर आपला करडा अम्मल चालवून दरारा वसवीत असे. परंतु ऐहिक वैभव हे किती क्षणभंगुर आहे हें दाखविण्याकरितांच जणूं काय परमेश्वरानें त्या गर्विष्ठ शहराभोंवतीं शत्रूंचा गराडा वसविला व त्यामुळें अपमान न सहन होऊन, व दुसरा मार्ग न राहिल्यामुळें तेथील अस्सीरियन राजांनीं प्राणांतिक अवस्थेंत शहरास आंतूनच आग लावून दिली, त्यामुळें हें शहर शेवटीं नाश पावलें. अस्सीरियन लोकांच्या मुख्य दोन राजधान्या असत. त्या निनिव्हे व काले (Kalah) ह्या होत. काले शहर (पहिल्या) शालमनशर राजानें ख्रि० पू० १३०० च्या सुमारास वसविलें. निनिव्हे शहर याही पूर्वीचें होय! प्रसिद्ध ग्रीक लेखक व सेनापती झेनॉफन् यांस वरील शहरांचे अवशेष आढळले. पैकीं झेनॉफन ज्याला मस्पिला असें म्हणतो तो जुन्या निनिव्हे शहराचाच अवशेष होय.

निनिव्हे शहर अस्सिरियन लोकांची राजधानी होती हें वर सांगितलेंच आहे. या शहरावर ज्या अनेक शत्रूंचा हल्ला होऊन शेवटीं हें नाश पावलें, त्यांपैकीं मेडिस् (Medes) हेही होते. मेडिस् लोक यावेळीं एक अवल राष्ट्र होतें. यांच्या अमलांतच अजून पर्शन लोक असत. ते अजून स्वतंत्र व बलवान् राष्ट्र झालें नव्हतें. अस्सीरिया नंतर अर्थात् मेडिस् लोक हे मेसोपोटेमियाचे मालक झाले. नंतर त्यांचे मागून प्राचीन इराणी (पर्शन) लोक आले. त्यानंतर ख्रि० पू० ४ थ्या शतकांत तो प्रदेश मासिडोनच्या ॲलेक्झांडरनें जिंकून घेऊन कांहीं दिवसपर्यंत आपल्या ताब्यांत ठेविला. पुढें सुमारें हजार वर्षांनंतर हा प्रदेश अरब लोकांनीं जिंकून घेतला, व तेथें पूर्वीच्या बाबिलोन शहराजवळ, त्याच्या तोडीचें असें बगदाद शहर, युफ्रेतीस् नदीच्या कांठीं वसाविलें. टैग्रीस् नदीच्या दुसऱ्या बाजूस प्राचीन निनिव्हेच्या समोर अरब लोकांनीं मोसल

शहर बसविलें. हेंही शहर प्रसिद्धीस आलें. येथें होणारें कापड " मसूलिन् " ( Muslin ) या नांवानें प्रसिद्ध आहे.

याप्रमाणें, टैग्रिस् व युफ्रेटीस या नद्यांवर अरब लोकांनीं बसविलेलीं मोसल् व बगदाद हीं शहरें देखील या हजार बाराशें वर्षांमध्यें पार स्मृति-पथामधून नष्ट झालीं. हींच जर अशाप्रकारें काळाच्या अजब तडाख्यांत सांपडलीं, तर ख्रि० पू० ६०६ वर्षांपूर्वींच्या अस्सीरियन राजांची राजधानी निनिव्हे शहर—याची तर काय अवस्था होणार नाहीं? निनिव्हे व बाबिलोन या शहरांची तर अगदींच दुर्दशा उडून गेली आहे. अडीच हजार वर्षांपूर्वींचीं हीं शहरें जमीनदोस्त होऊन गेलीं असून, त्यांचे मोठमोठे **ढिगारे** होऊन पडले आहेत. जेथें पूर्वीं शत्रूंना टक्कर देणारे अत्यंत सामर्थ्यवान् भयंकर शहराचे तट, भव्य गगनचुंबित राजवाडे व देवमंदिरें, अनेक हवेल्या व मोठमोठे वाडे, हीं असत, तेथें आतां काळानें आपलें साम्राज्य चालवून, सर्वांस जमीनदोस्त करून धुळीस मिळाविलेलें आहे. पण हेंच एका अर्थीं चांगलें झालें याचें कारण पुढें वाचकांच्या नजरेस येईलच. असो.

याप्रमाणें अरब लोकांनीं कांहीं दिवसपर्यंत या मेसोपोटेमियावर आपला अंमल चालविल्यानंतर त्यांच्या हातून तुर्क लोकांनीं तो प्रांत घेतला. हल्लीं तो प्रदेश तुर्क लोकांच्या ताब्यांत आहे. तुर्क लोकांची राजधानी कॉन्स्टंटिनोपल् हें शहर असून तुर्की बादशहा मेसोपोटेमियावर आपले अधिकारी पाठवून राज्य करीत असतो. असो.

## नवीन शोध कसे लागत गेले?

पूर्वींच्या अस्सीरियन् शहरांचा व राज्यांचा नाश होऊन सुमारें २.५०० अडीचहजार वर्षांनीं प्रथमच युरोपियन राष्ट्रांना त्यांच्याविषयीं जिज्ञासा व कुतूहल हीं उत्पन्न झालीं. पूर्वींच्या अरब लोकांनीं याबद्दल कांहीं शोध अगर तपास केला नाहीं. हें कार्य युरोपियन लोकांच्याच यशास यावयाचें होतें. अरब लोक, यूरोपीय प्रवासी वगैरे लोकांना प्राचीन शहरें जमीनदोस्त होऊन त्यांचे जे **ढिगारे**

होऊन पडले आहेत, ( असें आह्मी मागेंच सांगितलें आहे ) ते दाखवून त्याविषयीं माहिती सांगत. तसेंच युफ्रेटिस् व टैग्रीस् या नद्यांस पूर आले ह्मणजे या ढिगाऱ्यांतून कचरा, गाळ, वगैरे जे पदार्थ वाहून येत, त्यांत कांहीं विटा, भांड्यांचे तुकडे, शिल्पकाम ज्याच्यावर केलेलें आहे असे दगड, हीं दृष्टी पडूं लागलीं. शिवाय कांहीं विटांवर तर शरकल्प लिपींत लिहिलेले कांहीं लेखही आढळूं लागले. यावरून यूरोपियन लोकांपैकीं कांहीं लोकांना थोडीशी आशा वाटूं लागली. ह्मणून ते मुख्य मुख्य जे ढिगारे दिसत होते ते खणून काढून त्यांत काय मिळतें हें पाहण्याच्या नादीं लागले.

प्रथम ईस्टइंडिया कंपनीचे बगदाद येथील राजकीय प्रतिनिधी मि० रिच् हे मोसलमध्यें असले ढिगारे शोधण्याच्या कामास इ. स. १८२० सालीं लागले. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत युरोपीय लोकांनींही या बाबतींत कांहींच केलें नाहीं. मोसल हें पूर्वींच्या निनिव्हे शहराजवळ होतें, असें मागें ह्मटलेंच आहे. तेव्हां तेथील ढिगारे उकरून पहाण्याच्या कामीं मि० रिच् यांनीं कांहीं काळ घालविला. परंतु त्यांस फारसें यश आलें नाहीं. पुढें १८४२ पर्यंत या बाबतींत कांहींच कार्य झालें नाहीं. मोसलमधील फ्रेंच कॉनसल मि० बोट्टा हे मोसलजवळील दोन ढिगाऱ्यांपैकीं अधिक मोठा असा कोयुंजिक नांवाचा ढिगारा खणून पाहूं लागले. परंतु त्यांत कांहींच मिळालें नाहीं; ते निराश होऊन मागें फिरणार, तोंच खोरसाबाद येथील ढिगारा शोधण्याविषयीं एकानें त्यांस सांगितलें. त्यावरून तेथें त्यांनीं उत्खनन चालविलें. या उत्खननामध्यें ( Excavation ) एका अस्सीरियन राजाची राजधानी सांपडली. मग काय विचारतां? यूरोपीय लोकांचा उत्साह व जिज्ञासा हीं अधिकच वाढलीं. मि० बोट्टा यांस १८४२ सालीं जें बरेंच यश आलें, त्यामुळें युरोपीयांची शोधकबुद्धि विशेष जागृत झाली. पुढें प्रसिद्ध इंग्रज शोधक मि० लेयर्ड हा पुढें सरसावला. यानें उत्खननाच्या कामीं कॉन्स्टांटिनोपल येथील

इंग्लिश प्रधान स्ट्राट्फोर्ड कॅनिंग यांच्याकडून बरीच मदत मिळविली. १८४९ मध्यें यांनीं टैग्रिस व झाब् नदींच्या संगमाजवळ असलेल्या **निम्रूड** ढिगारा शोधून काढण्याचा सपाटा चालविला. याचे शोध तर अपूर्व निघाले; व त्यामुळें युरोपमध्यें विलक्षण चळवळ उडून गेली. अस्सीरियन्, खाल्डियन् वगैरे राजांच्या राजधान्या, देवळें, विटांवरचे, पत्र्यांवरचे, दगडांवरचे लेख, व्याकरण, काव्य, कोष, वाङ्मय इत्यादिकांचे प्राचीन **ग्रंथ-भांडार** दगडावरची रंगित व साधीं अर्थपूर्ण चित्रें, वगैरे महत्वाचे अवशेष सांपडले. त्यामुळें या प्राचीन राज्याविषयीं विलक्षण नवीन माहिती मिळाली. शहराचे ढिगारे होऊन पडले, ह्मणून हे लेख व अवशेष भूगर्भांत सुरक्षितपणें राहिले; नाहीं तर काळानें कधींच त्यांचा चुराडा करून टाकिला असता. ह्मणूनच आह्मी मागें ह्मटलें कीं, हे ढिगारे झाले हे एका अर्थीं बरेंच झालें. असो.

याप्रकारें खाल्डियन् व अस्सीरियन लोकांचें सारें ज्ञानभांडार यूरोपियांस प्राप्त झालें. मग अनेक शोधकांनीं शरकल्प लिपीचा शोध लावून, त्यांच्या लेखांचा अर्थ लावला. मि० रॉलिनसन्, मि० स्मिथ् वगैरे लोकांनीं शुमीरो--ॲक्केडियन भाषा व लिपि शिकून त्या त्या ग्रंथांचा व लेखांचा शोध लाविला. विटांवर, पत्र्यांवर, दगडांवर वगैरे जे लेख होते ते बहुधा राजांविषयींच असत. त्यांच्यायोगें खाल्डिया व अस्सीरिया यांच्या प्राचीन इतिहासावर विलक्षण असा प्रकाश पडला; व पुष्कळ नवीन शोध आजपर्यंत लागले. यानंतरही पुष्कळ अधिक शोध लागण्याचा संभव आहे. आजपर्यंत या प्राचीन खाल्डियाच्या राज्याविषयीं काय काय शोध लागलेले आहेत, व त्यांच्या इतिहासाची संक्षिप्त माहिती कशी काय आहे, हें जाणून घेण्याची आमच्या रसिक वाचकांस इच्छा होईलच! तेव्हां त्यांच्यासाठीं आह्मीं ही माहिती पुढें दिली आहे.

---

प्रकरण २ रें.

# खाल्डियांतील राजवाडे व देऊळें.

खाल्डियन लोक बांधकामांत व खोदीव कामांत बरेच हुषार असत. यांनीं मोठमोठाले राजवाडे व सुंदर देऊळें बांधिली होतीं. तीं सारीं आतां जमीनदोस्त झालेलीं आहेत. खाल्डिया देश सपाट असून दगड मिळण्याकरितां आसपास कोठें पर्वत नसल्यामुळें, हे लोक आपल्या इमारती मातीनें केलेल्या विटांनीं बांधीत. माती गाळून सुरेख करून त्याच्या विटा करीत; व त्या पुढें भाजून पक्क्या करीत. अशा पक्क्या विटा उत्तम तऱ्हेच्या इंग्रजी विटांसारख्याच आहेत, असें युरोपीय शोधकही कबूल करीत आहेत. या विटांची इतकी प्रसिद्धी झालेली आहे कीं, मागें सांगितलेल्या ढिगाऱ्यांमधून ज्या विटा आढळतात, त्या लोक मुद्दाम खणून काढून आपापलीं घरें बांधण्याकरितां अझूनही नेतात.

खाल्डियन लोक आपले राजवाडे व आपलीं देऊळें कृत्रिम टेंकड्यांवर बांधीत असत. याचें कारण असें कीं, देश सपाट असून नैसर्गिक टेंकड्या तेथें नाहींत; व नुसत्या जमीनीवर इमारती बांधल्या तर नद्यांच्या पुरांनीं व पावसानें त्यांची खराबी होते. ह्मणून त्यांस कृत्रिम टेंकड्या बनवाव्या लागत. या कृत्रिम टेंकड्यांवर केव्हां केव्हां एकच राजवाडा असे व केव्हां केव्हां अनेक राजवाडे असत प्रत्येक राजा आपला एक नवीनच राजवाडा बांधीत असे; ह्मणून जितके राजे तितके भिन्न भिन्न राजवाडे सांपडतात. प्रत्येक राजा आपल्य पूर्वजांचे राजवाडे दुरुस्त करी व आपला एक नवीन राजवाडा बांधी

असे. वर सांगितलेल्या कृत्रिम टेंकड्या माती, गाळ, कचरा वगैरे जिनसांनीं बनविल्या जात असत. या टेंकड्याची बाहेरची भिंत मात्र पक्क्या विटांनीं बांधून काढीत. यांना दगड मिळण्याजोगे डोंगर कोठें आसपास नव्हते. तेव्हां, कचरा, माती, गाळ वगैरेनीं बनविलेल्या कृत्रिम टेंकड्यासंभोंवतीं पक्क्या विटांची भिंत बांधावी लागे. अर ( Ur ) नांवाच्या प्राचीन शहरांत अशी जी एक कृत्रिम टेंकडी आहे, तिच्या संभोंवतालची भिंत १० फूट जाड आहे. या प्राचीन अर शहुरास आतां **मोघीर** ह्मणतात. असीरिया मधील अशा टेंकड्यांभोंवतीं दगडाच्या भिंती आहेत; कारण झॅग्रॉस् पर्वत अस्सीरियाच्या जवळच आहेत. अशाप्रकारें तयार केलेल्या कृत्रिम टेंकड्यावर एकाहून एक लहान असे platforms बांधिलेले आहेत. हे platforms एकाहून एक लहान असून सारखे वरवर चढलेले असत; व शेवटच्या Platform वर ह्मणजे अत्युच्च ठिकाणीं **देऊळ** बांधिलेलें असे. अशा प्रकारें उंच बांधिलेलीं देउळेंच खाल्डियन् लोकांचीं ग्रहालयें होतीं. यांसच ते ' झिगरट् ' ह्मणत असत. **बोरशिप** येथील असें एक देऊळ १५० फूट उंच असे.

**कोयुंजिक** येथें मोठमोठे ढिगारे सांपडले आहेत, असें आह्मी मागील प्रकरणीं ह्मटलेंच आहे. याच स्थळीं पूर्वींचें **निनिव्हे** शहर होतें. या ढिगाऱ्यामध्यें जी कृत्रिम टेंकडी बांधलेली आढळली, तिचें क्षेत्रफळ १०० एकर असून, तिची उंची ९९ फूट आहे. येवढी मोठी **कृत्रिम टेंकडी** बनविण्यास १०,००० लोक सारखे १२ वर्षें पर्यंत खपले पाहिजेत; किंवा २०,००० लोक सारखे ६ वर्षें पर्यंत खपले पाहिजेत. तेव्हां कोठें एक **कृत्रिम टेंकडी** तयार व्हावयाची! या टेंकड्यावर देऊळें व राजवाडे जे पुढें बांधावयाचे असतात, त्यांना लागणारा प्रचंड खर्च व अगणित माणसें हीं निराळींच! असा प्रचंड खर्च फक्त विजयी राजेच करूं शकतील हें उघड आहे; व इतकीं माणसेंही पण तेच कामास लावीत असत. युद्धांतून कैद करून

आणलेल्या असंख्य लोकांस खाल्डियन राजे आपले राजवाडे व आपलीं देऊळें बांधावयास लावीत; व हीं बांधकामें बहुधा राजांच्या जन्मभर चालत असलीं पाहिजेत.

नेवियुनस् येथें दुसरी एक जी अशी कृत्रिम टेंकडी आहे, तिचें क्षेत्रफळ ४० 'एकर' असून, ती ९९ फूटांपेक्षांही उंच आहे. ही टेंकडी बनविण्यास १०,००० माणसें सारखीं ९ $\frac{१}{२}$ वर्षे खपलीं असलीं पाहिजेत. असो.

ॲस्सीरियांतील मुख्य शहरें ह्मणजे निनिव्हे (कोयुंजिक), काले (निमुड टेंकडी) आर्बेला, डरशास किन (खोर्साबाद टेंकडी) हीं होत! ह्या सर्व शहरामधून वर सांगितलेल्या कृत्रिम टेंकड्या आहेत. परंतु तेथें त्यांची आवश्यकता नव्हती. कारण खाल्डियामध्यें जशी जमीन अगदी सपाट आहे तशी कांहीं ॲसीरिया मध्यें नांहीं. ॲसीरियन लोकांचा प्रदेश डोंगराळ आहे. तेव्हां त्यांना उंचवट्यावर शहरें बांधतां आलीं असतीं. परंतु फक्त खाल्डियन लोकांचें अनुकरणच तेवढें त्यांनी केल्याप्रमाणें दिसतें. कृत्रिम टेंकड्यांची आवश्यकता नसतांही ज्या अर्थी त्यांनीं अंधानुकरणानें त्या बनविल्या त्या अर्थी ॲसीरियन लोकांची कल्पक बुद्धि विशेषशी नव्हती असें ह्मणता येईल. ॲसीरियन लोक दक्षिणेंत खाल्डियन लोकांबरोबर राहिले होते, ते पुढें उत्तरेकडे गेले. तेव्हां त्यांच्या सहवासानें जेवढें ज्ञान मिळालें तेवढ्याचेंच त्यांनीं अंधानुकरण केलें आहे. अंधानुकरणानें उगीच्या उगीच त्यांना किती श्रम व किती हाल सोसावे लागले हें त्यावरून कळून येईल.

ॲसीरियन राजवाडे एक मजलीच असावेत, असा शोधकांचा तर्क आहे. निदान आजपर्यंत तरी जिने कोठें असण्याचें आढळून येत नाहीं. परंतु ही गोष्ट शक्य नांहीं, असें दुसऱ्या पक्षाचें ह्मणणें आहे. खांबांचा ते बांधकामांत उपयोग करीत असत. हे लांकडांचे केलेले असत. आंतल्या बाजूस (राजवाड्यांच्या) रंगीत चित्रें काढलेलीं असत.

**काले** शहरांतील **असुर बनिपाल** राजाच्या राजवाड्यांतील (Audience) सभागृह १६० फूट लांब, व ४० फूट रुंद आहे. **खोर्साबाद** येथील सभागृह ११०×३३ फूट आहे. अतिशय लहान सभागृह ह्मटलें ह्मणजे ८७×२९ फूट आहे. **कोयुंजिक** येथील **सिन्नाचेरिब** राजाचें सभागृह १८० फूट लांब व ४० फूट रुंद आहे. अशा मोठ्या सभागृहाचें छप्पर Timber च्या लांकडाचें करीत. हें Timber चें लांकूड आसपासच्या देशांतून खंडणीच्या रूपानें घेत असत. केव्हां केव्हां तर या लांकडासाठींच स्वाऱ्या केल्या जात.

**शिर्गुला** येथील देवळाचे अवशेष सुमारें ख्रि. पू. ४९०० वर्षें पूर्वींचे आहेत, असें शोधकांचें ह्मणणें आहे.

याप्रकारें खाल्डियन देवालयें व राजवाडे यांची थोडक्यांत माहिती सांगितली आहे. आतां,

## राजवाड्यांतील पुस्तकालयें

कशीं होतीं, व त्यांत विशेष काय होतें, हें पाहूं.

पुस्तकें नेहमीं कागदांचींच असतात असें नाहीं. तीं इतर वस्तूंचींदेखील असूं शकतील. कागदाचा शोध लागण्यापूर्वीं लोक भूर्ज किंवा ताडपत्रांवर लिहित असत. तांब्याचे, लोखंडाचे, रुप्याचे, सोन्याचे पत्रे हे कागदाच्या पृष्ठांप्रमाणें उपयोगिले जात असत. बाबिलोन आणि इजिप्तमध्यें पॅपिरस नांवाचा एक प्रकारचा कागदही करीत असत. परंतु बहुतेक सर्व प्राचीन लेख विटा, दगड, स्तंभ व खडक यांजवरच आढळतात; व त्यामुळेंच ते अजूनही टिकलेले आहेत. खाल्डियाचे पूर्वींचे लेख पक्क्या विटांवर, दगडांवर व केव्हां केव्हां खडकांवर आढळून येतात. त्यांची लिपी शरकल्प आहे. ॲसीरियन राजवाड्याच्या भिंतीवर जे शिलालेख आहेत, ते इतिहासनिर्णयाच्या कामीं फार उपयुक्त आहेत. असे भिंतीवरचेच लेख आढळतात असें नव्हे, तर राजवाड्यांमधून एकीकडच्या विशिष्ट खोल्यांमधून ठेविलेले

असे बरेच ग्रंथ-पुस्तकालयेंच-आढळलेलीं आहेत. वाङ्मयात्मक व शास्त्रीय ग्रंथ, धार्मिकग्रंथ, सरकारी व खासगी दप्तरें, करारपत्रें वगैरे लेख मुद्दाम एकीकडे संगृहित करून ठेविलेले आढळले आहेत. याविषयीं विशेष माहिती पुढें वाङ्मयावर विचार करीत असतां देऊं. या पुस्तकालयांमध्यें जीं पुस्तकें असत, त्यांवर अनुक्रमवार अंक असत, व ज्याला एखादें पुस्तक त्यांतून न्यावयाचें असेल त्यानें आपलें नांव व पुस्तकाचा अंक लिहून तें न्यावें, अशी त्यांची रूढि असे. सारांश, आतांप्रमाणें त्यांच्यांत व्यवस्थित ग्रंथसंग्रहालयें होतीं.

कोयुंजिक येथें मि० लेयर्ड यांस सेन्नाचेरिब व त्यांचा नातू असुरबनिपाल ( ख्रि० पू० ६५० ) यांचे राजवाडे सांपडले. हे दोघेही मोठे प्रतापी राजे होते. असुरबनिपालच्या राजवाड्यांत एक खोली होती, तींत वर लिहिल्याप्रमाणें एक मोठा ग्रंथसंग्रह होता. हा ग्रंथसंग्रह सध्या ब्रिटिशम्यूझियममध्यें आहे. जॉर्ज स्मिथ वगैरे शोधकांस इतर अनेक लेख मिळाले. प्रत्येक दिवशीं अजून कांहीं तरी नवे लेख सांपडतच आहेत. निनिव्हे शहरामध्येंच फक्त १०,००० वर विटा ( लेखाच्या ) सांपडलेल्या आहेत. असुरबनिपालचा ग्रंथसंग्रह अनेक दृष्टींनीं बराच महत्त्वाचा आहे. याविषयीं विशेष वर्णन पुढें यावयाचें आहे.

कांहीं विटांवर व दगडांवर इतकीं बारीक अक्षरें आहेत कीं, तीं वाचण्यासाटीं ( Magnifying glasses ) बृहद्दर्शक कांचांचा उपयोग करावा लागतो. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, या लेखांबरोबरच अशा प्राचीन कांचा सांपडलेल्या आहेत. शिवाय कांचेचें सामानही राजवाड्यांमधून केव्हां केव्हां आढळलें आहे. यावरून कांच व ती कशी तयार करावी, हें त्या लोकांस माहीत असावें, असें वाटतें.

असुरबनिपालच्या या ग्रंथसंग्रहापेक्षां ( ख्रि० पू० ६५० ) ही पूर्वीचे ग्रंथसंग्रह अलीकडे सांपडले आहेत.

ॲसीरियाचा राजा दुसरा **सारगान** ( ख्रि० पू० ७२२-७०५ ) याच्या वेळचाही एक ग्रंथसंग्रह मिळालेला आहे.

तसेंच ख्रि. पूर्वी. ३८०० होऊन गेलेल्या पहिल्या **सारगॉन**च्या वेळचाही एक ग्रंथसंग्रह सांपडलेला आहे. त्यांत खाल्डियन लोकांचा अतिप्राचीन ज्योतिष ग्रंथ ७२ विटांवर मिळून कोरलेला आढळला. या प्रकारें त्यांच्या पुस्तकालयांसंबंधानें थोडासा उल्लेख केला, आतां त्यांच्या इतिहासाचें थोडक्यांत निरीक्षण करूं.

---

प्रकरण ३ रें

# खाल्डियाचा प्राचीन इतिहास.

मागें १ ल्या प्रकरणांत अॅसीरियन लोकांची राजधानी निनिव्हे शहर हें ख्रि० पू० ६०६ च्या सुमारास जेव्हां जळून पार झालें, तेव्हां-पासून मेसोपोटेमियावर काय काय स्थित्यंतरें झालीं, ह्याचें आह्मी थोड-क्यांत दिग्दर्शन केलेलेंच आहे. या प्रकरणांत खाल्डियाच्या इतिहासाचें व त्याच्या अनुषंगानें केव्हां केव्हां अॅसीरियाच्या प्राचीन इतिहासाचें थोडक्यांत निरूपण करावयाचें आहे. त्याकरितां क्रमानें आधीं काल-दर्शक कोष्टकें येथें देतों, ह्मणजे विषय बराच सुगम होईल. असो.

ख्रि० पू० ५२० निडिंटवेल— बाबिलोनियाचा शेवटचा स्वतंत्र राजा रणांगणांत पडला.

ख्रि० पू० ५१२—डेरायस हिस्टॅस्पिस्चा मुलगा, बाबिलोन शहर घेतो, त्याचा मुलगा झर्सिस हा तेथील देऊळें व तट यांचा पूर्ण विध्वंस करून टाकितो. बाबिलोनियाचा विध्वंस.

ख्रि० पू० ५२९—( Cyrus ) कायरस्चा अंत होतो व त्याचे जागीं त्याचा मुलगा Kambyses कामबसिस हा इलामचा राजा होतो.

ख्रि० पू० ५३८—कायरस कांहीं प्रयास न पडतां बाबिलोन शहरांत प्रवेश करून तें हस्तगत करितो, व पूर्वींचीं देऊळें व मूर्ती यांची नीट व्यवस्था ठेवितो. नेबॉनिडॉस, बाबिलोनचा राजा याचा पराभव होतो व तो मरण पावतो.

ख्रि० पू० ५५५–५३८—नेबॉनिडॉस बाबिलोनियावर राज्य करितो. हा १७ वर्षे राज्य करितो. हा बाबिलोनच्या मूळच्या राजघराण्यांतला नव्हता, यानें बाबिलोनची गादी बळकाविली होती.

ख्रि० पू० ५५९–५५५—नर्गल-शरेझर हा बाबिलोनवर राज्य करितो. ह्यानें आपला मेहुणा इव्हिल-मर्डाकचा खून केला, व

राज्य संपादन केलें. ५६१ इव्हिल-मर्डाक राज्यारूढ होतो ६०४-५६१. नेबचड्रझर ( इव्हिल मर्डाकचा पिता ) बाबिलोनवर राज्य करितो. हा प्रसिद्ध राजा होऊन गेला. याच्या स्वाऱ्या जेरूसलेम व ईजिप्तपर्यंत गेल्या होत्या. त्यानें बाबिलोनमध्यें बांधकामही बरेंच केलें आहे. याच्या काळीं ईजिप्तचा राजा ॲमासिस् हा होता.

ख्रि. पू. ६०६ ( Necho ) निको, ईजिप्तचा राजा याचा कारचेमिश Carchemist येथें नेबचड्रेझर हा पराभव करितो. नेबचड्रेझरचा बाप **नबोपोलसर** हा बाबिलोनियाचें पुनः स्वतंत्र राज्य स्थापन करितो. ॲसीरियन सत्ता नुकतीच नाश पावली होती

ख्रि० पू० ६०९—**ईजिप्तचा** राजा **निको,** हा **मेगिडोच्या** लढाईत ज्यू लोकांचा पराभव करून पश्चिम आशियाचा राजा व सत्ताधारी झाला. याचा पुढें ख्रि० पू० ६०६ मध्यें **कारचेमिश्** येथें नेबचड्रेझनें पराभव केला, व त्याच्या पित्यानें बाबिलोनचें पुनः स्वतंत्र राज्य स्थापिलें.

ख्रि० पू० ६०६ ॲसीरियाची राजधानी **निनिव्हे** या शहराचा शत्रूंनीं गराडा देऊन समूळ विध्वंस केला. तें शहर जळून खाक झालें. या नंतर ॲसीरियाची सत्ता संपली. ॲसीरियाचा शेवटचा राजा **एसर-हॅडन** दुसरा ( किंवा साराकॉस ) हा होता.

## ॲसीरियाचा थोडासा इतिहास.

ख्रि. पू. ६६८-६३०-असुरबनिपाल हा निनिव्हे शहरीं राज्य करितो. हा मोठा विख्यात राजा होऊन गेला. यानेंच ॲकेडियन व खाल्डियन ग्रंथ जमवून, एक मोठें ग्रंथसंग्रहालय स्थापिलें. इ०

ख्रि० पू० ६९१—बाबिलोन शहराचा **सेनाचेरिबनें** विध्वंस केला होता. त्यानें त्या शहराच्या भिंती जमीनदोस्त करून टाकिल्या. परंतु त्याचा मुलगा **एसरहॅडन** ( पहिला ) व नातू **असुरबनिपाल** यांनीं हें शहर बरेंच दुरुस्त केलें.

ख्रि० पू० ६८१–६६८—एसरहॅडेन ( पहिला ) असुरबनिपालचा पिता, निनिव्हे शहरीं राज्य करीत होता.

ख्रि० पू० ७०५–६८१—सेन्नाचेरिब ( असुरबनिपालचा आजा ) निनिव्हे शहरीं राज्य करितो.

ख्रि० पू० ७२२–७०५—( दुसरा ) सारगॉन निनिव्हे शहरीं राज्य करितो.

ख्रि० पू० १८००--६०६—खाल्डिया देश ॲसीरियाच्या अमलाखालीं होता.

ख्रि० पू० १८००--१९००—काशीयन् ( Kasshian ) लोकांचा अंमल खाल्डियावर होता.

ख्रि० पू० २०००—हम्मुराबि हा इलामाइट् लोकांना खाल्डियांमधून हाकून लावतो, व सर्व देश स्वतंत्र करितो; व बाबिलोन शहर आपली राजधानी बनवितो.

ख्रि० पू० २३००–२०००—खाल्डियादेश इलामी राजांच्याहातीं होता.

ख्रि० पू० ३८००--२३००—खाल्डियादेश शेमेटिक लोकांच्या ताब्यांत होता.

ख्रि० पू० ३८००—ॲगडी ( ॲक्कड )चा शारुकिन ( अगर सारगॉन ) पहिला हा त्या शहरीं राज्य करीत असे. हा मोठा प्रसिद्ध राजा झाला. याचे विजय पश्चिमेकडे सैप्रस बेटापर्यंत जाऊन थडकले होते. याच्या राजवाड्यांत एक ग्रंथसंग्रह सांपडला आहे त्यांत अत्यंत मोठा ज्योतिष ग्रंथ ( ७२ विटांचा ) आढळून आला आहे. असो.

सुमारें ४०००—शेमेटिक् लोक प्रथम खाल्डिया देशांत आले असावेत.

ख्रि० पू०५०००--४०००—खाल्डिया देशांत शुमीरो ॲक्केडियन लोक रहात असत. त्यांस नुसतेच ॲक्केडियनही ह्मणतात. हेच खाल्डियांतील अति प्राचीन लोक होत. असो. आतां आपण

## ॲकेडियन हे कोण व ते कोठून आले?

या प्रश्नाकडे वळूं. ॲक्केडियन ॲसीरियन भाषेचे जे कोश पूर्वीच्या ग्रंथसंग्रहालयांमधून होते, त्यावरून अलीकडच्या विद्वानांस ॲक्केडियन भाषा व शब्द समजूं लागले आहेत. पूर्वीच्या व्याकरणावरूनही ती भाषा अलीकडे सुगम झालेली आहे. अशा साधनांवरून पाहतां, ॲक्केडियन हे **शेमेटिक** जातीचे नसून **तुराणी** Turanians जातीचे लोक होते, असें कळून आलें आहे. शेमेटिक लोकांपासून यांची भाषा अगदीं भिन्न आहे. यांची भाषा Agglutinative तऱ्हेची आहे, असे आढळून आलें आहे. Agglutinative भाषा ह्मणजे, ज्या भाषेंत शब्दांस प्रत्यय न लावितां, अगर क्रियापदें न चालवितां, शब्द एकमेकांस तसेच जोडले जातात, ती भाषा होय! अशी भाषा मोंगल, तुर्क व चिनी लोकांची आहे. हे सर्व **तुराणी** लोकांतच मोडतात. शेमेटिक लोक श्वेतवर्णाचे असून ॲक्केडियन हे **कृष्णवर्णाचे** असत. यांच्या भाषेवरून हे **तुराणी** जातीचे होते असें कळून आलें आहे. तुराणी लोकांत सर्वांच्या आधीं सुधारणेचा प्रसार झालेला होता. हे मूळचे खाल्डियाचे रहाणारे नव्हत. हे बाहेरून कोठून तरी तेथें आले असले पाहिजेत. 'ॲक्कड' याचा अर्थ 'उंच प्रदेश' 'डोंगराळ प्रदेश' असा होतो. त्यावरून ते 'शूसन' (अर्वाचीन **सुसा**) प्रांतांतून खाल्डियांमध्यें आले असावेत; कारण **शूसन** प्रांतांत फार प्राचीन काळापासून **तुराणी** लोकच रहात असत असें आढळून आलें आहे. पण **शूसन**मध्यें तरी तुराणी लोक बाहेरूनच आले असावेत, असें शोधकांचें ह्मणणें आहे. तुराणी लोकांचें एकत्व रहाण्याचें पूर्व स्थान **अलटाई** पर्वत असून, तेथून ते खाल्डिया, चीन, मोंगोलिया वगैरेकडे पसरले असावेत असें शोधक ह्मणत आहेत. (रागोझिनचा 'खाल्डिया' ग्रंथ पृ. १४३पासून पुढें पहा). **अलटाई**पर्वतांमधून यांची फाटाफूट होण्यापूर्वी हे एकदा पश्चिम आशियामध्यें राहत असत, व तेथून ते श्वेतवर्णीय लोकांची गांठ पडल्यानंतर; हटत हटत पूर्वेकडे

गेले असावेत, असेंही एक शोधकांचें विधान आहे. सारांश, ॲकेडियन लोक हे मूळचे खाल्डियाचे राहणारे नसून, हे (तुराणी लोक) सुमारें ख्रि० पू० ९००० * वर्षी तेथें बाहेरून आले असावेत; व खाल्डियांमध्यें येण्यापूर्वी हे आलटाई पर्वताजवळ असावेत. आलटाई-पासून खाल्डियापर्यंत (तुराणी लोकांना) पसरण्यास निदान २००० वर्षे लागलीं असावीत, असें शोधक समजतात. तेव्हां हे ख्रि० पू० सुमारें ७००० वर्षांपूर्वी आलटाई पर्वतावर असावेत असें वाटतें. या लोकांत सुधारणा फार प्राचीन काळापासून झालेली होती. शहरें बांधून त्यांमध्यें रहाणें, लिहिणें वाचणें, शेतें वगैरे नांगरून पिकें उत्पन्न करणें, धातू शोधून काढून त्यांचीं हत्यारें करणें, वगैरे सुधारणेचीं मूळतत्त्वें त्यांना माहीतच होतीं. किंबहुना सुधारणेचे हे तुराणी लोक पुरस्कर्तेच होत ह्मटलें तरी चालेल. परंतु तुराणी लोकांनीं जरी सुधारणेची सुरवात केली तरी तिचा त्यांनीं विकास व तिची विशेष परिपूर्णता केली नाहीं. हीं कार्यें इंडो-यूरोपीयन राष्ट्रांनींच पुढें केलीं. खाल्डियाच्या प्राचीन इतिहासाचें, व त्याच्या ५०-६० वर्षांतील अलीकडील शोधाचें हें पर्यवसान आहे. या ॲकेडियनांचा धर्म कसा काय होता व त्यांचें वाङ्मय कसें होतें, हें पुढील प्रकरणीं थोडेंसें पाहून, आपण या खाल्डियन लोकांची रजा घेऊं.

---

* हा भाग लिहून झाल्यानंतर अलीकडे उत्तर बाबिलोनियांमध्यें **निप्पर** (Nippur) येथें जीं उत्खननें चालू होतीं, त्यांत डा० हिल्प्रेचट यांस तेथील (Bel) बेलच्या देवळाचे अति प्राचीन अवशेष सांपडले. त्यांत जे विटांवरचे लेख मिळाले आहेत, त्यांवरून डा० हिल्प्रेचट् हे ह्मणतात कीं, तें देऊळ व तें शहर हीं सुमारें ख्रि० पू० ६००० किंवा ७००० वर्षी बांधलीं असावींत. ह्मणजे हे **ॲकेडियन लोक ख्रि० पू० ७००० वर्षी ॲलटाईवर नसून खाल्डियां-मध्यें येऊन पोंचले होते**, असें झालें; व याच्याही पूर्वी २००० वर्षांनीं ते ॲलटाई पर्वतावर असूं शकतील; ह्मणजे ८०००-९००० ख्रि० पू० वर्षी हे तुराणी लोक मध्यआशियांत होते, असें वरील शोधामुळें कळून येईल.

प्रकरण ४ थें.

# खाल्डियाचें ज्योतिःशास्त्र व वाङ्मय.

(१) खाल्डियन लोकांचे लेख विटांवर व क्वचित्काळीं पत्र्यांवर व शिलांवर लिहिलेले आहेत हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. विटांवरचे लेख शरकल्प लिपींत लिहिलेले आहेत. विटा ह्या आमच्या पुस्तकाच्या पत्राप्रमाणें उपयोजिल्या जात असत. अशा अनेक विटा मिळून एक ग्रंथ होत असे. प्रत्येक विटेच्या शेवटची ओळ पुढील विटेच्या प्रारंभीं लिहिली जात असे; व प्रत्येक पानावर आपण जसे आंकडे घालतों तसे त्यांनींही विटांवर आंकडे घातले आहेत. असो. विटा, पत्रे, शिला, वगैरे पदार्थांशिवाय खाल्डियन लोक 'लिखुसि' नांवाच्या एक प्रकारच्या कागदासारख्या (Papyrus) वस्तूवरही लिहीत असत असें आढळून आलें आहे. पण मुख्य त्यांचे ग्रंथ विटांवरचेच होत! विटांवर लिहिलेलीं (School-boooks) शालोपयोगी क्रमिक पुस्तकें हीं अलीकडे सांपडलेलीं आहेत. पूर्वीची भाषा ॲक्केडियन व नंतरची ॲसीरियन, या दोन्ही भाषांचे कोशही सांपडले आहेत. या कोशांच्यायोगानेंच ॲक्केडियन भाषा यूरोपीय पंडितांस कळून आली. ॲसीरियन भाषा हिब्रुसारखी असल्यामुळें ती यूरोपीय विद्वानांस चट्कन् कळून आली. परंतु ॲक्केडियन् भाषा प्राचीनतर असून ती दुर्बोध व अगदीं भिन्न असल्यामुळें कळणें कठीण होतें. तथापि ॲक्केडियन-ॲसीरियन कोश जे मिळाले, त्यांयोगें ॲक्केडियन भाषाही कळून आली.

ग्रंथांकरितां लागून ज्या विटा तयार करीत असत, त्या फार काळजीपूर्वक करीत असत. उत्तम प्रकारची माती घेऊन ती गाळून तिच्या विटा करीत. नंतर दोहों बाजूंस चपट्या खिळ्यांनीं (Wedges)

लेख लिहून, त्या विटा भट्टींत घालून भाजून काढीत असत. या विटा च बांधीव कामीं उपयोगांत आणलेल्या इतर विटा, इंग्रजी उत्तम विटा-इतक्याच चांगल्या व खणखणीत आहेत असें यूरोपीय शोधकांचें ह्मणणें आहे. लेखयुक्त विटा केव्हां केव्हां भाजीतही नसत. अशा कच्च्या विटाही बऱ्याच मिळाल्या, परंतु बहुतेकांचा नेआणींत चुराडाच झाला.

[ २ ] खाल्डियन लोक गणितांत फार हुषार होते; कारण त्याशिवाय ज्योतिषांत प्रावीण्य कसें मिळेल? वर्ग घन यांचीं कोष्टकें आढळून आलीं. ६० चा वर्ग ३,६०० दिला होता. यावरून तीं गणिताच्या कामीं वरचेवर त्यांस लागत असत असें वाटतें.

( ३ ) ग्रहज्योतिष व फलज्योतिष या विषयांवर खाल्डियन् लोकांचे बरेच ग्रंथ आहेत. त्यांचा अतिशय मोठा फलज्योतिषा-वरचा ग्रंथ ॲगडी ( Agadê ) येथील पहिल्या सारगॉनचे वेळेस ( ह्मणजे ख्रि० पू० ३८०० वर्षीं ) रचिला गेला. हा ७० विटांवर मिळून लिहिला आहे. खाल्डियन लोक मागें सांगितलेल्या उंच देवळा-वरच्या शिखरांवरून ग्रहावलोकन करीत. या उंच शिखरास ते 'झिगरट' ह्मणत. हीं शिखरेंच त्यांचीं वेधगृहें, अगर गृहालयें होत! ते राजाज्ञेनें ग्रहवेधसंबंधीं 'रिपोर्ट' करीत असत. खाल्डियन लोक दिवसाचे बरोबर २ भाग मानीत. प्रत्येक भागांत पुनः ६ भाग करीत. या २–२ तासांच्या एका भागास ते 'कसबु' ह्मणत असत. महिना ३० दिवसांचा असे; व असे १२ महिने मिळून एक वर्ष होत असे. प्रत्येक ६ वर्षांनीं एक अधिक मास येत असे. महिन्यांतील ३० दिवसांपैकीं प्रत्येक ७ व्या दिवशीं विश्रांति घेत व त्या दिवशीं कांहीं गोष्टी करण्याचा प्रतिबंध असे.

ॲकेडियन लोकांनीं पंचांगाची कल्पना काढली. शहरोंशहरीं ग्रहा-लयें बांधून ग्रहांचे ते वेध घेत असत; व त्याचे 'रिपोर्ट' ही राजांकडे

पाठवीत असत. त्यांनीं राशिचक्रांची व राशींची कल्पना काढिली. सूर्यावर छिद्रें (spots) आहेत, हें त्यांना कळून आलें होतें, व धूमकेतू त्यांना माहित होते. ग्रहणें केव्हां घडतील हें त्यांना गणितानें ठरवून आधींच प्रसिद्ध करितां येत असे. अशा प्रकारचें त्यांचें ज्योतिःशास्त्राचें ज्ञान असे.

( ४ ) शिळा, माती वगैरे जिनसांच्या यादी त्यांनीं करून ठेविल्या आहेत. तसेंच त्यावेळच्या नद्या, शहरें, पर्वत यांच्या भूगोलविषयक यादी आहेत. तसेंच पक्षी, पशु, किडे वगैरेच्या यादीही आहेत. अलीकडच्या काळचीं शास्त्रें व त्यांतील शोध जर सोडून दिले तर असें दाखवितां येईल कीं, ॲक्केडियन लोकांना बहुतेक आजच्यासारखेंच ज्ञान होतें.

( ५ ) ॲक्केडियन वाङ्मयाचा आणखी एक मोठा भाग ह्मटला ह्मणजे त्यांचे इंद्रजाल अगर जादूविषयक लेख होत! यांत देवतांना, कांहीं स्तोत्रें रचून, अशी प्रार्थना केली आहे कीं, तूं अमुक कर, अमक्याचा रोग घालीव, अमक्याबद्दल त्रास होऊं नये. या स्तोत्रांत अजब शक्ति आहे; व त्यांत देवतांना व भूतांना आकलन करण्याची योग्यता आहे असें ते मानीत. त्यांचें हें ऐंद्रजालिक वाङ्मय बरेंच असून, त्याविषयीं मि० लेनॉर्मेंट यांनीं एक स्वतंत्र पुस्तकच लिहिलेलें आहे.

( ६ ) खाल्डियन वाङ्मयाचा आणखी एक महत्त्वाचा भाग ह्मटला ह्मणजे त्यांचे करारनामे ( अगर करारपत्रें ) होत. परदेशी व्यापाऱ्यांना रक्कम कर्जाऊ देणें वगैरे जे व्यवहार हे लोक करीत असत, त्यांवर या करारपत्रांच्यायोगें बराच प्रकाश पडतो. अशीं करारपत्रें ५००० वर सांपडलीं आहेत. त्यांतील कांहीं शब्द अजून दुर्बोध आहेत. रक्कम कर्जाऊ देणें; घरदार, शेतें, धान्य, दास वगैरे विकणें लग्नाचे ठराव, हुंड्याची रक्कम ठरविणें; प्रॉमिसरी नोटस् वगैरे अनेक

होते. त्यांचीं दैवताख्यानें मोठीं गमतीचीं आहेत. त्यांचा वाचकांनीं हवा असल्यास स्वतंत्र पुस्तकांमधून अभ्यास करावा. या विषयावर रागोझिन, लेनॉर्मेट, रॉलिन्सन्, स्मिथ्, बॉलिस्बज् वगैरे लेखकांचे वेगळाले ग्रंथ आहेत. ते वाचकांनीं विशेष माहितीसाठीं व सविस्तर वर्णनासाठीं अवलोकन करावेत. या आमच्या लेखांत साधारण वाचकालाही जी माहिती उपयुक्त व मनोवेधक वाटेल, तीच फक्त दिली आहे. इतिहास व धर्म या विषयांवर येथें विशेष विवेचन याच कारणामुळें केलेलें नाहीं. शोधकांची जिज्ञासा इकडे वळल्यास बरेंच होणारें आहे. असो.

---

प्रकरण ५ वें.

## खाल्डियन लोकांची रहाणी व त्यांच्या कला.

त्यांचें मुख्य कर्तव्य ह्मणजे धार्मिक कृत्यांकडे विशेष लक्ष देणें होय! देवांच्या प्रार्थना व त्यांची पूजा यांजकडे त्यांचा विशेष ओढा असे. देउळांमधून ते कशा प्रकारें पूजाअर्चा वगैरे करीत असत हें कळण्यास आज साधन उरलेलें नाहीं. पण सणांचे वगैरे दिवशीं देवांच्या मूर्तीसह त्यांचे उपाध्याय मिरवणुकीचे उत्सव करीत असत. राजे लोक देवळाच्या व्यवस्थेसाठीं मोठमोठ्या देणग्या देत असत; इतर लोकही यथाशक्ति त्यांचेंच अनुकरण करीत. यामुळें देवळांची व्यवस्था ठीक चालत असे. अदृश्य व अव्यक्त देवतांच्या दृश्य मूर्ती करून त्यांची पूजा करण्याकडे त्यांची विशेष प्रवृत्ति असे. या मूर्तीसमोर ते प्रार्थना वगैरे करीत असत. गिझ्डुबार किंवा इझ्डुबार विषयींचीं काव्यें ह्मणजे यांचे पवित्र ग्रंथ होत. या लोकांच्या प्रार्थना अजून उपलब्ध आहेत. प्रत्येक ७ व्या दिवशीं ते विश्रांति घेत. राजवाड्यांच्या द्वाराजवळ ते मोठमोठ्या दगडांच्या मूर्ति ठेवीत. या मूर्ति सपक्ष वृषांच्या, नर–सिंहाच्या, नराश्वांच्या, वगैरे असत. या प्रचंड मूर्ति राजवाड्यांचें रक्षण करीत अशी यांची समजूत असे. या मूर्तींत बरेंच कौशल्य दिसून येतें. या मूर्ती ह्मणजे यांचे द्वारपालक होत.

मरणानंतर यांचे प्रेतांचें दहन करीत असत; त्याकरितां भट्ट्या जळत ठेविलेल्या असत. २००० वर्षांपूर्वीं जाळलेल्या माणसांची राख आंत असलेलीं भांडीं अलीकडे सांपडलेलीं आहेत.

या लोकांचा मुख्य धंदा ह्मणजे युद्धाचा होय! मुख्य राजा निवर्तल्याबरोबर, त्याचे सर्व मांडलिक स्वतंत्र होत असत. ह्मणून वरचेवर स्वाऱ्या करून त्यांना कबजांत ठेवावें लागे. इतरही कारणांमुळें युद्धें

होत. दंगेधोपे वगैरे कारणांखेरीज द्रव्यलोभ वगैरे इतर कारणेंही असत. युद्धांत हे लोक तरवारी, बाण, बर्च्या वगैरेंचा उपयोग करीत. अलीकडील काळांत शिरस्त्राणें व ढाला यांचा ते उपयोग करूं लागले होते. यांच्या लढाया ह्मणजे व्यवस्थित युद्धक्रिया नसून, हल्ले, छापे, लहान लहान चकमकी हींच असत. एकदां एखादें शहर घेतलें ह्मणजे त्याचा ते पूर्ण विध्वंस करून टाकीत; शहरांतील सर्व लोकांची कत्तल करीत व गांव लुटून नेत असत. कांहीं राजे कत्तल न करितां, लोकांस कैद करून आणीत व त्यांजकडून देऊळें व राजवाडे बांधविण्याचीं कामें करवीत असत. शहरांस वेढा दिला ह्मणजे भिंतीवर चढण्यासाठीं ते शिड्यांचा उपयोग करीत, व तळाशीं खणण्यासाठीं लोक ठेवीत. त्यायोगें शहरच्या भिंती लवकरच ढिल्या होऊन पडण्यास योग्य होत.

ह्या लोकांचें व्यापाराकडे विशेष लक्ष असे. यांच्या पेढींचें वर्णन आह्मी वर केलेलेंच आहे. हे लोक दासांचा व्यापार करीत असत; पैसे कर्जाऊ देत घेत; व्याजबट्टा करीत असत; घरेंदारें, शेतें वगैरेंची विक्री करीत.

शरीरानें हे लोक ठेंगणे व जरा जाडे असत. त्यांचीं नाकें रुंद, ओंठ जाड व डोळे तिरपे असत. त्यांचे केंस काळे व कुरळे असून दाट असत. ते रंगित कपडे वापरीत व पायांत वाहाणा घालीत.

यांचीं मुलें लहानपणापासूनच शिकावयास लागत. ॲकेडियन व ॲसीरियन भाषेंतील सर्व शब्द शिकणें हें मोठेंच काम होतें. यांच्या शाळा व कॉलेजें असत. यांचीं शालोपयोगी पुस्तकें सांपडल्याविषयीं आह्मी मागेंच लिहिलें आहे. उपाध्याय व धर्मगुरु हे ज्योतिषाचा व गणिताचा अभ्यास करीत. राजा सर्व सत्ताधारी असे. मरणाची शिक्षा देणें अगर न देणें हें त्याच्या मर्जीवर असे. खाल्डियन राजे आपली करमणूक कशी करीत असत, हें कळून येत नाहीं. ॲसीरियन राजे मात्र सिंहाची शिकार करीत. बाबिलोन शहरीं प्राचीन काळचे अनेक ग्रंथ सांठदून

ठेविलेलें असत. तेथील ग्रंथभांडार व पुस्तकालयें मोठालीं आहेत, ह्मणून तथ विद्वान् लोक सर्व ठिकाणांहून येत असत. बाबिलोन शहर हें त्यावेळीं मोठेंच विद्यापीठ असे. त्यांच्यांत उत्तमोत्तम गणित व ज्योतिषशास्त्रज्ञ असत; त्यांनीं गोलांचीं वगैरे चित्रें काढून ठेविलीं आहेत व वर्तुलांत अंश पाडलेले आहेत.

हे लोक **खोदीवकामांतही** प्रवीण असत. भांडीं व दगड यांजवरील यांची नक्षी चांगल्या तऱ्हेची आहे. ख्रि० पू० ३८०० वर्षीं सारगॉननें ज्यावर लेख लिहिलेला आहे, तो दगड उत्तम रीतीनें साफ करून, त्यावर अक्षरें बऱ्याच चांगल्या तऱ्हेनें कोरलेलीं आहेत. यांचें नक्षीचें काम उत्तम तऱ्हेचें आहे. राजे, देवता, वगैरेंचीं चित्रें यांनीं खोदून ठेविलीं आहेत. राजांचे शिक्क्यावरचें खोदीव कामही बरेंच चांगलें वठलेलें आहे. यांचीं चित्रें इंग्रजी पुस्तकांमधून पाहण्यास मिळतात. असो.

हे लोक उत्तम **बांधकाम** करीत. यांनीं जीं देउळें व जे राजवाडे बांधिले आहेत तीं व ते अप्रतिम आहेत. भाजलेल्या ( पक्क्या ) विटांनीं ते आपलीं देउळें व राजवाडे बांधीत. या विटा उत्तम प्रकारच्या आहेत. यांच्या देउळांविषयीं व राजवाड्यांविषयीं आह्मीं मागें विशेष माहिती दिलेलीच आहे. प्रत्येक विटेवर राजांचा शिक्का असे. कमानी व स्तंभ यांचा बांधकामांत कसा उपयोग करावा, हें त्यांस माहीत होतें. उत्तमोत्तम प्रकारच्या दगडांचा ते राजवाडे बांधण्यांत उपयोग करीत असत; राजवाड्यांभोंवतीं बागबगीचे असत; व राजे नवीन नवीन रोपें आणून तेथें लावीत. राजवाड्यांत कलाकौशल्याच्या बऱ्याच जिनसा असत. जस्ताचे पुतळे, कांचेच्या 'बाटल्या' व पात्रें, ॲलॅबॅस्टर ( एक प्रकारचा दगड ) चीं भांडीं, हस्तिदंती तऱ्हतऱ्हेच्या रंगांचें सामान वगैरे जिनसा राजवाड्यांत आढळून येतात. याशिवाय इतर मूल्यवान वस्तू हे लोक **फीनिशियन** व **ईजिप्शियन** लोकांपासून आणीत असत. असो.

प्रत्येक दिवशीं नवीन विटा व लेख सांपडत आहेत. त्यामुळें नवीन शोध पुष्कळ लागत आहेत. आजपर्यंतच्या लागलेल्या शोधांचा सारांश आह्मी येथें दिला आहे. हजारों विटा मिळाल्या आहेत, आणखीही नवीन मिळत आहेत. शरकल्प लिपि जाणणारे लोक फार थोडे आहेत; पण लेख अतिशय आहेत. या विषयाचा अभ्यास मोठा मजेदार आहे. खाल्डियन लोकांचें ज्ञान किती होतें, हें अझून यानंतरच अनेक नूतन शोधाअंतीं कळून येणार आहे. असो.

श्रीकृष्णार्पणमस्तु

---

# अर्वाचीन शोधांनीं पाश्चात्य आशियाच्या प्राचीन इतिहासावर पडलेला नवीन प्रकाश!

## परिशिष्ट १ लें.

दिवसेंदिवस आशियामैनर, मेसोपोटेमिया, पालिस्टाइन, ईजिप्त वगैरे ठिकाणचे बरेच लेख सांपडत आहेत, व त्यांचा यूरोपचे लोक जारीनें अभ्यास करीत आहेत. तथापि लेखांच्या मानानें शोधकांची संख्या अझून बरीच कमी आहे. या अलीकडे सांपडलेल्या प्राचीन लेखांमुळें पाश्चात्त्य आशियाच्या प्राचीन इतिहासावर बराच नवा प्रकाश पडलेला आहे, व पुष्कळ गोष्टी ज्या पूर्वीं संशयित होत्या त्या आतां निश्चित झालेल्या आहेत. क्वचित् ठायीं तर बायबल्मधील जे **ऐतिहासिक** भाग काल्पनिक मानण्याची पद्धत असे, तें **खरोखरच** घडून आले अशाबद्दल प्रत्यंतरें मिळालीं आहेत.

बायबलमध्यें सांगितलेलें ' हिट्टाइट् ' ( Hittites ) लोकांचें राज्य अशाच प्रकारचें होय! हें केवळ काल्पनिक होतें असें मानण्यांत येई. परंतु अर्वाचीन शोधकांना या **राज्याचा** पत्ता व शोध लागला, व त्याच्या खरेपणाविषयीं त्यांची खात्री झाली. असे अनेक परिणाम या शोधांमुळें घडून आलेले आहेत; व आशियाच्या पश्चिम भागाच्या प्राचीन इतिहासावर बराच नवा प्रकाश पडलेला आहे. असो. ' जुन्या करारां ' तील बराच भाग काल्पनिक आहे, अशी जी समजूत होती ती आतां बरीच नाहींशी झालेली आहे; व बायबलमधील **बराच** भाग विश्वसनीय ऐतिहासिक माहितीवर

रचिलेला आहे हें आतां कळून चुकलें आहे. उत्खनन व शोधन यांच्यायोगें प्राचीन राज्यांची माहिती मिळाली; व ती बायबलमधील हकीकतीशीं ताडून पाहतां बरोबर जुळली. यामुळें बायबलमधील ऐतिहासिक भाग खरोखर कांहीं तरी आधारानेंच रचिलेला आहे असें कळून आलें. बायबलच्या हकीकती ज्या लेखांशीं जुळतात, ते लेख अलीकडचे नसून त्या त्या हकीकतीचे समकालीनच असल्यामुळें अशा लेखांचें व त्यामुळें बायबलच्या ऐतिहासिक भागाचें महत्त्व वाढलेलें आहे.

हिट्टाइट राज्याविषयीं तर अगदींच नवीन शोध लागला. हें राज्य खरोखरच अस्तित्वांत होतें, इतकेंच नव्हे तर तें एक बलाढ्य राज्य होतें, असें आतां कळून आलें आहे. दुसरा सारगॉन् ( ॲसीरियाचा राजा ) हा ख्रि० पू० ७२२ ते ७०५ पर्यंत निनिव्हे शहरीं राज्य करीत होता. यानें जेरुसलेमवर हल्ला केला होता याविषयीं संशय होता, तो आतां लेखांच्यायोगें पार नाहींसा झालेला आहे; व बायबलमधील याविषयींचें वर्णन खरें ठरलें आहे.

सर्वांत महत्त्वाचा शोध म्हटला म्हणजे कायरस् बद्दलचा होय! कायरसनें स्वतः लिहून ठेविलेले लेख आतां मिळालेले असल्यामुळें बऱ्याच पूर्वींच्या कल्पना आतां चुकीच्या ठरलेल्या आहेत. कायरस् हा इराणचा राजा असून तो झरथुष्ट्रचा अनुयायी होता अशी आजपर्यंत समजूत होती; परंतु तो इलाम प्रांताचा राजा असून मर्डुक् देवतेचा भक्त होता, असें आतां कळून आलें आहे. ही देवता खाल्डियन् लोकांची होय! कायरस् हा एकेश्वरी पंथाचा नसून, अनेकेश्वरवादी होता असें ठरलें आहे. या इलामच्या राजानें—कायरसनें—पुष्कळ दिवस बाबिलोन शहरास वेढा घालून नंतर तें काबीज केलें, अशी जी पूर्वी समजूत होती ती आतां चुकीची आहे, असें कळून आलें आहे. ख्रि० पू० ५३८ मध्यें कायरसनें कांहीं प्रयास न पडतां बाबिलोन शहर घेतलें, व तेथील देऊळें व मूर्ति यांचा ( पूर्वी

समजत होते त्याप्रमाणें ) **विध्वंस न करितां** उलटें त्यांची **नीट व्यवस्था लावून दिली** असें आतां कळून आलें आहे.

याहून महत्त्वाचा शोध ह्मटला ह्मणजे, सन १८८१ मध्यें सांपडलेला **सिलोअम** ( Siloom ) येथील शिलालेख होय! या लेखाच्यायोगें, ज्यू ( यहूदी ) लोक **हिझिकियाच्या** ( Hezekiak ) अगर त्याच्याही पूर्वींच्या **सॉलोमनच्या** वेळीं, कोणती लिपि वापरीत असत, व त्या लिपीचीं अक्षरें कशीं होतीं, हें कळून आलें आहे. **सिलोअम** लेखाची भाषा हिब्रू आहे. यावरून त्या काळचे यहुदी लोक सुधारलेले व अक्षर व विद्यासंपन्न लोक होते असें कळून आलेलें आहे. इस्त्रायलिट लोकांनीं ( ज्यूनीं ) बांधलेलें ( Pitham ) **पिठम्** नांवाचें शहरचें आतां उत्खनन केलेलें आहे; त्या शहरांत **ग्रंथभांडार** असे. त्याचप्रमाणें **एक्सोडसचा** कालही आतां ठरलेला आहे. एक्सोडस ह्मणजे इस्त्रायलिट लोकांचें (ईजिप्तमधून) " **बाहेर निघणें** " होय! असो.

येवढ्यानेंच कांहीं संपलें नाहीं. ईजिप्त व असीरिया येथील लेखांच्या योगानें तेथील लोकांच्या धर्मसमजुती कशा काय होत्या, हेंही आतां कळून आलें आहे. याप्रकारें पुष्कळ गोष्टींचा नवीन शोध लागलेला आहे. या ५०–६० वर्षांत यूरोपीयांनीं बरेंच महत्कृत्य केलेलें आहे. तथापि अजून पुष्कळच करावयाचें आहे. असो. याप्रमाणें थोडक्यांत आह्मीं प्राचीन् लेखांचा इतिहासावर काय काय नवा प्रकाश पडला हें येथें दिलें आहे.

---

## परिशिष्ट २ रें

# हिट्टाइट् लोकांचें राज्य !

हिट्टाइट् ( Hittites ) लोकांचा बायबलमध्यें वारंवार उल्लेख आलेला आहे. परंतु हे लोक काल्पनिकच असावेत असें आजपर्यंत यूरोपीयनांस वाटत होतें. परंतु गेल्या ५०–६० वर्षांत जे कांहीं नवीन शोध लागलेले आहेत, त्यायोगें या प्राचीन बलाढ्य राज्याचा शोध लागला, व तें खरोखरच पृथ्वीवर होतें, याबद्दल आतां कोणी शंकासुद्धां काढीत नाहीं; परंतु थोड्या वर्षांपूर्वी त्यांचें अस्तित्वच लोक नाकबूल करीत असत.

हें प्राचीन राज्य कांहीं लहानसान नव्हतें; या राज्यानें अनेक वेळां ईजिप्त व ॲसीरियासारख्या नांवाजलेल्या राष्ट्रांच्या विजयी सेनांस थबकवून धरिलें होतें. यानें पश्चिमेस यूरोपखंडांत ईजियन समुद्र व ग्रीसचा किनारा येथपर्यंत आपले विजयध्वज फडकविले होते व आपली कारागिरी नेली होती. परंतु अशा राज्याचें नांवदेखील आजपर्यंत लोकांस माहीत नव्हतें. परंतु एकाएकीं या राज्याचा सन १८७९ सालीं शोध लागला. तो असा. अलीकडे ग्रीस देशांत डॉ० स्लीमननें जीं उत्खननें मायकिनी ( Mykenæ ) येथें चालविलीं होतीं, त्यांत असें आढळून आलें कीं, ग्रीस देशांतील प्राचीन कारागिरी पाश्चिमात्य आशियांतील कारागिरीशीं साम्य पावते; व पाश्चिमात्य आशियांतही एक प्रकारचे विशिष्ट अवशेष सांपडले. हे आजपर्यंत ठाऊक असलेल्या कोणत्याही राष्ट्राचे नव्हते. हे कोणातरी भिन्न राष्ट्रीयांचे असावेत असा सहजच तर्क निघाला. हे विशिष्ट कारागिरीचे अवशेष लिडियापासून थेट पूर्वेकडील कॅपॅडोकिया व लिकाओनियापर्यंत पसरलेले आढळले.

इकडे ईजिप्त देशांतही शोधांचें कार्य जारीनें चालू होतें. ईजिप्त-मध्यें जे शिलालेख सांपडले, त्यांवरून असें कळून आलें कीं, खि० पू० १३२९ च्या पूर्वीं बरींच वर्षेंपर्यंत ईजिप्तचे राजे हिट्टाइट नांवाच्या लोकांशीं लढाया करण्यांत गुंतले होते. या लोकांच्या दोन राजधान्या असत. एक **ऑरॉंटिस्** नदीवरील **काडेश्** शहर, व दुसरी युफ्रेटिस् नदीवरील **कारचेमिश्** शहर. ईजिप्तचा राजा दुसरा रामसिस् यानें ( Ramses II ) तर या हिट्टाइट लोकांशीं तह करून, हिट्टाइट राजाच्या मुलीशीं विवाह केला. हा रामसिस् खि० पू० १३९२ ते १३२९ पर्यंत ६७ वर्षेंपर्यंत ईजिप्तचा **फाराओ** ( राजा ) होता. पुढें खि० पू० ११३० मध्यें, ॲसीरियन राजा **तिग्लथपिलेशर**—( पहिला )—याला या लोकांनीं युफ्रेटिसच्या कांठीं अडविलें. यानंतर हिट्टाइट लोक ॲसीरियन लोकांच्या राज्यतृष्णेस जेथें तेथें अडथळा आणूं लागले. शेवटीं खि० पू० ७१७ मध्यें ॲसीरियाच्या दुसऱ्या सारगॉन राजानें त्यांचें **कारचेमिश्** शहर हस्तगत केलें; तेव्हांपासून या लोकांचें नांवही कोठें निघत नव्हतें. परंतु अलीकडे लेखांच्या शोधांमुळें ही हकीकत कळूं लागलेली आहे. बायबलमध्यें या लोकां-संबंधीं जे उल्लेख आलेले आहेत, ते आतां लोकांना खरे वाटूं लागलेले आहेत. असो.

हिट्टाइट् लोक विद्यासंपन्न असत. त्यांची एक विशिष्ट तऱ्हेची **चित्रलिपि** ( Heiroglyphics ) आढळलेली आहे. या **चित्रलिपी**-बरोबरच जी एक विशिष्ट कारागिरी आढळली, ती मागें सांगितलेल्या पश्चिम आशियांतील व ग्रीसमधील कारागिरीशीं जुळते. सारांश, ती कारागिरी व लिपि या हिट्टाइट लोकांचीच होय हें १८७९ सालीं प्रो० सेयस् यांनीं प्रसिद्ध केलें; व पुढें ही गोष्ट मान्य होऊन तीस इतर शोधांनीं बळकटीही येऊं लागली. अलीकडच्या या सर्व शोधांनीं आतां असें ठरलें आहे कीं, या लोकांच्या ताब्यांत एके काळीं बहुतेक आशियामैनरचा भाग होता. या लोकांचें दक्षिणेकडे हॅमॅथ् येथेंही राज्य होतें.

हे लोक कॉकेशस पर्वतानजवळचे असून, शेमेटिक नव्हते, हें आ
निर्विवाद ठरलेलें आहे. हिट्टाइट लोकांची भाषा शेमेटिकही ना
व इंडो यूरोपियन जातीचीही नाहीं, असें त्यांच्या नांवावरून स
जून येतें. यांच्या भाषेचा व लिपीचा सध्या यूरोपियन पंडित शे
करीत आहेत.

हिट्टाइट कलाकौशल्य बाबिलोनियापासून घेतलेलें आहे; पण तें खु
ख्रि० पू० १२०० च्या पूर्वीच घेतलें असावें, असें शोधक समजत
पण बाबिलोनियापासून घेतलेल्या या कारागिरीमध्यें हिट्टाइट लोक
एक विशिष्ट फरक करून, तीस नवीन वळण दिलेलें आहे.

ख्रि० पू० ३८०० मध्यें, ॲसीरियाच्या पहिल्या सारगॉन
वेळीं जो ज्योतिषग्रंथ रचण्यांत आला, त्यांत या 'खट्ट' वि
हिट्टाइट् लोकांचा उल्लेख आहे. यावरून त्या काळींदेखील हे ल
आपल्या उत्तरेकडील स्थानापासून दक्षिणेकडे आले होते असें कळ
येतें. सुमारें ख्रि० पू० ४००० वर्षीच हे हिट्टाइट लोक उत्तरेक
दक्षिणेकडे उतरले होते हें उघड आहे.

या लोकांनीं बाबिलोन देवतांचाही स्वीकार केला होता. त्यां
मुख्य देवता इस्टार किंवा ॲस्टोरेथ् ही बाबिलोनियन लोकांपासू
घेतली होती. याशिवाय विशेष कांहीं माहिती या लोकांबद्दल सध
मिळालेली नाहीं. पुढें मागें नवीन शोधाच्यायोगें अधिक माहि
मिळण्याचा बळकट संभव आहे. परंतु ख्रि० पू० ३८०० पासून ७१
पर्यंत ज्या लोकांनीं जगांत मर्दुमकी गाजविली, ते लोक इतके दिव
पर्यंत असे स्मृतिपथांतून नष्ट होऊन, पुनरपि दृष्टोत्पत्तीस यावेत, ही प
मोठ्या आश्चर्याचीच गोष्ट होय!!!

---

परिशिष्ट २ रें

# ईजिप्तमधून ज्यू लोकांचें ( Exodus ) निर्गमन.

खाल्डियन लोकांच्या ( Ur ) अर, अर्वाचीन मोघीर--शहरापासून ॲब्राहाम हा पश्चिमेकडे निघून गेला. तो खाल्डियन लोकांमध्यें असल्या-मुळें हिब्रू लोकांमध्यें खाल्डियन लोकांच्या कल्पना व कथा वगैरे शिरणें साहजिक होतें. त्याप्रमाणेंच, खाल्डियन लोकांच्या प्रळयकथा, उत्पत्ति-कथा, मनुष्याची पतनकथा, वगैरेशीं 'जुन्या करारां'तील हकीकती बहुतेक जुळतात. त्यावरून या कथा खाल्डियन लोकांपासून हिब्रू लोकांनीं ग्रहण केल्या असाव्या असें कळून आलें आहे. ॲब्राहॅम हा खाल्डियन लोकांच्या अर शहरांतून निघून पश्चिमेकडे गेला तेव्हां खाल्डियावर इलामी राजांचा अंमल होता. इलामी राजा खुडुर--ननखुंडी यानें ख्रि० पू० २२८० वर्षीं खाल्डियादेश जिंकून घेतला. इलामी लोकांकडे खाल्डिया देश सुमारें ख्रि० पू० ( स्थूळ मानानें ) २३००--२००० पर्यंत होता. नंतर हम्मुराबिनें इलामी लोकांस खाल्डिआंतून बाहेर हांकून लाविलें. तेव्हां ॲब्रॉहॉम जो अरमधून गेला, तो ख्रि० पू० २२८० ते २००० च्या दरम्यान--किंबहुना २२८० नंतर थोड्याच काळानें ह्मणजे सुमारें २२५० व्या वर्षीं अरमधून पश्चिमेकडे गेला असावा, असा अगदीं अलीकडील पाश्चात्य लेखकांचा समज आहे. ॲब्राहाम हा पुढें इजिप्त-मध्यें आपल्या ज्यू लोकांबरोबर गेला, तेव्हां ईजिप्तमध्यें ( Hyksos ) हैक्सॉस् जातीचे धनगर राजे राज्य करीत असत. हे मूळचे ईजिप्तचे राजे नव्हत. हे उत्तरेकडून आशियामैनर वगैरे भागांतून आलेले विदेशीय व परकी राजे होत. हे जातीनें शेमेटिक असत; ह्मणून ॲब्रॉहॉमची शेमेटिक भाषा त्यांस कळण्यास कठीण पडलें नाहीं. ॲब्रहॉमच्या यांच्या-कडून आदरातिथ्यच झालें. या धनगर शेमिटिक राजांची राजधानी ( Zoan ) झोअन् शहर होतें. हे शेमेटिक ( शमी ) राजे ईजिप्तवर

एकूण ५११ वर्षे राज्य करीत असत. हे सुमारें ख्रि० पू० २२६१ पासून १७५० पर्यंत ईजिप्तवर होते. हे लोक राज्य करीत असतां (ख्रि० पू० सुमारें २२५० वर्षी) ॲब्रहॅम ईजिप्तमध्यें गेला. असो.

ॲब्राहॅम ईजिप्तमध्यें गेला, तेव्हां ईजिप्तचें राज्य बरेंच प्राचीन झालें होतें. ह्मणजे ख्रि० पू० २२५०च्या सुमारासच ईजिप्तचें राज्य बरेंच प्राचीन झालें होतें. या राज्याच्या प्राचीनत्वाची कल्पना थोडी-तरी येण्यासाठीं ईजिप्तच्या इतिहासाचा थोडासा गोषवारा येथें देण्याचा विचार आहे.

ईजिप्तचें राज्य बरेंच प्राचीन आहे. त्याची प्राचीन राजधानी मेम्फिस शहर होतें. या राज्याचे पहिले ६ वंशांनीं मिळून १४७८ वर्षेपर्यंत राज्य केलें. पुढच्या ५ वंशांनीं मिळून सुमारें १०२२ वर्षेपर्यंत राज्य केलें. ह्मणजे ११ वंशांनीं मिळून सुमारें २५०० वर्षे-पर्यंत राज्य केलें. यानंतर **बारावा** वंश राज्य करूं लागला. या वंशांतील **उसर्टसेन** (पहिला) हा ख्रि० पू० २७५०च्या सुमारास राज्य करीत होता. हा **बारावा** वंश ईजिप्तवर राज्य करीत असतांच Hyksos **हैक्सॉस** धनगर राजे ईजिप्तवर चाल करून आले व त्यांनीं तो देश काबीज केला. पुढें १८ व्या वंशाच्या Ahmes ॲह्मस् नांवाच्या मूळ पुरुषानें (हा ईजिप्तच्या मूळ राजांपैकीं एक होता) सुमारें ख्रि० पू० १७५० सालीं या परकी राजांस हांकून दिले, व त्याबरोबर त्यांच्या ज्यू मित्रांचाही छळ होऊं लागला.

ईजिप्तचे पहिले ६ वंश मोठ्या भरभराटींत होते. ४ थ्या वंशाच्या वेळींच (Gizeh) गिझे येथील मनोरे बांधण्यांत आले. पहिल्या ६ वंशांसच **प्राचीन साम्राज्य** असें ह्मणतात. ६ व्या वंशानंतर ईजिप्तच्या राज्याची भरभराट कमी झाली व राज्यास उतरती कळा लागली. ही स्थिति सुमारें १००० वर्षेपर्यंत टिकली. पुढें १२ व्या वंशाच्या वेळीं ईजिप्तची स्थिति पुनः सुधारत

चालली होती; बाराव्या वंशानें आपली राजधानी **मेम्फिस्** शहराहून **थीबस** येथें नेली. हा १२ वा वंश चालू असतांच वर सांगितलेले **शमी** लोक ईजिप्तवर चाल करून आले. असो.

ख्रि० पू० सुमारे १७९९ च्या सुमारास **ॲपोफिस्** नांवाचा **शमी** राजा ईजिप्तवर राज्य करीत होता; तेव्हां **जोसेफला** त्यानें राजा केलें. पुढें १७९०च्या सुमारास १८ व्या वंशाचा संस्थापक **ॲह्मस्नें** या **शमी** लोकांस हांकून लाविलें व इस्त्रायलिट् लोकांचा तो छळ करूं लागला.

आशियामैनर व सीरिया वगैरे प्रांतांतून **शमी** लोक येऊन त्यांनीं ईजिप्तवर चोपून ५११ वर्षें राज्य केलें, ही गोष्ट आह्मी मागें सांगितली आहे. आतां याचा सूड घेण्याची वेळ आली. ख्रि० पू० १७५० च्या सुमारास १८ व्या वंशाच्या संस्थापकानें या शमी लोकांना ईजिप्तच्या बाहेर हांकून दिलें. पुढें याच ( १८ व्या ) वंशांतील **थोथ्मस** ( तिसरा ) वगैरे मोठमोठ्या राजांनीं, पुढें ख्रि० पू० १६०० च्या सुमारास, पालिस्टाइन, सीरिया व युफ्रेटिस नदीपर्यंतही आपले विजयध्वज फडकविले, व शमी लोकांवर आपला करडा अंमल चालविला व सूड उगविला. पुढें २०० वर्षांनीं १९ वा वंश सुरू झाला होता. राम्सिस् ( दुसरा ) याचा बाप **सेटि** ( पहिला ) हादेखील मोठा जेता होता. यानें आशियामध्यें मोठमोठे जय मिळविले होते. दुसऱ्या राम्सिस्नें इस्त्रायलिट् लोकांचा फार छळ केला. या रामसिसनें सीरिया, आशियामैनर, वगैरेमध्यें जे जय मिळविले, त्यांत इस्त्राय लिटांचा उल्लेख नाहीं. यावरून त्याच्या वेळीं अजून इस्त्रायलिट् लोक **कानान** प्रांतांत गेले नव्हते असें कळून येतें. शमी लोकांच्या **झोअन्** शहराची दुरुस्ती रामसिसनें केली. त्या शहरास **रामसिस्** असें नांव ठेविलें. हें शहर व पिठम् नांवाचें दुसरें एक शहर, रामसिस्च्या कारकीर्दींत त्यानें **इस्त्रायलिट** लोकांकडून बांधविलें. या **पिठम्** शहरांत अलीकडे जीं उत्खननें चालू होतीं

त्यांवरून ज्यू लोकांचे निर्गमनाचा आतां काळ ठरलेला आहे. पिठम् या शहरास सक्कथ असेंही एक व्यवहारिक नांव होतें. इस्रायलिट लोक शेवटीं या सक्कथ ऊर्फ पिठम् शहरांतूनच—जेथें ते काम करीत होते तेथून—निघाले. रामसिसनें हीं शहरें बांधविलीं तेव्हां रामसिस्च्या मरणानंतरच इस्रायलिटांचें ईजिप्तमधून निर्गमन झालें हें कळून आलें आहे. हा रामसिस् (दुसरा) खि. पू. १३९२—१३२९ पर्यंत ६७ वर्षे राज्य करीत होता. याच्यानंतर याचा पुत्र मेनेप्टाह (दुसरा) गादीवर आला. तो खि. पू. १३२९ च्या सुमारास राज्यारूढ झाला. ह्यानें फारदिवस पर्यंत राज्य केलें नाहीं. याच्या राज्यांत ख्रि० पू० १३२० मध्यें ईजिप्तच्या उत्तर भागावर लिबियन लोकांच्या स्वाऱ्या झाल्या; त्यांना मागें हटवीतोंपर्यंत नाकीं नव आले. याच्या राज्यांत दुसरी महत्त्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे इस्रायलिटांचें ईजिप्तमधून निर्गमन हीं होय. ही गोष्ट १३२९—२० च्या दरम्यान झाली. असो. या प्रमाणें आतां निर्गमनाचा काळ ठरलेला आहे.

याप्रमाणें, ख्रि० पू० ५२५० किंवा स्थूल मानानें ५००० वर्षांपासून तों १३२९—२० पर्यंत आह्मी ईजिप्तच्या इतिहासाचें प्रसंगानुसार वर्णन केलें. या गोष्टी अधिक सुगम होण्यासाठीं खालीं एक काळमानाचें कोष्टक दिलें आहे.

## ईजिप्तच्या राज्याचें कालमान.

| | ख्रि० पू० |
|---|---|
| पहिले सहावंश—१४७८ वर्षे | ५२५०—३७७२ |
| गिझे येथील मनोरे—४ थ्या वंशांत | सुमारें—४००० |
| ७ ते १२ पर्यंतचे पांच वंश— | „ ३७७२—२७५० |
| उसर्टसेन (पहिला) १२ व्या वंशांतला— | „ २७५० |
| हैक्सॉसयामी लोकांचा ईजिप्तवर अंमल ५११ वर्षे | २२६१—१७५ |

| | |
|---|---|
| ॲब्रॅहॅाम् ईजिप्तमध्यें गेला—सुमारें— | २२९० |
| ॲपोफिस् व जोसेफ्——————,, | १७९९ |
| ॲह्मस्-१८ व्या वंशाचा संस्थापक शर्मी लोकांस हांकून लावतो ,, | १७५० |
| थोथ्मस् ( तिसरा ) आशियांत जय मिळवितो— ,, | १६०० |
| १९ वा वंश अस्तित्वांत असतो— ,, | १४०० |
| राम्सिस् (दुसरा) ईजिप्तवर राज्य करितो रामूसिस् व पिठम् शहरें इस्राय लिटां- | १३९२ |
| कडून बांधवितो. त्यांचा छळ करतो. आशियांत जय मिळवितो. एकूण ६७ वर्षे राज्य करितो. | ते १३२५ पर्यंत |
| मेनेसाह ( दुसरा ) राज्यारूढ होतो—— | १३२५ |
| इस्रायलिटांचें निर्गमन —— | १३२५ ते २० |

---

परिशिष्ट ४ थें

# हिब्रू भाषेचे जुने शिलालेख.

( १ ) हिब्रू भाषा प्राचीन काळीं कशी होती व तिची लिपि कशी होती, हें जाणण्याची यूरोपीयांस पुष्कळ दिवसांपासून इच्छा झाली होती. शेवटीं १८६९ सालीं, **मोअबचा** राजा **मेशा** याचा एक शिलालेख सांपडला. यानें इस्रायलिटांचा राजा **अॅहब** ( Ahab ) याच्या मरणानंतर ( ख्रि० पू० ८९१ ) इस्रायलिटां-विरुद्ध बंड करून **स्वातंत्र्य** मिळविलें; व याची त्यांनीं हकीकत एका दगडावर लिहून ठेविली आहे. या दगडास **मोअबाइट् शिला** असें ह्मणतात. याची राजधानी **किर्था** शहर होतें. याचा देव **चेमॉस** होता. असो. या लेखाची लिपि **फिनीशियन** अक्षरांची आहे. या वरून ख्रि० पू० ८९० च्या सुमारास फिनीशियन् अक्षरें कशीं होतीं हें कळून आलें आहे.

याशिवाय, दुसरा एक शिलालेख सांपडला आहे. सन १८८१ सालीं **सिलोअम** येथील शिलालेख सांपडला. याची भाषा अतिशुद्ध बायबल्च्या हिब्रू भाषेसारखीच आहे. या दगडावर कालमान जाणण्यास कांहीं साधन नाहीं. परंतु हा दगड व त्यावरचा लेख **हिझिकियाच्या** वेळचा असावा, असें यूरोपीयन पंडितांचें मत आहे. हा **हिझिकिया** ख्रि० पू० ७२९ ते—७०१ च्याही पुढें राज्य करीत होता. परंतु, हिझिकियाच्या पूर्वीं याविषयीं उल्लेख असल्यामुळें हा लेख सॉलोमनच्या वेळचा ( ख्रि० पू० १००० ) आहे, असेंही कित्येकांचें ह्मणणें आहे. या लेखांवरून हिब्रू लिपीचीं अक्षरें ख्रि० पू० ७०० च्या पूर्वीं कशीं होतीं हें कळून आलें आहे. या प्रकारें या ४ परिशिष्टांत अलीकडील शोधांचें थोडेसें सार दिलें आहे.

## परिशिष्ट ५ वें.

# इंडो-यूरोपीयन लोकांचें मूळ निवासस्थान!

संस्कृत भाषेचा अभ्यास पाश्चिमात्यांमध्यें सुरू झाल्यापासून, तुलनात्मक भाषाशास्त्रास ( Comparative Philology ) एक प्रकारचें नवीन वळण मिळालें. संस्कृत भाषेच्या ज्ञानानें पाश्चिमात्य शोधकांचें डोळ्यांपुढें एक नवें जगच उभें राहिलें. इतर कोणत्याही भाषेंत नसलेले अति प्राचीन ग्रंथ त्यांना संस्कृत भाषेमुळेंच उपलब्ध झाले. तेव्हां तुलनात्मक भाषाशास्त्रज्ञांस एक नवीन विषय मिळाला, यांत फारसें आश्चर्य वाटण्याजोगें असें कांहीं नाहीं. संस्कृत वाङ्मयानें व तदंगभूत भाषाशास्त्रानें यूरोपीय लोकांची १८९० सालपर्यंत अशी समजूत झाली होती कीं, पाश्चिमात्य आर्य व पूर्वात्य आर्य यांचे समान-पूर्वज ह्मणजे ( Indo-Europeans ) मध्यआशियांत अगर कॉकेशस् पर्वताजवळ कोठेंतरी रहात असले पाहिजेत; व तेथून [ १ ] आशियामैनरमधून [ ग्रीस, रोम, वगैरे देशांत ] पश्चिमेकडे यूरोपमध्यें; [ २ ] इराणमध्यें; [ ३ ] पंजाबमधून हिंदुस्थानांत; याप्रमाणें तीन दिशेनें त्यांच्या टोळ्या फुटून गेल्या असाव्यात. पण अलीकडे भाषाशास्त्रांत जे अनेक नवीन शोध लागले आहेत, यांवरून ही समजूत खोटी ठरलेली आहे. आशियामैनरमधून आर्यलोक यूरोपमध्यें गेले अशी जी पूर्वीं समजूत होती, ती आतां सर्वथैव खोटी ठरलेली आहे. अलीकडे ५०-६० वर्षांत जे ( शरकल्प ) लेख उघडकीस आलेले आहेत, त्यांत आर्य नांवें किंवा त्यांचे अपभ्रंश बिलकुल आढळून येत नाहींत. कुरडिस्तानपासून हालिस् ( Halys ) पर्यंतच्या विस्तृत प्रांतांत असे शरकल्पलेख मिळालेले आहेत. प्रो० सेयस् यांनीं वॅनिक टेक्स्ट चा ह्मणजे वॅन सरोवराजवळील लेखांचा जो अर्थ लाविलेला आहे, त्यावरून तर हें अगदीं स्पष्ट होतें कीं, **आर्यलोक आर्मीनियामध्यें ख्रि० पू० ६४० च्या पूर्वीं कांहीं गेले नाहींत**; ख्रि० पू० ६४० नंतर जे आर्य लोक अर्मीनियांमध्यें गेले ते बहुतकरून हिरोडोटस् [ ७.७३ ] व युस्टा-

थिर्लॉन् ( on Dion ९.१९४ ] यांच्या मतांप्रमाणें फ्रीजियामधील एक वसाहत असावी, असें वरील प्रो० साहेबांचें ह्मणणें आहे. ( प्रो० सेमन् यांचा Introduction to the science of language, preface, P. XXII पहा. )

यावरून आर्यलोक आशियामैनरमधून यूरोपमध्यें शिरले अशी जी समजूत होती, ती चुकीची ठरून, ते उत्तरेकडून पश्चिमेकडे यूरोपमध्यें गेले असावेत अशी कल्पना निघाली. भाषोत्पत्तिशास्त्राचाही याच कल्पनेस आधार मिळाला. एशियामध्यें आर्यलोकांचें मूळ निवासस्थान नसून, तें जास्त उत्तरेकडे ह्मणजे बाल्टिक समुद्रकांठच्या प्रदेशांत व जर्मनीच्या उत्तर भागांत असावें, अशी कल्पना प्रथम मि० लॅथ्याम् ह्यानीं काढिली; व अलीकडे भाषाशास्त्र, मानवजाति विचारशास्त्र वगैरे शास्त्रांच्या आधारें मि० पोयश्री व पेंका यांनीं हीच कल्पना सिद्ध केलेली आहे. हीच कल्पना प्रो० सेमस् यांनादेखील मान्य आहे [ यांचा उपरिनिर्दिष्ट ग्रंथ प्रस्तावना, पृ० २२ पहा ]. यांचीं मतें अशीं आहेत कीं वरील प्रदेशांत ( बाल्टिक समुद्रकांठचा प्रदेश ) आर्यन् भाषा विशेष विस्तार पावल्या व त्या पुढें आर्यन् लोकांबरोबर चोहोंकडे पसरल्या. असो. याप्रमाणें १८९० सालच्या सुमारास मध्य आशियांतून आर्यन लोकांचें निवासस्थान बाल्टिक प्रदेशापर्यंत जाऊन पोंचलें होतें. परंतु अलीकडे तर तें आणखीही जरा उत्तरेस गेलें आहे. अलीकडचा रा० बाळ गंगाधर टिळक यांचा शोध स्वतंत्रपणेंच काढलेला असल्यामुळें वरील मतें स्वतंत्र रीतीनें रा. टिळकांच्या मतांस पुष्टीच आणीत आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. रा० टिळकांच्या मतें, आर्य लोकांचें मूळ निवासस्थान सुमारें १२–१४००० वर्षांपूर्वी उत्तरध्रुवाकडे होतें. ह्या मतास आधार ह्मणून त्यांनी भूगर्भशास्त्राचे सिद्धांत पुढें आणून, सुमारें १२-१४ हजार वर्षांपूर्वी उत्तरध्रुवाकडील प्रदेश मनुष्यांस वसतियोग्य होते असें दाखविलें आहे. [ त्यांचा Arctic Home in the Vedas हा ग्रंथ व त्याविषयींचा उल्लेख, रसिक-रंजन, खंड १ ला, पृ० २९ पहा. ] याप्रमाणें आर्यलोकांचें वसतिस्थान दिवसेंदिवस उत्तरेकडे जात आहे व तें उत्तरध्रुवाच्याच ठिकाणींच असावें असें ठरूं पहात आहे.

# छत्रपति शिवाजी महाराज यांच्या बायका

१ तंजावर शहरीं एका गृहस्थाच्या दफ्तरांत खालील टिपण सांपडलें. ह्या टिपणांत थोरले शिवाजी महाराज ह्यांच्या बायकांचीं व त्या बायकांपासून झालेल्या संततीचीं नांवें दिलीं आहेत. ग्रांट डफ यास तीन स्त्रियांचींच नांवें माहीत होतीं. ज्यांच्या पुस्तकावरून ग्रांट डफनें आपली बखर अंशतः रचिली त्या मल्हार रामरावासहि तीन स्त्रियांचीं नांवें माहीत होतीं. रामदासस्वामींच्या बखरींत चार स्त्रियांचीं नांवें दिलीं आहेत. मराठ्यांच्या इतिहासाच्या चवथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत मींहि चार स्त्रियांचीं नांवें दिलीं होतीं. प्रस्तुत टिपणावरून असें दिसतें कीं, शिवाजीस एकंदर आठ बायका, सहा मुली व दोन मुलगे होते. पैकीं मुलांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. अलीकडील पाच सहा वर्षांच्या शोधांत फक्त दोन तीन मुलींचीं नांवें तेवढीं कळलीं होतीं. प्रस्तुत टिपणावरून शिवाजीच्या संततीपैकीं बहुतेकांचीं नांवें कळलीं असें दिसतें.

२ प्रस्तुत टिपण अर्धमुर्धे असून त्याचे पहिले व शेवटले बंद गहाळ झाले आहेत. टिपण जुन्या कागदावर मोडींत लिहिलें असून बरेंच विश्वसनीय आहे. टिपण येणेंप्रमाणें आहे ::—

राजांनीं तें दस्तक मानून, या उभयता वजिरासहि घेऊन तंजाउरचे वकिलांहीं एकोजीराजास कुमकेस्तव प्रार्थना केली. तेव्हां एकोजी राजे सकळ सैन्यानिशीं कुमकेस येतांना वाटेस अरणीचें राज्य साधून, वेदाजी भास्कर यांस अरणीचे किल्यांत ठेऊन, तंजाउरास येऊन, त्रिचनापल्लीच्यांसी युद्ध करून, त्यांस पळवून, तंजाउरच्यांस मोकळीक करून, आपण बेंगरुळास प्रयाण करून, तिरमळवाडींत राहिले. तेव्हां त्यांची स्त्री दीपाबाई सौभाग्यवती पूर्णगर्भीण समागमें होती. एकोजीराजे तिरमळवाडीस उतरले तेव्हां दीपाबाई सौभाग्यवतीस प्रसवकाळ होऊन, एकोजीराजांस

द्वितीय पुत्र शके १५९६ राक्षस संवत्सरीं तिसरे सरफोजीराजे जा
तेव्हां एकोजीराजांस सैन्यांत देवांनीं येऊन सांगितलें जे, तुह्मीं तंजाउ
राज्य सोडून जाऊं नका, तुमचे वर्षपरंपरेनें हें राज्य भोगावयास कार
आहे, उद्यां पहाटेस तुह्मांस संविधान होईल. ह्मणून सांगितलें. तैसेंच
दुसरे दिवशीं तंजाउराहून योग्यायोग्य चर्चेमुळें एकास एक भेद पडू
अमात्यपद करणारहि विघडून, तिरमळवाडीस होते त्या ऐकोजीराजां
तुह्मीं हें राज्य परिपालन करावें ह्मणून प्रार्थिलें. ईश्वरसंकल्पास टाळ
न ये ह्मणून अंगीकार करून एकोजीराजांहीं तंजाउर किल्ल्यांत प्रवे
केला. पुढें विस्तारेंकडून तंजाऊर प्रांतीं या वंशाचे राजे जाले तें प्रकर
लिहिण्यांत येईल.

२ पुर्णे प्रांतीं सकळ दिग्विजय करून राहिलेल्या शिवाजीराजां
अष्टनायिका त्यांचीं नांवें:—

१ सौ सईबाई निंबाळकरांची
२ ,, काशीबाई जाधवांची
३ ,, सकवारबाई गायकवाडांची
४ ,, पुतळाबाई पालकरांची
५ ,, सगुणाबाई शिरक्यांची
६ ,, सोयराबाई मोहित्यांची
७ ,, फंर्जदांची लेकी
८ ,, विचाऱ्यांची लेकी

या अष्टनायकांसमवेत शिवाजीराजे सुख भोगीत असतां वडील स
बाईचे पोटीं तिघी कन्या व एक पुत्र जन्मले. त्यांचें नांव संभाजीरा
ह्मणून ठेविलें. त्या संभाजी राजाचें जन्म शके १५७९ त जालें. ति
कन्या. पैकीं प्रथम कन्या सकवारबाईस निंबाळकराचे घरीं दिल्हें, दुस
कन्या राणूबाईस जाधवाचे घरीं दिल्हें, तिसरी कन्या अंबिकाबाई
महाडिकांचे घरीं दिल्हें. त्या हरजी महाडिकासच चंजीप्रांतीं किते
जहागिरीहि दिल्हा. दुसरी स्त्री, काशीबाईसाहेबास संतति नाहीं. तिस

स्त्री, सखवारबाईसाहेबास कमळाबाई ह्मणून एक कन्या, ते पालकर नेतोजीस दिल्ही. चौथी, पुतळाबाईसाहेबांस संतति नाहीं. पांचवी, सगुणाबाईसाहेबांस रानकुवरबाई ह्मणून कन्या जाली ते गणोजी शिर्के यांस दिल्ही. साहवी स्त्री, सोयराबाईसाहेबांस एक पुत्र जन्मला त्यास राजारामराजे ह्मणून नांव ठेविलें, दुसरी कन्या बाळीबाई. तदनंतर, शिवाजीराजे यांनीं आपले ज्येष्ठ पुत्र संभाजीराजे यांस शके १५९८त आपलें स्वराज्य पुणें प्रांत तक्त देऊन धाकटे पुत्र राजाराम यांस प्रथम चंदीचें राज्य दिलें. सर्वेच महत्कलह पडून पुणेंप्रांत यवनाक्रांत जाल्यावेळेस राजाराम चंदीहून निघून तंजावरचे किल्यांतहि थोडे दिवस भावापासीं असून उपरि शिवाजी राजांनीं बलावूं पाठविलें तेव्हां बापापासीं पावले. त्यांस पनाळगड देऊन, आपण सेतुयात्रेनिमित्त गुप्तमार्गेकडून येऊन, गुप्तपणें तंजाउरचा किल्ला फिरोन पाहून, एकोजीराजांस सांगोन पाठविलें जे, तुह्मी संपादिलें राज्य समग्र आह्मी पाहिलें, तुमचा किल्ला गरुडाद्रि आहे, थोरले किल्यास चारी बाजूनें चारी किल्ले आहेत, परंतु कठिण प्रसंग पडल्यास दक्षिणेकडील उपकिल्ला मात्र पाणियाचा आहे तेवढा राखून, वरकड पाडून सोडणें, आह्मी किल्यांत आलों तेव्हां एका दुकानांत शिक्का टाकिला तो सोधून पाठवणें. तदनंतर, एकाकित सेतुयात्रा करून तक्तास पावले. तदनंतर, शिवाजीराजे, दोघे पुत्रांस राज्य नेमून, सकळ पृथ्वींतहि प्रख्यात नांव पावून, सकळ शत्रूंसहि पराभवातें पाववून निःशैल्य जाल्यावरि जन्म घेतल्याची कृतकृत्यता कांहीं जाली ह्मणून प्रपंच व राज्यपदवीचा परित्याग करून, पारमार्थिक निवृत्तिमार्गाचे ठायीं मन प्रेरून, तोच दृढाभ्यास धरून, शाश्वत अशा स्वपदास आनंदरूप होऊन पावले.

शाहूराजे शके भावसंवत्सरीं जन्मले.

---

# मुकुंदराज

१ मराठी भाषेंतील आद्य ग्रंथकार कोण, ह्यासंबंधीं आज पन्नास पाऊणशें वर्षे संदेह चालू आहे. कोणी ह्मणतात, मुकुंदराज आद्य; व कोणी ह्मणतात, ज्ञानेश्वर आद्य. पण ह्या वादांत कांहीं तात्पर्य नाहीं. कारण, वादी व प्रतिवादी ह्या दोघांनाहि, पुरावा ह्मणजे काय, तो न्यायासनापुढें आणावा कसा, व त्याचें आविष्करण कोणत्या शब्दांनीं करावें, ह्या तीन गोष्टी बहुतेक बिलकुल कळलेल्या नाहींत. मराठी-भाषेचा आद्यग्रंथकार ज्ञानेश्वरहि नाहीं व मुकुंदराजहि नाहीं. ह्या दोघांच्याहि पूर्वीं निवृत्ति, गैनी, हेमाडी, वगैरे सनातनधर्मीयांनीं व चक्रधरादि महानुभाव व जैन यांनीं ग्रंथरचना केली आहे; व त्यापैकीं निवृत्तीची गीता, हेमाडीच्या पद्धती, वगैरे ग्रंथ उपलब्ध आहेत. तेव्हां ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांच्यावर आद्यग्रंथकर्तृत्वाचा आरोप करणें केवळ अप्रस्तुत आहे. ह्या दोघांपैकीं ग्रंथकर्तृत्वांत पूर्वापर कोण, हा प्रश्न मात्र, प्रस्तुत असून, सोडविण्याला शक्य आहे.

२ तंजावरांतील पुस्तकालयांत मुकुंदराजाचे विवेकासिंधु, पंचीकरण व परमामृत, हे तीन ग्रंथ आहेत. पैकीं पंचीकरणांत मुकुंदराजाची गुरु-परंपरा दिली आहे, ती अशीः—

१ श्रीआदिनाथ
|
२ श्रीहरिनाथ
|
३ श्रीरघुनाथ
|
४ श्रीमुकुंदराज

३ ज्ञानेश्वराची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें:—

१ आदिनाथ
|
२ मत्स्येंद्रनाथ
|
३ गोरखनाथ
|
४ गैनीनाथ
|
५ निवृत्तिनाथ
|
६ ज्ञाननाथ ( ज्ञानेश्वर )

४ पैकीं निवृत्तिनाथ व ज्ञानेश्वर ह्यांच्या वयांत दोन चार वर्षांचेंच अंतर असल्यामुळें, त्यांची पिढी वस्तुतः कालगणनेंत एकच धरणें भाग आहे. ह्मणजे आदिनाथापासून मुकुंदराजाची चवथी पिढी व ज्ञानेश्वराची पांचवी पिढी होते. दर पिढीस वीस वर्षे धरलीं तर ज्ञानेश्वराहून मुकुंदराज वीस वर्षांनीं वडील ठरतो. ज्ञानेश्वराचा सर्व कारभार विशीच्या सुमारास आटोपला. मुकुंदराज राजयोगी असून तो जोगाईच्या अंब्यास पर्वतांतील गुहेंत योगसाधन करून पूर्ण शंभर वर्षे जगला, अशी आख्यायिका मुकुंदराजाच्या आंबें येथील शिष्यशाखेंत प्रचलित आहे. त्यावरून असें ह्मणावें लागतें कीं ज्ञानेश्वरानंतर चाळीस पन्नास वर्षे मुकुंदराज होता. ह्याचा अर्थ असा होतो कीं, ज्ञानेश्वर जन्मण्याच्या पूर्वी चाळीस वर्षे व मरण्याच्या नंतर चाळीस वर्षे मिळून शंभर वर्षे मुकुंद-दराज जगला. ह्मणजे मुकुंदराज ज्ञानेश्वराच्या आधींहि होता व मागूनहि होता.

५ मुकुंदराज शैव होता व द्वारसमुद्राच्या शिवोपासक बल्लाळ राजांचा त्याला आश्रय होता. द्वारसमुद्राच्या बल्लाळांचें राज्य शक

१२३२ च्या सुमारास अस्त पावलें. त्यानंतर पंचवीस तीस वर्षांनीं मुकुंदराज वारला.

६ आतां एक प्रश्न राहिला. ज्ञानेश्वरी आधीं किंवा विवेकसिंधु वगैरे ग्रंथ आधीं. विवेकसिंधूची एक बरीच जुनी पोथी—सुमारें ३०० वर्षांची जुनी—तंजावरांतील सरस्वतिमहालांत आहे. तिची भाषा मज-जवळील मुकुंदराजाच्या ज्ञानेश्वरीच्या पोथींतल्यासारखी आहे. जोगाईच्या आंब्यास जी जुनी पोथी आहे ती तर तेथील शिष्यमंडळीस वाचतांहि येत नाहीं व अर्थात् समजतही नसावी. ह्यावरून असें एक अनुमान करतां येतें कीं ज्ञानेश्वरीच्या सुमारास—किंचित् अगोदर—विवेकसिंधु लिहिला गेला असावा.

७ ज्ञानेश्वर भक्तिमार्गांत विठ्ठलभक्त होता व त्यानें अभंगादि लौकिक ग्रंथरचना केली आहे. तशी अभंगादि ग्रंथरचना मुकुंदराजानें केलेली प्रसिद्ध नाहीं. शिवाय, विठ्ठल हें विष्णुदैवत आहे; व मुकुंदराज शिवोपासक होता. हाच ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांच्यांतला मुख्य भेद होय. दोघेहि आदिनाथसंप्रदायांतील होते. परंतु एक केवळ शिवोपासक होता. व दुसरा शिव व विष्णु ह्या दोघांचा उपासक होता. ज्ञानेश्वराची मुकुंदराजापेक्षां जास्त थोरवी जी आहे ती ह्याच गोष्टींत आहे.

———

# रघुनाथपंडित

१ मद्रास इलाख्यांत आरणी ह्मणून जें शहर आहे त्यांत चार मराठी कवी झाले; पहिला आनंदतनय, दुसरा रघुनाथपंडित, तिसरा सुभानराव व चवथा गोसावीनंदन. आरणीचे महाराष्ट्रब्राह्मण त्या प्रांतीं धिप्पाडपणा, राकटपणा व शूरपणा ह्या तीन गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत.

कंगाल हे ब्राह्मण आरणीचे ।
परंतु ते शूर रणांगणींचे ॥

हा श्लोकार्ध सर्वांमुखीं त्या प्रांतीं असलेला आढळून येतो.

२ रघुनाथपंडिताचें दमयंतीस्वयंवर प्रसिद्ध आहे. त्याखेरीज रामदासवर्णन व गजेंद्रमोक्ष अशीं दोन पद्यें तंजावरास भाऊस्वामींच्या मठांत सांपडलीं. पैकीं रामदासवर्णन येणेप्रमाणें:—

आह्मांतुह्मांस भववारिधिमाजि तारूं
जे वाचितां परिसितां मग होय तारूं ।
जे दासबोधरचना घडली जयाला
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥ १ ॥

वैराग्यभाग्य भरलें असतां अनन्या
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्तिकन्या ।
चौथी तयांत वरिली उरल्या न पाहे
तो आमुचा गुरु समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥

श्रीरामदासगुरु शांतिवधूस अंगीं
अंगीकरूनि मिरवे स्वसुखांतरंगीं ।
रंगीं उभा कर उभारुनि वंदनाचे
नाचे मुखीं गुण वदे रघुनंदनाचे ॥ ३ ॥

खेळावयास हनुमंत गडी जयाचा
जो या महीवरि वतंस जितेंद्रियांचा ।
ज्याचीं पदें प्रणमितातिं कवींद्र राजे
श्रीरामदास गुरु तो अमुचा विराजे ॥ ४ ॥
जो डोंगरी गिरिदरीं फिरतां न भागे
ज्याची पवित्र घन कीर्ति जनीं विभागे ।
जो तत्वबोधकविता करिता न मोजी
तो रामदास गुरुवर्य नमो नमो जी ॥ ५ ॥
शोभे शतद्वय समास समासभारीं
जो दासबोध निजबोधसुखा उभारी ।
त्या सेवटीं दशक जोडित जो विसावा
श्रीरामदासगुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥
चिद्बोधसेज अरुवार नव्या फुलांची
सायुज्यमुक्ति ललना असतां जयाची ।
तो रामदास अकळत्र असें गणावें
अज्ञान होत जन, काय तयां ह्मणावें ॥ ७ ॥
जो लेखणीसहित कागद दौति वाहे
तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ।
हस्ती तयासि मिरवी फिरवी विनोदें
श्रीरामदासगुरु तो नमिला प्रमोदें ॥ ८ ॥
जो भर्जरी सरस पाटलवर्ण चेलें
शोभे जयास लघुसें निटळीं अवाळें ।
बोले समर्थ रघुवीर समर्थ ऐसें
तो मी स्तवीन निजसद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥
जेणें प्रशिष्य निजशिष्य अनेक केले
देतां प्रसाद कफनी कफ नीट जाले ।
लोकाभिराम गुण बोलत राम कर्ता
साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥

श्रीरामदासगुरुवर्णनरूपपद्यें
वृत्तें वसंततिलका सुजनैकहृद्यें ।
संख्या करूनि दशकावरि एकतेनें
केली अपूर्व रघुनायकपंडितानें ॥ ११ ॥

३ ह्या वर्णनांत कवि आपणां स्वतःस रामदासाच्या शिष्यवर्गांत गणतो; व वर्तमानकालाचा उपयोग करून वर्णनसमयीं समर्थ जिवंत होते, असें दर्शवितो. ह्यावरून रघुनाथपंडिताचा समय शक १५८२ पासून १६४२ पर्यंत असावा, असें निश्चयानें विधान करणें शक्य होतें.

४ हा कवि बराच वयातीत वारला, असें ह्याच्या खालील उक्तीवरून दिसतें:—

ह्यातारा बहु जाहलों, कवण ही त्राता नसे भेटला
भाताची तजवीज ते च उदरीं भाता गमे पेटला ।
हातामाजि नसे च येक कवडी हा ताप आतां हरी
दातारा मज वाचवी सदय हो माता पिता तूं हरी ॥ १ ॥

हा श्लोक रघुनाथपंडितांचा ह्मणून तंजावरांतील बहुश्रुत लोक सांगतात. श्लोकावरून असें दिसतें कीं, इतर अनेक कवींप्रमाणें रघुनाथपंडित फुटक्या कवडीलाहि महाग होऊन, उतार वयांत वारला. ह्याचा मृत्युकाल सुमारें शक १६४२ धरावा.

५ पंडितांचें गजेंद्रमोक्षकाव्य दमयंतीस्वयंवराइतकेंच हृदयंगम आहे. वाचकांच्या रंजनार्थ तें येथें देतों. अंतर्गत सौंदर्यामुळें तर तें प्रिय होईलच. पण नावीन्यामुळें जनांच्या कृपादृष्टीस तें पात्र होईल, अशी खात्री वाटते.

## गजेंद्रमोक्ष

कोठें वैकुंठ कोठें गजपतिस बळें नक्र वोढी तटाकीं
तेथें जो लागवेगेंकरुनि पवनसा धावला पावला कीं ।
तो स्वामी स्मर्तृगामी निरवधिकरुणासिंधु बंधू प्रणामी
लक्ष्मी वत्सें ललामीं स्मरुनि निजमनामाजि गायीन नामी ॥१॥

कैसा तोयचरें गजेंद्र धरिला तो हीं तया माधवें
कैसा सोडविला करूनि करुणा भक्तैकहृद्बांधवें ।
हें आम्ही परिसूं परीक्षिदवनीनाथें असे बोलता
जाला श्रीशुक बोलता परिसता राजा सुखें डोलता ॥ २ ॥

उंच योजनशतें शत साजे
लांब रुंद हि तसाच विराजे ।
तो त्रिकूटशिखरी वरि तुंगें
स्वर्णलोहरजतात्मक शृंगें ॥ ३ ॥

शृंगाभिधानक विशाळ धरूनि भाला
तेणेंकरूनि गिरि तो गिरितो नभाला ।
जोपा झरे-जल-तृणें करितो मृगांची
जो पाझरे निजतटाकतटांत सांची ॥ ४ ॥

जयावरी होय निगा नगांची
सदैव विश्रांति खगामृगांची ।
जागे जयाचे उदरीं दरींचे
विलास तेथें सुरसुंदरींचे ॥ ५ ॥

नदीनद तयावरी सजल जे तयांचे तटीं
पटीरनिकटीं वटीं जटिलतांदलांचे पुटीं ।
कटीं धरुनि गोमटीं हरिवधूटिका लेंकरें
फळें भरुनि तन्मुखें करिति सन्मुखें ही करें ॥ ६ ॥

उद्यान येक ऋतुपाख्य तया त्रिकूटीं
केलें स्वतंत्र वरुणें निजकेलिसाठीं ।
नाना फुलीं विकसतां सकळांस भासे
हे या मिसेंकरुनि चैत्ररथास हांसे ॥ ७ ॥

चिगुरले, फुलले, फळले तसे
तरु च भूषण तें वन लेतसे ।
सकळिकां कळिकांस विकासवी
मधु सुवासनिवास विकासवी ॥ ८ ॥

लतेतळीं रुंदनिरुंद कालवे
गळोनि तेथें मकरंद कालवे ।
परागही सांद्र तयांत रंगती
फुलांसवें भृंगतती तरंगती ॥ ९ ॥

रुचति मधुर जैसीं चांगली तूपकेलें
सुरुचिर रचितैसी लागलीं तूपकेळें ।
शिवति गगन तैशा नारिकेळीं रसाळें
सहित फळकदंबे सांद्र केळी रसाळें ॥ १० ॥

उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसांचे ॥
घोस तसे फणसांचे षण्मासांचे तसे च वरिसांचे ॥ ११ ॥

विख्यात नामें लवलीलता जे
फलावलीनें लवली विराजे ।
चंद्रोदयीं घोंस तिचे फुलांचे
होती विसांवे अलिनीकुलांचे ॥ १२ ॥

दालिंबें स्वादु लिंबें कुरवक–बदरी–वृक्ष सीताफळांचे
जेथें जंबूफळांचे समुदय पिकले घोंसही श्रीफळांचे ।
वेळाचे वेल वाचे न वदवति जसे ते तसे वेलवांचे
शाखीं वायू जयांचे विवर रव करी जोड जे पावयांचे ॥ १३ ॥

तया वनीं एक तटाक तोयें
तुडुंबलें तामरसानपायें ।
निरंतरामंद मरंद वाहे
तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ १४ ॥

वीतां मरंद उदरंभर वंभरांचें
जे होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ।
तें पद्म जेथिल सहस्र दलां धरीतें
प्रत्यक्ष सूर्यकिरणास विसांवतीतें ॥ १५ ॥

तया वनसरोवरीं उमलतां सरोजें रजें
मिळोनि मिरवे दळीं सलिल मौक्तिकाकार जें ।
तयास सम आणिकें कवण माणिकें मोकळीं
असोत जरि पोवळीं दिसति कोवळीं कोवळीं ॥ १६ ॥

मधुपांचीं खिल्लारें सरोवरामाजि कुमुदकल्हारें ।
इंदुविकासविलासें होतीं सकळा समान सोल्लासें ॥ १७ ॥

अमृतही पयही ह्मणवीतसें
मधुर सारसतें जल गातसें ।
मधुरसा रस यास्तव गातसे
उभय होय तसी रुचि वीतसे ॥ १८ ॥

राजहंसा तया तोयीं राजहंस विसावती
चक्रें हीं चक्रवाकांचीं चक्राकार विराजती ॥ १९ ॥

ऐसे तटाक वरुणोपवनांत जेथें
पूर्वोक्त पर्वतवनस्थ गजेंद्र तेथें ।
येतो कुटुंबसमवेत तृपार्त जाला
मार्तंडचंडकिरणीं अति तप्त केला ॥ २० ॥

सखे मायेभाचे चुलतपुतणे आणि चुलते
सखे ही सांगातें सळमिसळ जाले सकळ ते ।
स्त्रिया ही जावांयी तनुज निज सायींत दडती
सतीचे वोल्हावे कळतिल गजेंद्रास पुडती ॥ २१ ॥

जो काननीं विचरला चरला तृणातें
धुंडीतसे तृषित चिल्लर थिल्लरातें ।
तो श्रीगजेंद्र जललोभ मनीं धरोनी
दानांबुपान करवी मधुपांकरोनी ॥ २२ ॥

फिरत फिरत ऐसा येत होता पुढारीं
तंव वल वरुणाचें लक्ष जालें निडारीं ।
त्वरित सिरुनि तेथें उंच वाहेस वाहे
तृषित गज तटाकीं तुंबळें अंबु पाहे ॥ २३ ॥

तटाकाचे तोयीं हळुच उतराया चतुर तो
पुढारीं दो पायीं तनुभर उपायीं उतरतो ।
जलातें आरंभीं स्वकरविवरामाजि भरितो
मुखापासी नेतो गजवर पितो तैं वरपतो ॥ २४ ॥
धाला जलेंकरुनि सिंपितसे कपोळीं
दानोदकावरिल भृंगकुळें उडालीं ।
आले सर्व निजकुलोद्भव जे तिहींशीं
क्रीडा करूं उतरला गज निम्न देशीं ॥ २५ ॥
वोढी सनाळ कमलांस तटीं झुगारी
हस्तींद्र शैवललतेस उरें विदारी ।
माथां निमग्न करितां उदकीं उदेले
दानांबुतैलज तवंग सवंग जाले ॥ २६ ॥
ऐसा करी जलविहार करी तटाकीं
बाहेर सत्वर मदांध निघेच ना कीं ।
नक्रें तया अवचितेंचि धरोनि पायीं
आकर्षिलें करुनि शक्ति अगाध तोयीं ॥ २७ ॥
गजबजोनि घनध्वनिभैरवें
गरजला गजराज घनारवें ।
निजबळें पद वोढुनि झाडि तो
प्रबळ नक्र मिठीस न सोडि तो ॥ २८ ॥
जें ग्रस्त तें पद सुटूं गज युक्ति दावी
नक्रावरी पद दुजें उचलोनि रोवी ।
तैं कंटकौघ रुपतांच तळांतरंगीं
माथा करी चपळ तोयतरंगसंगीं ॥ २९ ॥
सोंडेनें सुसरीस वोढुनि जळाबाहेर काढूं तटीं
पाषाणावरि आपटूनि रगडूं पाहे धरी सेपुटी ।
तेथें कंटक टोंचले सिरकले पानीय नासापुटीं
श्वासोच्छ्वास न होयसा गंवसला हस्ती तशा संकटीं ॥ ३० ॥

गजेंद्राचे बंधू कवळुनि गजेंद्रा निजकरीं
कडे काढूं बोढूं सकळ सिणले ही बहुपरीं ।
तया नाटोपेसें करुनि सुसरीनें बळ तसें
दिले झोले नेला गजवर जळीं जेवि न दिसे ॥ ३१ ॥

कांहींसा उफळे जळीं गज बळें कांहीं तळा लागतो
हा बाहेर निघोनि येइल असा लागे च ना लाग तो ।
वर्षांचीं शतकें दहा ढकललीं तीरस्थ होते करी
जे ते ही सुसरीस तो निरखितां गेले क्षणाभीतरीं ॥ ३२ ॥

विचारी तैं हस्ती दृढ मज जयांचे भरवसे
तसे ही गेले कीं विषमसमयीं सोडुनि कसे ।
असो आपद्बंधू यदुपति कृपेचा जलनिधि
स्मरूं, बाहूं, पाहूं धणि वरि उभा राहिल कधीं ॥ ३३ ॥

परविदारविलासविशारदें
क्रकचदारुण नक्र तशा रदें ।
चगळितो गिळितो घन वेदना
न वदवे मज येक मधुसूदना ॥ ३४ ॥

श्रुतिपुटीं नयनीं नयनांतरीं
मज करीं जल हें भरलें तरी
भरतसे वरिचेवरि नावरे
जलचरें धरिलें हरि धांव रे ॥ ३५ ॥

पुच्छकंटककठोरखुरीनें
घोर घाय रचिले सुसरीनें ।
तेवि तीस ही करी करवाळी
श्रीहरी मज करीं कुरवाळी ॥ ३६ ॥

बोणवा करुनि बांस गिळीसा
बोणवा गिळिसि गोपविलासा ।
जो मदीयविपदाग्नि उभा रे
तोतसा गिळि तसा न उभारे ॥ ३७ ॥

ज्यांत काळियविषौघ उदेले
तोय तें पिउनि गोप निजेले ।
ते हरी तव कृपारस सेखीं
वाचले त्रिजग ही परिसे कीं ॥ ३८ ॥

नाच काळियफणांवरि टांचे
कीं जसान माणि ते पिल टोंचे ।
तद्वधू तुज असे विनवीसें
नाचलास यदुराज विलासें ॥ ३९ ॥

माधवा मृदुरवें भरलीनें
मोहिलें जग तुवां मुरलीनें ।
ते उगाचि अधरीं न धरावी
एक वेळ मज ते विकरावी ॥ ४० ॥

चोज काय भुवनत्रयपोटीं
वाहसी नगतसा नग बोटीं ।
तें असो अणुसमान मनाया
वागवी निजपदीं यदुराया ॥ ४१ ॥

हे रजोयुत इला न शिवावें
हेम मानुनि तुवां निजभावें ।
द्रौपदी पटशतावृत केली
वा तुझी अतुल कीर्ति उदेली ॥ ४२ ॥

## पद

प्राणविसाव्या रामा येसील कधीं निरखति जैं तुज डोळे ॥
विश्रांति तयी ॥ धृ ॥
कोणी रामरघूत्तमराघव वदतां ऐसी वाणी ॥
गमतें मजला आला कार्मुकपाणी ॥
निरखु तुजला हृदयिं धरुनि सिराणी ॥
धांवें उगला ॥ १ ॥

निटिळ तटीवरि ठेउनि वाहे भरल्या नेत्रनिडारें ॥
मी वाट तुझी पाहतसे अविचारें ॥
ये राघवजी तुजविण असुनिहि सारें ॥
हा जीव न जी ॥ २ ॥
रघुपतिपंडित भज अखंडित असतां नुसतां रुससी ॥
या कोपभरें किति मान वरवत अससी हें सांग खरें ॥
भावें धरितां द्रिससी हें काय बरें ॥
प्राणविसाव्या रामा ॥ ३ ॥

### श्लोक

देवेंद्र जैं रिचवला च वलाहकातें
तें गोकुळावरि तुवां धरिलें नगातें ।
केले सुखी सकळ गोकुळ गोप पाहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४३ ॥
पोहे पसाभर करीं तुज दे सुदामा
पोहे तयास्तव तया सदनीं सदामा ।
तो नांदला सम जया सुरराज कांहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४४ ॥
वांचावया विजयवीर उपाय केला
भीष्मासमीप पण ही तृणतेस नेला ।
सारथ्य सांग रचिलें च रथीं तुवां ही
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४५ ॥
नाटोपतां मगधराज वृकोदरानें
पाहून खूण समजूनि तुझ्या करानें ।
केला पर्दा मग धरूनि विदीर्ण देहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४६ ॥
जागा तुवां करविला मुचकुंद तो कीं
काळास ही करुनि भस्म निजावलोकीं ।

राहे सुखी तुज विलोकुनि मुक्तिगेहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४७ ॥

## पद

थोर हे उपेक्षा माझी आदरिली काय मुकुंदा ॥ धृ ॥
धांवलासि सजणा स्मरतां संकटीं प्रल्हादासाठीं ॥
पावलासि पांचाळीतें नेसविल्या अंशुककोटी ॥
न दिसे ते तांतडि मोटी ॥
करुणा ये ना कां पोटी ॥
करुणावरुणालय हे गोविंदा ॥ धृ ॥
इंदिराकळत्रा इंद्रें वर्षतां घनघनधारा ॥
गोवर्धन उचलुनि केला त्वां गोकुळलोकां थारा ॥
रजनीनायक कुलहीरा ।
रजनीदिन मी यदुवीरा ॥
भजनीं तंव तत्पर टाकुनि धंदा ॥ २ ॥
जेवढीं अगण्यें दुरितें म्यां केलीं प्रतिफळ घटिका ।
तेवढीं हि जरि भोगविसी तरि कैसी मा मज सुटिका ॥
कमलासनमन्मथजनका ॥
कमलानन यादवतिलका ॥
विमला परिपालितनृपमुचकुंदा ॥ ३ ॥
वंचनाचि अवघी मजसीं करिसी तुं सुरवरवरदा ॥
कांचनांबरा हरि आतां ये रे बा नवकुंदरदा ॥
दीनोद्धारक या बिरदा ॥ राखी गतिविजितद्विरदा ॥
रघुनायकपंडितचित्सुखकंदा ॥ ४ ॥

## श्लोक

नाहीस काय मजमाजि जगन्निवासा
हा मान तो तुज अलिप्तपणें तमासा ।

येणें परी परिसतां अति दीनवाणी
भक्तापुढें प्रगट होय रथांगपाणी ॥ ४८ ॥

लक्ष्मीतें हृदयीं धरी तिजसवें श्रीवत्स ही श्रीहरी
हस्तीं कंबुसुदर्शनांबुजगदा हे आयुधें स्वीकरी ।
शोभे विद्रुर थावरी निवसला सोनेसळा नेसला
आला नीरधराभिराम निकटीं हस्तींद्र उल्हासला ॥ ४९ ॥

माथां दिव्यीं करीरनीरनिटळीं कस्तूरि विस्तारली
कंठीं कौस्तुभकांति शार्ङ्गलतिका अंसस्थळीं थारली ।
सांगाती चतुराननादि विरुदें गाती असा भासला
आला भक्तजनैकबांधव हरी हस्तींद्र उल्लासला ॥ ५० ॥

कर्णी कांचनकुंडलें तळपती तेजें कपोलांकणीं
केयूरें भुजपारिजात फुलले माजी क्वणत्किंकिणी ।
पायीं नूतन नूपुरें कलरवें भासे सवें बोलिला
आला भक्तजनैकबांधव हरी हस्तींद्र उल्लासला ॥ ५१ ॥

## पद

श्रीहरि घणिवरि देखिला ॥ मनिं रेखिला ॥
सखा लेखिला माझा भक्तिरसें केला अखिला राजि राखिला
आजि यादवराजा ॥ धृ ॥
पुनवेचा चांद विराजतो ॥
तन्हि लाजतो मुखदर्पण तैसा कुंडलमणिगणिं साजतो करुनि
साज तो ॥ यदुराज तो ऐसा ॥ १ ॥
गीतगमकगति सुंदरि कंबुकंधरि त्रिवळी धरिताहे ॥
हार उरीं सरसोदरीं शशिसोदरीं ॥ तीस आदरि पाहे ॥ २ ॥
सरळ भरि भुजालता ॥
सविशा लता फुलता तिनगानी कल्पतरूसम शोभता
कर लाभता लोभतावरदानी ॥ ३ ॥

उदरीं जगत्त्रय थारलें नवल थोरलें ॥
त्रिवळीस्तव भासें ॥ नाभिसरोज विकासलें ॥
ज्यातें पोसलें विधिलेंकरूं हांसे ॥ ४ ॥
कास कसुनि सोनेसळा बाप नेसला ॥
तेणें गुल्फपावेतों मुदा मुनिजनिं सेविला ॥
हृदयीं ठेविला ॥ पद झेंपावेतों ॥ ५ ॥
सुमसम कोंवळें पावलें ॥ भक्ता पावले ॥
ज्यांच्या निजनखचंद्रें ॥ संतचकोर भले ॥
भलें सुख पावले ॥ रघुनाथकवींद्रें ॥ ६ ॥

तो पूजिला गजवरें वारिं वारिजातें
देवें करी उचलिला करपारिजातें ।
चक्रेंकरूनि खळनक्र विदारिजेलों
आत्मानुरक्त निजभक्त विमुक्त केला ॥ ५२ ॥
इंद्रद्युम्नाभिधानद्रविडकुलमणी पांड्यराजा हरीतें
ध्यातां मौनस्थ होतां तंव घटजमुनी क्रुद्ध बोले तयातें ।
माझें आतिथ्य कैसें न करुनि धरिलें ध्यान हे काय मस्ती
यासाठीं शाप घेयीं विचरसिल वनीं मत्त होसील हस्ती ॥ ५३ ॥
राजेंद्रें नम्रभावें उपरि विनवितां बोलिजेतें ऋषीनें
हूहूगंधर्व कांहीं चुकत तंव तया शापिलें देवलानें ।
तो जाला नक्र तोयीं धरिल तुज तदा मुक्ति दोघां तुह्मातें
शौरी देयील ऐसें कलशभव वदे जाइ हो स्वस्थळातें ॥ ५४ ॥
तो हा श्री गजराज यासि दिधली देवें सरूपस्थिती
नक्रातें शिवतांच होय मग तो गंधर्व दिव्याकृती ।
स्वामीचे गुण गाय पाय नयनीं पाहे धरी अंतरीं
पावे उत्तम लोक पाहुनि तया आश्चर्य केलें सुरीं ॥ ५५ ॥
तैं समुदाय सुमनाचे ।
हरिवरि वरिसाव करि सुमनाचे ॥

भेरीसख कराया ।
विलंब कैंचा असेल नृपराया ॥ ५६ ॥
गजवर निजरूपें धन्य केला मुकुंदें
स्ववसतिसहि नेला चित्सदानंदकंदें ।
इतर गज पळाले साधिलें काय तेहीं
सुलभलभ तयांला श्रीहरी होत नाहीं ॥ ५७ ॥
श्रीमद्भागवतांतरंगचतुराध्यायीं महाकौतुकें
राजेंद्रास गजेंद्रमोक्ष पहिलें जो बोलिजेला शुकें ।
जो गातां अवधारितां सुखकरी ते मुक्ति नांदे करीं
तो शोभे रघुनाथपंडित निजव्याहारकाव्यांतरीं ॥ ५८ ॥

श्रीगजेंद्रमोक्ष संपूर्ण.

---

# आनंदतनय

१ तंजावर शहरीं भाऊस्वामीच्या मठांत आनंदतनयाचा आठवा वंशज बावा या नांवाचा आहे. ह्याचें वय सध्यां साठीच्या सुमाराचें आहे. गोत्र भारद्वाज, शाखा आश्वलायन. प्रस्तुतचे बावा अरणी-कर नाट्य व नृत्य ह्या दोन कलांत प्रवीण आहेत. आनंदतनयाचें काव्यकर्तृत्व ह्या गृहस्थाचे ठायीं नाहीं; परंतु तत्संलग्न ज्या नाट्य व नृत्य ह्या कला त्यांचा छंद ह्यांना फार आहे. बावांचें बायकापोर कांहीं न राहिल्यामुळें, ह्यांच्यापुढें आनंदतनयाचा निर्वंश होणार आहे.

२ः आनंदतनय हा मूळचा राहणार अरणीचा. विजापूर दर-बारांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व योद्धा वेदो भास्कर याला शिवाजीचा बाप शहाजी यास धरून विजापुरास आणण्याकरितां पाठविलें. ही काम-गिरी त्यानें उत्कृष्ट बजाविल्यामुळें, त्यास विजापूरच्या दरबारांतून अरणी हा प्रांत जहागीर मिळाला. वेदो भास्कराच्या बरोबर आनंदतनयाचा बाप आनंदराव आरणीस आला. आनंदराव चांगला शिपाई असून उतारवयांत संन्यस्त झाला. ह्यानेंच आपल्या मुलाला गुरूपदेश दिला. आनंदतनयाचा जनक पिता त्याचा गुरू होता, ह्या अर्थाची आरती आरणीस एका वृद्ध गृहस्थानें ह्मटली ती अशीः—

संसारार्णवतारक संशयतमसूर्या ।
सज्जनमुकुटालंकृत चिन्मयवैडूर्या ।
धार्मिकजनघन वर्णिति तव चर्या ।
स्वानंदैकविहारा स्वामी गुरुवर्या ॥ १ ॥
जय देव जय देव जय जी आनंदा ।
जय परमानंदा ।
ज्ञानोज्ज्वलनीराजन तुज निजसुखकंदा । ६० ।

नमितां तुझियां पायां न दिसे भवममता ।
रमतां निजात्मबोधें जगिं भरली समता ।
श्रमतां बहुविधजन्मीं जाली विश्रमता ।
दमितां मन मग कैची भवभयविभ्रमिता ॥ २ ॥
अपाप तव पदभजनें अपाप मी जालों ।
कृपापांगें तुझिया उदारा मग आलों ।
अपाय गेले उपाययोगें बहु घालों ।
आनंदनंदन विनवी परिपूरण जालों ॥ ३ ॥

३ वरील आरतीवरून हें निश्चयात्मक सिद्ध होतें कीं आनंदतनयाचा गुरू त्याचा बापच होता. आनंदतनय रामोपासक होता. त्याचें नित्य-पूजेचें रामपंचायतन त्याच्या प्रस्तुतच्या वंशजाजवळ अद्यापि तंजावरास आहे.

४ तंजावरप्रांतीं सध्यां जे महाराष्ट्रब्राह्मण व महाराष्ट्रक्षत्रिय आहेत त्यांची त्यांच्या मूळ तंजावरांत आलेल्या पूर्वजांपासून बहुतेकांची आठवी नववी पिढी आहे. दरपिढी २५ वर्षांची धरली तर आनंदतनय शके १६२२ च्या सुमारास हयात होता असें ठरतें. शके १५७२ च्या सुमारास वेदो भास्करानें शहाजी महाराजास पकडून विजापूरास नेलें. त्यावेळीं आनंदतनयाचा बाप आनंदराव वेदो भास्कराबरोबर होता. शके १५७२ तील जर आनंदरावाची हयात, तर शके १६२२ त आनंद-तनय होता हें निश्चित आहे.

५ आरणींतील वृद्ध लोक सांगतात कीं आनंदतनय, गोसावीनंदन व रघुनाथपंडित ह्यांचा समकालीन होता. रघुनाथपंडिताची मुलगी आनंद-तनयाच्या मुलाला दिली होती. तेव्हां हे दोघे कवी व्याही होते अशी जी आजपर्यंत समजूत होती ती ही खरीच आहे. रघुनाथपंडित व आनंदतनय हे दोघेहि कीर्तन करीत असत.

६ आनंदतनयकृत कित्येक पद्यांच्या शेवटीं " आरणीचा शिपाई " अशीं अक्षरें आल्यावरून आनंदतनय आरणीच्या लढाईत होता, असा

कित्येकांनीं निराधार तर्क केला आहे. इंग्लिश लोक जींत होते ती आरणीची लढाई आनंदतनयानंतर पन्नास वर्षांनीं झाली. आनंदतनयाच्या अगोदर पन्नास किंवा शंभर वर्षें जीं गेलीं त्यांत आरणीस एखादी लढाई झाल्याचें प्रसिद्ध नाहीं. आणि यदाकदाचित् एखादी अप्रसिद्ध चकमक झाली असली तत्रापि ती आनंदतनयाच्या आधीं बरींच वर्षें झाली असल्यामुळें तिचा व आनंदतनयाचा संबंध जुळवूं पहाणें अगदीं निराधार आहे. " आरणीचा शिपाई " हीं पदें योजण्यांत " आरणीच्या शूर ब्राह्मणापैकीं एक " असा अर्थ ध्वनित करण्यापलीकडे आनंदतनयाचा कांहीं एक हेतु नाहीं.

७ तिकडील प्रांतांत आनंदतनयास " आरणीबावा " " आरणीकर " असेंही ह्मणण्याचा प्रघात आहे.

८ काव्यसंग्रहांत छापलेल्या प्रकरणाखेरीज ह्या कवीचीं गर्भगीता, पदें, आख्यानें, वगैरे नवीन प्रकरणें नुकतींच उपलब्ध झालीं आहेत.

---

# एकनाथी संतमालिका

विठ्ठल संतांचें रूपडें । प्रत्यक्ष उघडें नेत्रापुढें
तयासि न जाणती मूढें । विषयजाळीं गुंतलीं ॥ १ ॥
मुक्ताबाई ते सकळ तनू । दीप्ति सांवळी तोचि भानू ।
उभा वटेश्वर जगजीवनू । अति लावण्य शोभतसे ॥ २ ॥
ज्ञानदेव तो श्रीमुखकमळ । वरि निवृत्ति मुकुट झळाळ ।
सोपानदेव तो निढळ । आदिपुरुषरायाचें ॥ ३ ॥
मुकुंदराज पारिसा अवधारीं । श्रवण देवाचे निर्धारी ।
नेत्र विसा चांगा खेचरी । निरंतरीं तिष्ठती ॥ ४ ॥

वडवाळसिद्धनागनाथ ।
नासा, पुढें नामा कबीर दोनि होंट ।
आणि जिव्हा मुद्गलभट ।
निंबा भाट गर्जतसे ॥ ५ ॥
बाहुदंड चोखामेळ ।
बहिरा पिसा वक्षःस्थळ ।
जगमैत्र नागा कंठनाळ ।
जोगा माळ प्रेमाचे ॥ ६ ॥
हृदयीं नांदति दोघे जण ।
अच्युतानंत दोनी स्तन ।
उदर रेणुकानंदन ।
नाभी नृसिंहभारती ॥ ७ ॥
नामापाठक कटिप्रदेशीं । मुधो पीतांबर सुरेशी ।
चरणीं अलख रोहिदास । आणि दुसरा सुरदास सांवता ॥८
नारा म्हादा गोंदा विठा । या देवापाईंच्या क्षुद्रघंटा ।
ज्योतिरानंद वाजटा । तोडरि येका जनार्दनु ॥ ९ ॥

इति श्री संतमालिका संपूर्णास्तु । श्रीरामार्पणमस्तु ।

( १ ) ह्या संतमालिकेंत ( १ ) मुक्ताबाई, ( २ ) भानुदास, ( ३ ) वटेश्वर, ( ४ ) ज्ञानदेव, ( ५ ) निवृत्ति, ( ६ ) सोपान, ( ७ ) मुकुंदराज, ( ८ ) परिसा, ( ९ ) विसा खेचर, ( १० ) चांगा, ( ११ ) वडवाळ सिद्धनागनाथ, ( १२ ) नामा, ( १३ ) कबीर, ( १४ ) मुद्गलभट, ( १५ ) निंबाभाट, ( १६ ) चोखा–मेळा, ( १७ ) बहिरा पिसा, ( १८ ) जगमैत्र नागा, ( १९ ) जोगा माळ, ( २० ) अच्युत, ( २१ ) अनंत, ( २२ ) रेणुकानंदन, ( २३ ) नृसिंहभारती, ( २४ ) नामापाठक, ( २५ ) मुधो, ( २६ ) अलख, ( २७ ) रोहीदास, ( २८ ) सुरदास, ( २९ ) सांवता, ( ३० ) नारा, ( ३१ ) म्हादा, ( ३२ ) गोंदा, ( ३३ ) विठा, ( ३४ ) ज्योतिरानंद, ( ३५ ) जनार्दन, ( ३६ ) एकनाथ, इतक्या संतांचीं नांवें आलीं आहेत. छत्तिसांपैकीं एकनाथ शेवटला आहे. ह्मणजे हे सर्व संत शके १५३२ च्या पूर्वींचे होत.

---

## शके १२८९ तील यादवांचा एक

# शिलालेख

१ अलीबागेच्या दक्षिणेस तीन मैलांवर नागांव ह्मणून एक गांव आहे. तेथें भीमेश्वराच्या देवळाच्या उत्तर बाजूच्या पायऱ्यांवर एक शिलालेख आहे. तो संस्कृतभाषेंत लिहिला आहे, असें कुलाबा गॅझेटियरांत ह्मटलें आहे. परंतु, तो इसवी सनाच्या चवदाव्या शतकांतील मराठी भाषेंत लिहिला आहे, असें वाचनांतीं मला आढळून आलें. शिलालेखाची लांबी रुंदी कुलाबा गॅझेटियरांत दिली असल्यामुळें, ती मापणी मी येथें नमूद करीत नाहीं. त्यांतील मजकूर मात्र येथें जशाचा तसाच देतों. लेखाच्या एकंदर अठ्ठावीस ओळी आहेत. पैकीं पहिल्या ओळीच्या शेवटलीं तीन व सहाव्या, सोळाव्या व सतराव्या ओळींच्या प्रारंभींचें एकेक अक्षर, मिळून एकंदर सहा अक्षरें कपऱ्या निघून खोल फुटून गेलीं आहेत. बाकीचीं अक्षरें स्वच्छ व सुबोध आहेत. शिला स्वच्छ करून, लेखाची नक्कल घेतली आहे. पांच चार अक्षरें नीट लागलीं नाहींत.

२ शिलालेखाची नक्कल

१ ६ स्वस्तिश्री हिजरत ६९ सकु संवतु १२८९ पळवंग सवंसरे आधेअ + +

२ श्रीमत्य प्रौढिप्रतापचक्रवर्त्ति माहाराजाधिराज श्रीहंविरु राओ

३ ठाणें कोकणराज्यं क्रोति सत्ये–तस्मिन् काळे प्रवर्त्तमाने धरमादि–

४ –पत्र लिखितं यथा सर्वव्यापारिसिहिप्रो तंनिरोपित अठागरअधि–

५ –कारिआ कुसना अहासण नाकाचा सेणवै देऊं प्रोण्होव्ह वेळित स–

६ – + रंध चिचावाळिग्राम पैकि तेथिळा मिजिगिति सिहिप्रो केळि तथे मरंगी–

७ –आ ळावेयाळागी आठागर समंध मुल्य नागवें आगरुपैकि कोतळवाडि

८ १ नारदे कवाळिआपैकि भाटाळि १ उरौ वाडिआ २ ससिम फळ भोगा स--

९ हित श्रीरायाजा प्रधानु सिहिप्रो विकति सडाउनि चिचवाळिये चिये मिजिगिति

१० वर मीवा मळिया कातिळवाडी विक्रिता द्रामा १६० नारदे कवाळिआ जि–

११ ये भाटाळैये विक्रिता द्रंम ४० उरैवाडिआ २ विक्रिता द्रामा सते २००

१२ हे द्राम वरत सकोश कवळिआ मुरुय करुनि समळि आग-रियांस मागिड--

१३ डिळि घाअटा साळगोपाळवादनिचे तळे अठि अवाटातु राह नाहिं वाडि--

१४ –आ दातारें हिन करुनि जाळिआ ह्मणौनि समाळिं आगरियांस त्याति वि--

१५ -कळि ते गुंतिकैवाह सोडवुनि सिहिप्रो ळागौनि वाडिआ विकिळि आहे

१६ + वाडिआ कोण्हि दातारु ठमठेळित गुंती कारि तर समष्टि आगरियांहि प्रति--

१७ (का) रा वें हा धरमु सिहिप्रोचा तितीवड समष्टि आगरियांहिं समाग्रि प्रतिपाळावें

१८ झाडेआंचि जमेतिस जेतुके आगर साहिआ डंखे पाठें तेतुके आगरास आ प्र-

१९ झाडावें ति रोपडवा वाडि सिंहिप्रो सासनविषय भोगवारी हा धरमु समग्रि प्र--

२० –तिपाळावा आघाटाणें पूर्व दिसें नाउ ह्मातारेयाचि वाडि उत्तर दिसे चोरळेवाडि पप--

# शिवगण येथील सेंगर राजांची वंशावळ

१ उज्जनींतील वे० शा० सं० रा० रा० दामोदरभट्ट त्रिन त्र्यंबकभट्ट जोशी ह्यांच्या ग्रंथसंग्रहांत शंकरभट्टात्मज नीळकंठभट्ट यानें केलेला **भास्कर** नावाचा धर्मप्रकरणीं ग्रंथ आहे. त्याच्या प्रारंभीं शिवगणपुरच्या सेंगर वंशाची याद दिली आहे ती अशी:—

ग्रंथारंभे प्रशस्तिः— श्रीगणेशायनमः।

पद्मिनीवल्लभं भाभिर्भूषयंतं जगत्रयम् ।
त्रयीमहमहं नौमि स्तौमि त्रिदशवंदितम् ॥ १ ॥
जज्ञे पितामहतन्तोः खलु कश्यपोय
स्तमाजायत मुनिस्तु विभांडकाख्यः ।
तं पुत्रिणां धुरमरोपयदृष्यशृंगः
तस्यान्वयेप्यजनि शृंगिवराभिधानः ॥ २ ॥
तस्मिन्वंशे महति वितते सेंगराख्ये नृपाणाम्
राजा कर्णः समजनि यथा सागरे शीतरश्मिः ।
कीर्त्यों यस्य प्रथिततरया श्रोत्रजातेऽभिपूर्णे
कर्णस्यापि प्रविततकथा नावकाशं लभंते ॥ ३ ॥
विशोकाख्यदेवस्ततस्तत्सुतोभूत् ।
विशोकीकृता येन सर्वा धरित्री ॥
ततोऽप्यास राजाऽस्तशत्रुस्ततोभूत् ।
रयाख्यो रवेणैव सर्व्वाहितघ्नः ॥ ४ ॥
बभूवाऽथ वैराटराजस्ततोभूत्
नृपो मेदिनीवल्लभो वीढराजः ।
नरब्रह्मदेवस्ततो मन्युदेवः
ततोभून्नृपश्चंद्रपालाभिधानः ॥ ५ ॥
शिवगणाख्यनृपः समजन्यथो
शिवगणाख्यपुरं प्रचकार यः ।

शिवगणेन समः सकलैर्गुणैः
शिवशिवप्रथमो गणनासु यः ॥ ६ ॥
रोलिचंद्र इति तत्तनयोभूत्
कर्मसेननृपतिस्तमथाऽनु ।
लोकपो नरहरिर्नृपराजो
रामचंद्र इति तत्तनुजातः ॥ ७ ॥
यशोदेवस्ततो जातस्ताराचंद्रनृपस्ततः ।
चक्रसेनस्ततो राजा राजसिंहनृपो यतः ॥ ८ ॥
ततोप्यभूद्भूपतिसाहिदेवः
स्वकीर्तिभिर्निर्जितदुग्धसिंधुः ।
अभूत्ततः श्रीभगवंतदेवः
सदैव भाग्योदयवान् क्षितीशः ॥ ९ ॥

यद्दानद्रविणाद्रिनिर्जितवपू रत्नाचलो लज्जया
दूरे स्तब्ध इलावृते निविशते नो यत्र पुंसां गतिः ।
किं च ऋस्यदरातिवामनयना नेत्रांबुभिर्वर्द्धित-
तेजोग्निर्वडवामुखोत्थहुतभुक्तुल्यः कथं नो भवेत् ॥ १० ॥
आज्ञप्तस्तेन राज्ञा विबुधकुलमणिर्दाक्षिणात्यावतंसो
भट्टश्रीनीलकंठः स्मृतिषु दृढमतिर्जैमिनीयेऽद्वितीयः ।
आज्ञामादाय मूर्ध्ना सविनयममुना तस्य सर्वान्निबंधान्
दृष्ट्वा सम्यग्विविच्य प्रविततकिरणस्तन्यते भास्करोऽयम् ॥ ११ ॥

२ ह्या प्रशस्तीवरून वंशावळ येणेप्रमाणें:—

पितामह
|
कश्यप
|
विभांडक
|

शृंगिवर
|
कर्णसेंगर
|
विशोकदेव
|
अस्तशत्रु
|
रयदेव
|
वैराटराज
|
वीढराज
|
नरब्रह्मदेव
|
मन्युदेव
|
चंद्रपाल
|
शिवगणदेव
|
रोलिचंद्र
|
कर्मसेन
|
नरहरि
|
रामचंद्र
|

यशोदेव
|
ताराचंद्र
|
चक्रसेन
|
रामसिंह
|
साहिदेव
|
भगवंतदेव

२ हा भगवंतदेव नीळकंठभट्टाचा समकालीन होता. नीळकंठभट्ट नारायणभट्टीचा कर्ता जो नारायणभट्ट त्याच्या वंशांतील होता. नारायणभट्टाचा पुत्र शंकरभट्ट व शंकरभट्टाचा पुत्र नीळकंठभट्ट. नारायभट्ट संवत् १६२४ त हयात होता. दर पिढीस वीस वर्षे धरलीं तर, नीळकंठभट्ट संवत् १६६४त हयात होता असें ठरतें.

---

# तुकोब्बाराय देहूकर

१. हरिभक्तिपरायण तुकोब्बाराय देहूकर यांच्या आयुष्यांतील निधनादि प्रसंगांसंबंधानें ग्रंथमालेंत मी एक निबंध लिहिला होता. त्यांतील कांहीं विधानांवर इंदूरच्या पाठशाळेंतील शिक्षक रा० रा० प्र० रा० भांडारकर यांनीं गेल्या मेच्या ( जुलैंत हातीं आलेल्या ) अंकांत टीका केली आहे. तींत खालील मुद्दे आहेतः—

१ मरणसमयीं तुकारामाचें वय ८१ नसावें.

२ तो सदेह वैकुंठास गेला नाहीं.

३ त्यानें तीर्थास प्रयाण केलें नाहीं.

४ तो इंद्रायणींत बुडून मरण पावला.

५ त्यानें जलसमाध घेतली नाहीं ( असें वाटतें ).

पैकीं पहिल्या मुद्यासंबंधानें रा० भांडारकरांचा कोटिक्रम असा.

मरणसमयीं तुकारामाचें वय ८१ नसावें.

कारण, ८१ वर्षांच्या म्हाताऱ्यांना मुलें होत नाहींत.

पण, तुकारामाची बायको त्याच्या मरणसमयीं पांच महिन्याची गरोदर होती.

तेव्हां, तुकाराम मरणसमयीं ८१ वर्षांचा नसून, प्रजोत्पादनाला शक्य अशा वयाचा असावा.

येथें मुख्य मदार, ८१ वर्षांच्या म्हाताऱ्याला व निदान ७० वर्षांच्या म्हातारीला मुलें होणें शक्य आहे किंवा नाहीं, ह्या निकालावर आहे. निजामुन्मुल्कखाचा मुलगा निजामअल्ली इ. स. १८०३ त वारला, त्यावेळीं तो निदान ८० वर्षांचा होता. त्याहून कमी वयाचा नव्हता. निजामुन्मुल्ख

इ. स. १७४८ त वारला. ह्मणजे बापाच्या मरणसमयीं निजामअल्लीचें वय २९ होतें. त्यावेळीं निजामुन्मुल्खाचें वय १०४ होतें. अर्थात्, निजामअल्ली निजामुन्मुल्खाला त्याच्या ७९ । ८० व्या वर्षी आला, असें निष्पन्न होतें. ह्यावरून एवढें सिद्ध होतें, कीं कित्येक पुरुषांना ऐंशीच्या सुमारास संतती होते. आतां, आधीं ऐंशीं वर्षें जगणारे पुरुष विरळा असतात ही बाब लक्षांत घेतली, तर संतती होणारे पुरुष त्याहून विरळा असणार हें उघड आहे. असल्याच विरळा पुरुषांपैकीं तुकाराम होता, असें माझें ह्मणणें आहे.

आतां, सत्तर वर्षांच्या स्त्रीचें एखादें ऐतिहासिक उदाहरण मिळतें कीं काय, तें पाहूं. प्रसिद्ध गुरुचरित्र ह्या चरित्रग्रंथांत विटाळ जाऊन पांचपंचवीस वर्षें लोटलेल्या एका वृद्ध स्त्रीला संतति झाल्याचें लिहिलें आहे. विटाळ जाण्याची सामान्य मर्यादा जर पन्नाशीची धरली, तर, ती गुरुचरित्रांतील बाई प्रसूतिसमयीं ७० । ७५ वर्षांची असावी. पाऊणशे वर्षांच्या ह्मातारीला मूल विरळा होतें, हें खरें; परंतु होतें, असें ह्मणण्याला हा एक आधार आहे. आतां, गुरुचरित्र हा ग्रंथ किती ऐतिहासिक किमतीचा आहे, हें पाहूनच हा आधार जमेस घेतला पाहिजे. महिपतीचीं चरित्रें ज्या ऐतिहासिक किंमतीचीं आहेत, त्याच ऐतिहासिक किंमतीचें गुरुचरित्र आहे, असें माझें मत आहे. महिपतीची चरित्रें बऱ्याच ऐतिहासिक महत्वाचीं असावीं, असें कै० रानड्यांस वाटलें होतें, असें त्यांच्या इतिहासावरून दिसतें. गुरुचरित्रांत गुरूंच्या समाधीच्या संवत्सर, तिथी, नक्षत्र वगैरे बाबी दिल्या आहेत, त्या खऱ्या आहेत. श्रीपादश्रीवल्लभस्वामी ही ऐतिहासिक व्यक्ति आहे, त्यावेळीं बेदरची पाच्छाही होती, गाणगापूर, नरसोबाची वाडी वगैरे स्थलें होतीं, व योगबलानें स्वामी कर्नल आल्कॉट प्रमाणें (मोठ्याची लहानाशीं तुलना केली आहे हें लक्षांत धरून) लोकांचीं दुःखें निवारण करीत; ही ऐतिहासिक माहिती गुरुचरित्रांत आहे. स्वामींच्या कृपेनें वृद्ध बाईला पोर झालें, हें सांगण्यांत, लेखकाचा

कांहीं क्षुद्र हेतु होता, असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण, गुरुचरित्राचा कर्ता जो गंगाधरसरस्वती तो परमभगवद्भक्त असून, लोकांना फसविण्यांत त्याचा कांहीं एक मतलब साधावयाचा नव्हता. कारण, गंगाधरसरस्वती हा पूर्ण विरक्त पुरुष होता. तेव्हां पाऊणशाव्या वर्षी पोर झालेल्या ह्या गुरुचरित्रांतील ह्मातारीच्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. आतां अशा बाया अत्यंत विरळा असतात, हें स्पष्टच आहे. नाहीं तर, श्रीपादस्वामींच्या कृपेचें कांहीं एक कारण नव्हतें. ह्या शेवटल्या वाक्यावर कोणी अशी शंका घेईल कीं, योगिजनांच्या कृपेनें जी गोष्ट झाली, ती इतिहासांत जमेस धरूं नये. परंतु, गोष्ट जर साक्षात् घडली असली, तर ती जमेस धरली पाहिजे, मग ती वाटेल त्या कारणानें होवो. सांगण्याचें तात्पर्य काय कीं, कधीं कधीं ७०।७५ वर्षांच्या वयांत स्त्रियांना क्वचित् संतति होते. ह्या विरळा अपवादात्मक बायांपैकींच तुकारामाची स्त्री होती.

वस्तुतः पहातां ह्या बाबीचा निकाल करण्याचें काम रा. भांडारकरांचेंहि नाहीं व माझेंहि नाहीं. हें काम वैद्यकांच्या इतिहासज्ञांचें आहे.

तात्पर्य, ८१ वर्षांच्या ह्मातान्याला व सत्तर वर्षांच्या ह्मातारील कधीं कधीं विरळा मुलें होतात, हें ज्याअर्थी वरील दोन उदाहरणांवरून सिद्ध होत आहे, त्याअर्थी, तुकाराम मरणसमयीं ८१ वर्षांचा नसावा, हें जें रा. भांडारकरांचें ह्मणणें तें बिलकुल न टिकावें, असें ह्मणावें लागतें.

२. रा. भांडारकरांच्या पहिल्या मुद्याचा हा असा त्यांच्या विरुद्ध निकाल लागला. आतां ह्या मुद्यांतील एका पोटबाबीचा छडा लावावयाचा राहिला आहे. संतती होण्याच्या बाबीसंबंधानें टीका करतांना भांडारकर ह्मणतात, कीं " साधें कोडें सोडविण्यांत गहन कोडें उत्पन्न करणें हा सशास्त्र मार्ग नव्हे. " येथें सशास्त्रतेचा किंवा अशास्त्रतेचा प्रश्नच कसा उपजतो तें मला समजत नाहीं. एका जुन्या पोथींत तुकारामाच्या जन्मशकाचें टिपण मला सापडलें. त्या जन्मशकानें

तुकारामाचा गुरू जो बाबाजी त्याच्या समाधीकालाचा व त्यानें तुकारामाला दिलेल्या उपदेशाच्या कालाचा यथास्थित जम बसला. हा जम पुष्कळ वर्षें बसत नव्हता, ह्मणून 'कोडें सुटलें' असे समाधानाचे उद्गार मी काढले. ह्या जम बसण्यानें दुसरे अनेक साधे व कठिण प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे. ह्मातारा ह्मातारीला मुलें कशीं व्हावीं, हें कठिण कोडें माझ्या साध्या कोड्यापासून रा. भांडारकरांच्या मनांत जसें उद्भवलें, तशीं दुसरीं अनेक कोडीं उद्भवतील. परंतु, तीं उद्भवलीं ह्मणून, साधें कोडें सोडविलें असतां, तें अशास्त्र कसें ठरतें तें कळत नाहीं. अशा साध्या कोड्याला, फार तर, मोठें उपव्यापी कोडें ह्मणा. असल्या उपव्यापी कोड्यांनीं शोधकांना व विवेचकांना, खरें ह्मटलें असतां, आनंद व्हावा. साध्या कोड्यापासून उत्पन्न होणारा उपद्व्याप व गुंतागुंत समाधानकारक रीतीनें सोडवावी कशी, ह्याकडे विवेचकांचें, वस्तुतः, लक्ष्य लागावें. गुंतागुंत उत्पन्न झाली ह्मणून त्याच्यावर रागावणें व त्याला अशास्त्र ह्मणून नांवें ठेवणें सशास्त्र नव्हे.

ह्या बाबीसंबंधें लिहितां लिहितां रा. भांडारकर ह्मणतात कीं, राजवाड्यांनीं केलेला तुकारामाच्या जन्माचा कालनिर्णय चुकला, असें समजलें पाहिजे; कां कीं ह्मातारा ह्मातारीला मुलें होत नाहींत. परंतु, वृद्ध माणसांना कधीं कधीं मुलें होतात, असें उदाहरणें देऊन सिद्धी केली असल्यामुळें मी दिलेला तुकारामाचा जन्मकाल खरा ठरतो, ही बाब मागें यथास्थित सांगितलीच आहे. येथें जें सांगावयाचें आहे तें हें कीं, आपल्या विधानाला पुष्टी आणण्याकरितां मी तुकारामाच्या जन्माचा कालनिर्णय केला आहे, असें भांडारकरांनीं ह्मटलें आहे. सबळ किंवा दुर्बळ लेखी आधार नसतांना, अवांतर गोष्टींच्या जोरावर एखाद्या प्रसंगाचा काळ अनुमानानें ठरवणें ह्मणजे कालनिर्णय करणें होय. तसा प्रकार मी कांहीं एक केलेला नाहीं. जन्मकालाचा अनुमानानें निर्णय करण्यापूर्वीं, जन्मशक मजजवळ आयता तयारच होता. तो जन्मशक इतर प्रसंगांच्या कालाशीं कसा जमतो, ह्याची वाटाघाट

ग्रंथमालेंतल्या मागील निबंधांत मी केली आहे. ही गोष्ट एकीकडे ठेवून, रा. भांडारकरांनीं कालनिर्णय हा शब्द योजला आहे. योजनेचा मुद्दा असा, कीं, अनुमानिक कालनिर्णयानें सार्धें कोडें सुटल्याचा भास यद्यपि राजवावाड्यांना झाला, तथापि त्यांनीं नवेंच एक विचित्र व अशक्य कोडें उत्पन्न करून आपला अनुमानिक कालनिर्णय खोटा ठरवून घेतला, असा ग्रह उत्पन्न व्हावा. हा डावपेच भांडारकरांनीं दुर्बुद्धीनें केला असें मी ह्मणत नाहीं. विरुद्ध मानलेल्या सिद्धान्ताचा पाडाव करतांना नकळतहि असला हेत्वाभास होऊन जातो, इतकेंच.

३. आतां रा. भांडारकरांच्या बाकीच्या चार मुद्यांकडे वळतों. १ तुकाराम सदेह वैकुंठास गेला नाहीं; ( २ ) त्यानें तीर्थास प्रयाण केलें नाहीं; ( ३ ) तो इंद्रायणींत बुडून मरण पावला; ( ४ ) अर्थात्, त्यानें जलसमाध घेतली नाहीं; हे ते चार मुद्दे होत. ह्या मुद्यांच्या सिद्ध्यर्थ भांडारकरांनीं खालील अभंग दिलेले आहेतः—

( १ )

विमानाचे घोष वाजती असंख्य ।
तुरू झाला डंका वैकुंठीचा ॥ १ ॥
शब्दांचा विश्वास झाली आठवण ।
करा बोळवण सज्जन हो ॥ २ ॥
आले विष्णुदूत आली विठ्ठलमूर्ति ।
अवसान चित्तीं सांपडलें ॥ ३ ॥
आला पाठमोरा इंद्रायणीजवळी ।
नामघोषें टाळी वाजवीली ॥ ४ ॥
प्रथम तो पाय घातला पाण्यांत ।
राहिली ते मात तुका ह्मणे ॥ ५ ॥

( २ )

माझ्यावरुतें पांजलें शरीर ।
झाला धुंदुकार दाही दिशा ॥ १ ॥

टाळ घोळ विणा मृदंगाचे घोष ।
गाती हरिदास नाचताती ॥ २ ॥
नेणों मागें पुढें होती हरिकथा ।
पहातां पहातां भ्रम लोकां ॥ ३ ॥
हातावरी हात मारुनि जातो तुका ।
परी कोणा एका उमजेना ॥ ४ ॥

( ३ )

वाराणसीपर्यंत असो सुखरूप ।
सांगावा निरोप संतासीं हा ॥ १ ॥
येथूनियां आह्मां जाणें निजधामा ।
सर्वे असे आह्मां गरुड हा ॥ २ ॥
कृपा असो द्यावी मज दीनावरी ।
जातसों माहेरीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

( ४ )

सकें १५७१ विरोधीनां संवछरेः सीमगा वद्य द्वीतियाः वार सोमवारः ते दिवसीः प्राथःकाळींः तुकोव्वानीः तीर्थास प्रयाणं केलें शुभ भवतुः मंगळं

ह्या चार लेखांचा वाटेल तसा अर्थ करून रा. भांडारकरांनीं वरील चार मुद्दे काढले आहेत. वरील चार लेखांचा त्यांनीं जो अर्थ लावला आहे तो बरोबर नाहीं हें सिद्ध केलें ह्मणजे त्यांचे हे चारी मुद्दे खालीं पडतात. पहिल्या लेखांत तुकाराम सदेह वैकुंठास गेला ह्मणून लिहिलें आहे; दुसऱ्या लेखांत त्याला ताटीवर बांधून स्मशानांत नेलें ह्मणून ह्मटलें आहे; तिसऱ्या लेखांत तो वाराणशीस गेला असें विधान ठोकून दिलें आहे; आणि चवथ्या लेखांत त्यानें तीर्थास प्रयाण केलें ह्मणून सांगितलें आहे; असा ह्या चार लेखांचा भांडरकरांनीं अर्थ केला आहे. एकाचा मेळ दुसऱ्याला नाहीं असे हे चार लेख परस्परविरोधी आहेत असें रा. भांडारकरांच्याप्रमाणें त्यांचा अर्थ करूं गेल्यास कोणालाहि वाटेल ह्यांत

बिलकुल संशय नाहीं. परंतु मराठी भाषा व महाराष्ट्रांतील रीतरिवाज नीट लक्ष्यांत घेऊन अर्थ केल्यास, हे लेख परस्परविरोधी नसून अन्योन्यपोषक आहेत, अशी कोणाचीहि निःसंशय खात्री करून देतां येण्यासारखी आहे. तीर्थास प्रयाण करणें, ह्या भाषाप्रयोगाचा अर्थ पुण्यक्षेत्रास जाणें, असा रा. भांडारकर करतात. परंतु उपरिलिखित चवथ्या लेखांत ह्या प्रयोगाचा अर्थ, मरून गेल्यावर स्मशानांत नेलें जाणें, असा आहे. स्मशान प्रायः नदीच्या ह्मणजे तीर्थाच्या सन्निध असतें, त्यावरून लक्षणेनें स्मशानालाहि महातीर्थ ह्मणण्याची चाल महाराष्ट्रांत आहे. तुकारामाला स्मशानांत नेऊन सरणावर जाळलें, असें पहिल्या व दुसऱ्या उताऱ्यांत स्पष्ट ह्मटलें आहे. सर्व जातींतील साधु, संत, तपस्वी व संन्यासी ह्यांच्या मृत देहाला विमानांत बसवून वाजत गाजत व कीर्तन करीत मोठ्या थाटानें स्मशानांत पुरण्याकरितां किंवा जाळण्याकरितां नेण्याची चाल महाराष्ट्रांत आज हजारों वर्षांची आहे. एका ऐसपैस चौरंगाच्या किंवा पाटाच्या चारी बाजूला केळी बांधून जें यान किंवा तिरडी साधूंच्या मृत देहाला वाहून नेण्याकारितां करतात त्याला महाराष्ट्रांत विमान असें ह्मणतात. त्या त्या साधूच्या कमजास्त लोकप्रियतेप्रमाणें मनुष्यांची लाहान मोठी गर्दी ह्या विमानाच्या पुढें व मागें उच्च स्वरानें भजन व कीर्तन करीत नाचत बागडत जाते. तुकोब्बाराय फाल्गुन वद्य द्वितियेस सोमवारीं सकाळीं वैकुंठास जाणार, अशी बातमी दहा पंधरा दिवस भोंवतालच्या प्रांतांत पसरल्यामुळें, अनेक भगवद्भक्तांचे व प्रेक्षकांचे संघ देहूस जमा झाले व तुकोब्बाच्या विमानाच्या पुढें व मागें कीर्तनाचे असंख्य घोष अंबरांतराळीं दुमदुमूं लागले. हा प्रकार जसा साक्षात् घडला तसाच तो अभंगांत वर्णिला आहे. सदेह तुकारामाला ह्मणजे तुकारामाच्या मृत शरीराला विमानांत ह्मणजे चौरंगावर बसवून असंख्य कीर्तनांचे घोष चालू असतां व वैकुंठीचा डंका ह्मणजे साधू संताच्या शरीराला स्मशानांत नेतांना वाजविले जाणारे शंख गंभीर नाद करीत असतां विष्णुदूत ह्मणजे भक्तमंडळी देहूच्या नदीवरील तुकारामानें बसविलेल्या खोपटवजा विठोबाच्या देवळापाशीं आले. त्यावेळीं

तुकारामाच्या मृत देहाची पाठ इंद्रायणीकडे झाली व तोंड विठोबाकडे झालें. असा प्रकार झाला असतां, भक्तमंडळींनीं भक्तिप्रेमानें एकच आरोळी करून दिली. नंतर प्रेमानें चित्त आर्द्र होत्साते ते सर्व भगवद्भक्त तुकारामाच्या देहाला नदीतीरावर किंचित् पाण्यांत किंचित् बाहेर असा ठेवून, स्वतः इंद्रायणींत पाय टाकते झाले आणि "तुका ह्मणे" हे असंख्य वेळा कानावरून गेलेले शब्द येथून पुढें बंद झाले, हा तरंग एकसमयावच्छेदानें सर्वांच्या मनांत उमटला.

पहिल्या उताऱ्याचा असा उघड अर्थ आहे. विमान, डंका, वैकुंठ, तीर्थ, विष्णुदूत वगैरे शब्दांचा अर्थ साधुसंतांच्या स्मशानयात्रेंत काय करावयाचा, ह्या बाबीकडे लक्ष्य न दिल्यामुळें, स्वधर्मांची व स्वदेशांतील साधुसंताच्या वचनांची थट्टा करण्यांत तरबेज असलेल्या बालिश नास्तिकांप्रमाणें रा० भांडारकरांनीं ह्या अभंगाचा अर्थ केला. तुकाराम सदेह विमानांत बसून विष्णुदूतांच्या साहाय्यानें वैकुंठास जाईल कसा? अशी अद्वितीय शंका भांडारकरांना पडली; व पाश्चात्य अपविचारांनीं व अपसिद्धांतांनीं मति दूषित होऊन, अर्थाचा अनर्थ करण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली. स्वर्गांत विष्णु ह्मणून जें दैवत आहे त्याच्या स्वर्गीय दूतांनीं स्वर्गीय विमानांत बसवून जिवंत तुकारामास सदेह वैकुंठास नेलें, असा अभिप्राय ह्या अभंगांत कोठेंहि नाहीं. तुकारामाच्या मृत देहाच्या स्मशानयात्रेची साधी गोष्ट त्या त्या वस्तूला योग्य असलेल्या रूढ शब्दांनीं ह्या अभंगांत सांगितलेली आहे. तिचा विपर्यास करून व नसत्या कल्पना गृहीत धरून, भांडारकरांनीं आपलें हसें मात्र करून घेतलें आहे. तुकाराम सदेह वैकुंठास ह्मणजे स्वर्गास गेला, असें विधान करण्याचा अभंगकाराचा हेतु नव्हता, हें सिद्ध करण्यासहि यथास्थित पुरावा आहे. मागें दिलेल्या दुसऱ्या उताऱ्यांत असें ह्मटलें आहे कीं, तुकारामाचा देह माडियावर ह्मणजे सरणावर अथवा चितेवर पांजून कफनें पांजणानें आच्छादून चिता धुमसूं लागली असतां, दाही दिशा

धुरानें धुंद होऊन गेल्या. त्यावेळीं विष्णुदास जे हरिभक्त त्यांनीं टाळ, घोळ, विणें व मृदंग वाजवून एकच गर्दी उडवून दिली. अभंगकार ह्मणतो, तुकारामाच्या चितेच्या मागें व पुढें इतकीं भजनें व कीर्तनें झालीं कीं प्रेक्षकांना भांबावल्यासारखें झालें नसलें ह्मणजे पुरवलें. पण प्रेक्षक भांबावले नाहींत असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण, तुकोबाराय सर्वांच्या डोळ्यादेखत हातावर हात मारून गेले असतां, कोणालाहि कोण गेला, हें उमजल्यासारखें दिसेना. तेव्हां प्रेक्षकांचीं डोकीं ताळ्यावर नव्हतीं, हेंच खरें. हीं वेडीं तुकोबाच्या देहाच्या पाठीमागें रडत, ओरडत, बागडत व नाचत बसलीं आहेत; पण तुकोबाचा आत्मा त्यांच्या डोळ्यादेखत त्यांना झुकांडी देऊन गेला, हें ह्या खुळ्यांना कळेना!

४ ह्या दोन अभंगांवरून इतकें निःसंशय सिद्ध झालें कीं, फाल्गुन वद्य द्वितीयेस, सोमवारीं, प्रातःकाळीं तुकाराम आपल्या घरीं वारला, भक्तमंडळीनीं त्याच्या देहास विमानांत बसवून मिरवत व वाजतगाजत विठोबाच्या देवळाला उजवी घालून इंद्रायणीच्या तीरावर नेलें, आणि तेथें त्याला अग्नि दिला. तुकारामाला ज्या विमानांत नेलें तें विमान केवळ साधें नव्हतें. गरुडविमान ह्मणून ज्याला ह्मणतात तें तें होतें. अत्यंत प्रख्यात असे जे साधुसंत असतात त्यांच्या स्मशानयात्रेला जें विमान तयार करतात त्याच्या खालील लाकडांना गरुडपक्षाचा आकार प्रेमळ शिष्यमंडळी देत असतात. ह्या गुरुडाचा उल्लेख उपरिनिर्दिष्ट तिसऱ्या उताऱ्यांत व अभंगांत आहे. सदर अभंगांत काशीपासून रामेश्वरापर्यंच्या साधुसंतांना, मी ब्रह्म झालों, सुख झालों, सुखरूप झालों, आनंद झालों, असा निरोप तुकारामाच्या तोंडून अभंगकारानें पाठविला आहे. आह्मीं येथूनच ह्मणजे देहूहूनच निजधामाला ह्मणजे विष्णुपदाला जातों, आमच्याबरोबर हा गरुड येत आहे ह्मणजे आह्मीं गरुडविमानांत बसून स्मशानयात्रेला जात आहों, आतां तुमची आमची देहावस्थेंतील ही शेवटची भेट होय, कृपा असो द्यावी, आह्मी कोठें दुसऱ्या तिसऱ्या ठिकाणीं जात

नाहीं, मायघरालाच जात आहों, तेव्हां काळजी करूं नये, असाहि आणीक मजकूर ह्या अभंगांत आहे. तुकाराम खुद्द देहूस मेला, असें ह्या अभंगांत तर स्पष्टच ह्मटलें आहे. पण ही गोष्ट रा० भांडाकरांच्या लक्ष्यांत आली नाहीं. "वाराणशीपर्यंत" ह्या शब्दाचा संबंध कोणी-कडे लावावा हेंहि त्यांना उमगलें नाहीं असें दिसतें. सारांश ह्या तिन्हीं अभंगांचा अर्थविपर्यास त्यांच्या हातून झाला आहे. आपल्या देशांतील चालीरीतीस व भाषेस आधुनिक विद्वान कसे पारखे होत चालले आहेत त्याचा हा एक उत्तम मासला आहे.

९ येथवर केलेल्या प्रपंचावरून रा. भांडारकरांचे माझ्या पूर्वीच्या निबंधावरील आक्षेप कोणत्या मासल्याचे आहेत व त्यांत किती पोचटपणा भरला आहे तें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. आतां रा. भांडार-करांच्या दुसऱ्या एका विचित्र मुद्याची वाचकांना ओळख करून द्याव-याची आहे. ते निक्षून सांगतात कीं तुकाराम बुडून मरण पावला; आणि आधाराला "प्रथम तो पाय घातला पाण्यांत" हा पहिल्या ऊताऱ्यांतील चरण देतात. पण हा चरण कोणाला अनुलक्षून लिहिला आहे, तें रा. भांडारकरांना कळलें नाहीं. भक्तमंडळी तुकारामाच्या देहाला विमानांत बसवून इंद्रायणीवर आली व पाण्यांत उतरली, ह्या हकीकतीला अनुलक्षून हा चरण लिहिला आहे, हें पहिल्या अभंगाचा पूर्वापर संदर्भ पाहतां कळून येईल. रा. भांडारकरांच्या मतें, तुकाराम विमानांत बसून, भजन करीत, नाचत बागडत?, इंद्रायणीच्या तीरावर पाठमोरा आला व ह्मातारा असल्यामुळें अडखळून पडला, आणि वीतभर पाण्यांत बुडाला!!! विमानांत बसून तो नाचला कसा, पाठ-मोरा झाला कसा व वीतभर पाण्यांत बुडाला कसा, वगैरे प्रश्नांचीं समर्पक उत्तरें रा. भांडारकर विचारपूर्वक critical faculty ची मदत घेण्यास न विसरतां निःसंशय देतीलच.

वरील प्रपंचाचा आढावा.

| रा. रा. भांडारकर. | प्रस्तुत लेखक. |
|---|---|
| १ तुकारामानें तीर्थास (परक्षेत्रास) प्रयाण केलें, हें मत टाकाऊ. | १ तुकारामानें तीर्थास ह्मणजे स्मशानभूमीस इंद्रायणीच्या तीरावर प्रयाण केलें हें मत ग्राह्य. |
| २ तुकाराम (स्वर्गीय) विमानांत बसून सदेह वैकुंठास गेला, हें मत टाकाऊ. | २ तुकारामाचा मृतदेह लाकडाच्या विमानांतून वैकुंठास ह्मणजे विठोबाच्या देवळावरून इंद्रायणीतीर्थास नेला गेला व त्याचा आत्मा वैकुंठास गेला, हें मत ग्राह्य. |
| ३ तुकाराम इंद्रायणींत बुडून मरण पावला. | ३ तुकाराम घरीं स्वस्थपणें बसून वारला. |
| ४ त्यानें जलसमाधि घेतली नाहीं. | ४ नाहीं. |
| ५ तुकाराम मरणसमयीं वृद्ध असावा. | ५ होता. |
| ६ ८१ वर्षांचा असल्यास त्याची स्त्री गरोदर असणें अशक्य. | ६ नवरा ८१ वर्षांचा असतांनाहि ७० वर्षांची स्त्री गरोदर असणें अपवादानें शक्य आहे. पण हा मुद्दा वैद्यशास्त्राच्या इतिहासांतील आहे. |
| ७ तुकाराम काशीस गेला नाहीं. | ७ नाहीं. |
| ८ बुडालेल्या तुकारामाचें शरीर मगरीनें खाल्लें नाहीं. | ८ घरीं मेलेल्या तुकारामाचें शरीर मगरीनें खाल्लें नाहीं. |
| ९ इंद्रायणी डोहांत मगरासारखे प्राणी आहेत किंवा नाहींत? | ९ स्वानुभवावरून सांगतों कीं, एखादी सुसर अलीकडे डोहांत असावी. तुकारामाच्या वेळीं देहूस इंद्रायणीला धरण नव्हतें. तेव्हां फाल्गुनांत डोहांत पाणी अर्थातच थोडें असे. |

६ वर दिलेल्या चार उताऱ्यांचा अर्थ नीट करतां न आल्यामुळें रा. भांडारकर गोत्यांत पडले, हें उघड आहे. तुकारामाच्या अभंगांचें पारायण करतांना ज्या टीपा मी केल्या होत्या त्यावरून मला असें दिसून आलें कीं तुकाराम घरीं स्वस्थ बसून वारला. तुकाराम सदेह वैकुंठास गेला, अशी खुळी कल्पना कित्येक अज्ञ व अविवेचक वारकऱ्यांची आहे, हें मी जाणून आहे. परंतु, ही कल्पना, वेदांत आगगाडी व तारायंत्र आहे असें मानणाऱ्या अज्ञ भिक्षुकांच्या किंवा अहंमन्य दयानंदजीच्या कल्पनेइतकीच खुळी आहे, असें मला वाटतें. ही कल्पना आधारभूत मानून तिच्या जोरावर वरील उताऱ्यांचे अर्थ करूं जाणें अगदीं अप्रयोजकपणाचें कृत्य आहे. हा अप्रयोजकपणा एखाद्या अज्ञ भिक्षुकानें किंवा अशिक्षित चरित्रलेखकानें केला असता, तर तो एक वेळ क्षम्य झाला असता. परंतु रा० भांडारकरासारख्या विवेचकांनीं तो करावा, हें आश्चर्य आहे. असो. रा. भांडारकरांच्या व आमच्या वादविवादापासून एवढी एक गोष्ट निष्पन्न झाली कीं, तुकाराम घरीं स्वस्थ बसून वारला, व त्यानें जलसमाध घेतली नाहीं. ही जळसमाध तुकारामाला रा० पारसनिसांनीं कशाच्या आधारावर दिली, ह्याचें मला अद्याप गूढच आहे. तें उकलण्याला जर रा. भांडारकर मदत करतील, तर त्यांचा मी फार आभारी होईन.

७ म्हातारपणीं तुकारामाला मूल झालें किंवा नाहीं, आणि तो सदेह वैकुंठास गेला किंवा घरींच बसून मेला, ह्या प्रश्नांची वासलात येथपर्यंत लागली. येथेंच, खरें म्हटलें असतां, हा निबंध संपावा. परंतु रा० भांडारकरांनीं दोन चार अवांतर प्रश्न व कोट्या केल्या आहेत. त्यांना उत्तरें देऊन, मग समाप्ति करणें शिष्टाचाराचें होईल असें वाटतें. रा० भांडारकर विचारतात कीं इंदुप्रकाशांत छापलेल्या गाथेंतील इंग्रजी चरित्राचा मराठी चरित्र तर्जुमा आहे, त्याला आधार काय? अंतस्थ प्रमाणांवरून भांडारकरांना, असें वाटतें कीं मराठी चरित्राचा इंग्रजी

तर्जुमा आहे. परंतु चरित्र खालील उतारा लक्ष्यांत घेतां भांडारकरांचें हें मत साधार नाहीं असें दिसेल. इंदुप्रकाशांतील गाथेच्या मुखपृष्ठावर असा मजकूर आहेः—

A

COMPLETE COLLECTION

OF THE

POEMS OF TUKARAM

TO WHICH IS ATTACHED

A LIFE OF THE POET IN ENGLISH

BY

JANARDAN SAKHARAM GADGIL, B. A.

ह्या मुखपृष्ठावरील मथाळ्यांत इंग्रजी चरित्राचाच तेवढा उल्लेख केला आहे, मराठी चरित्राचा केला नाहीं. मुद्दाम उल्लेख करण्याचें कारण असें कीं तें चरित्र शोधकपणानें व विवेचकदृष्टीनें जनार्दन सखाराम गाडगीळ यांनीं लिहिलें, सबब तें महत्वाचें आहे, असें लोकांना कळावें. शंकर पांडुरंग पंडिताच्या देखरेखीखालीं विष्णु परशुराम शास्त्र्यांनीं ही गाथा छापली. विष्णु परशुराम शास्त्री पाश्चात्त्य विद्येंत व शास्त्रपद्धतींत प्रवीण नसल्यामुळें, त्यांजवर शंकर पांडुरंगांची देखरेख ठेवावी लागली व शोधक व विवेचकबुद्धीनें चरित्र लिहिण्याचें काम पाश्चात्य विद्याविभूषित जनार्दन सखाराम गाडगीळ ह्या तरुण व तरतरीत गृहस्थाकडे द्यावें लागलें. त्याच्या अनुरोधानें विष्णु परशुरामशास्त्र्यांनीं मराठी चरित्र लिहिलें असें दिसतें. परंतु त्याचा उल्लेख मुखपृष्ठावर नाहीं. ह्याचा अर्थ असा होतो कीं चरित्राचें कर्तृत्व जनार्दन सखारामाकडे

होतें, विष्णु परशुरामाकडे नव्हतें. इंग्रजी चरित्र मुख्य व त्याचा तर्जुमा मराठी चरित्र, असें जें मी ह्मटलें त्याला कारण हें असें आहे. तें रा. भांडारकरांना पसंत पडल्याचें कळेल अशी मनीषा आहे.

भांडारकरांचा दुसरा प्रश्न असा:— " शके १५७१त शिवाजीला रामदासास भेटण्यास तुकारामानें सांगितलें, " असें जें मी विधान केलें आहे त्याला आधार काय. ह्याला आधार रामदासाच्या बखरीचा व इतर शिवाजीच्या बखरीचा. त्यांत १५७१त रामदासाला भेटण्यास शिवाजीला तुकारामानें सांगितल्याचा मजकूर रा. भांडारकरांना सांपडेल व त्यांची लज्जा रक्षण होईल. अवतरणचिन्हांतर्गत माझ्या वाक्यांत १५७१ पूर्वी शिवाजीनें रामदासाला गुरू केलें नव्हतें असें कोठें ह्मटलेलें नाहीं. रामदासाला गुरू करून तुकारामाला भेटण्यास शिवाजीनें बोलाविलें असतां, रामदासाकडेच जाण्यास तुकारामानें शिवाजीला सांगितलें असेल. ह्यांत माझ्या लिहिण्यांत विरोध कोठें व कसा येतो तें कळलें नाहीं. तें कळविण्याची तसदी रा. भांडारकर घेतीलच.

---

# ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

---

# क्रमवन्त.

हा निबंध

रा. रा. जगन्नाथ रावजी तुळू, बी. ए.

यांनीं अनेक ऐतिहासिक कागदपत्रांच्या आधारें लिहिला,

तो

रा. रा. विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

संपादक ग्रंथमाला, यांनीं

कोल्हापूर, 'श्रीसमर्थप्रसाद' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

---

१९०५.

---

किंमत ८२.

# क्रमवन्त.

* मत्स्यादयोऽपि जानन्ति नीरक्षीरविवेचनम् ।
प्रसिद्धिरेव हंसस्य यशः पुण्यैरवाप्यते ॥

संघशक्ति सध्या उपयुक्त वाटत आहे. संघशक्तीचें माहात्म्य सर्व सुशिक्षित राष्ट्रांस कळत आहे. संघशक्तीवर राष्ट्रोन्नति अवलंबून आहे. राष्ट्रनायक, संघशक्ति राष्ट्रांत जेवढी वाढेल, तेवढी वाढविण्याचा प्रयत्न करीत आहेत. काळाच्या तडाक्यांत, जरी हिचा लोप मधून मधून झालेला आहे, तरी ती वावटळ दूर होऊन शांतता नांदूं लागली कीं, ही दिव्यज्योति झळकूं लागते. हींत मदमत्सरादि जंतु आपोआप जळून भस्म होतात, व राष्ट्राचा नूर कांहीं विलक्षण दिसतो. न्यायमूर्ति रानडे, सुप्रसिद्ध केसरीकार[2] रा० टिळक, कलकत्तानिवासी अमृतबझारपत्रिकाचालक, बाबू मतिलाल घोस, मद्रासकर दिवाणबहादुर आर रघुनाथराव इत्यादि महात्म्यांना तो सुशिक्षित राष्ट्राचा नूर पाहून परम संतोष वाटतो. त्यावरून त्यांस या प्रिय आर्यभूचे पूर्वीचे सुदिन आठवतात व तशी स्थिति तिला पुन्हा प्राप्त होण्याकरितां ते कायावाचामनेंकरून रात्रंदिवस झटतात. त्यांचे अचाट कर्तृत्वशक्तीप्रमाणें त्यांचे प्रयत्नहि दांडगे असतात. तूर्त, आपणांस त्यांचे एका दिशेचा विचार कर्तव्य आहे. सर्व राष्ट्र एकदिल होण्याची गोष्ट दुर्घट तर खरीच; पण त्यांतील जातींतील जाती अशा आहेत कीं, त्यांचे मिलाफ रफूप्रमाणें होऊन, विनाकारण माजत असलेला दुराग्रह, दुर-

---

* मासे, वगैरे प्राण्यांना पाणी कोणतें व दूध कोणतें हें समजतें. पण हंसाचीच याविषयीं प्रसिद्धि आहे. (कारण) यश हें पुण्यानें प्राप्त होतें. "

२ केसरी ( वर्ष १ लें, अंक २।४।५ पहा. )

भिमान, द्विधाभाव नष्ट होऊन, एकदिलानें राष्ट्रकार्यास हातभार लावण्यास त्यांस उत्तम संधि मिळणार आहे.

प्रस्तुत 'क्रमवंत' हा विषय या लेखकाच्या हिताहिताचा असून आजवर त्यास, तत्संबंधी अवश्य साहित्य उपलब्ध न झाल्यामुळें, हातीं घेतां आला नाहीं. पण आनंदाची गोष्ट ही कीं, या लेखकाचे आप्तवर्य रा० ब० रामचंद्र त्रिंबक आचार्य, माजी सरकारी वकील ठाणें, व रा. ब. केशवराव गोपाळ आचार्य माजी हायकोर्ट जज्ज व कौन्सिलर इंदूर व हल्लीं तेथले पेन्शनर, यांनीं मोठ्या श्रमानें ठिकठिकाणचे गोळा केलेले अनेक ऐतिहासिक कागदपत्र व मिळविलेली दुर्मिळ माहिती त्यास दिल्यामुळें आजचा हा योग आला आहे. सदरहू मान्य गृहस्थ स्वतःच आपल्या प्रस्तावनेसह ती सामुग्री प्रसिद्ध करणार आहेत. पण त्यांच्या कार्यबाहुल्यामुळें तें काम दिनावधीवर पडत आहे असें दिसतें. म्हणून तूर्त जिज्ञासूंची दुग्धाची तृष्णा तक्रावर तृप्त करावी लागत आहे.

क्रमवन्तांसंबंधीं निर्णीत गोष्ट ( Res judicata ) घडूनहि, रा० पावगीसारख्या मान्य ग्रंथकारांनीं तत्संबंधीं वाद पुन्हा उपस्थित केला आहे. हिंदुस्थानांतील विशिष्ट जातीसंबंधीं विवेचन करतांना त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं "* किरवन्त यांनाच क्रमवन्त असें ह्मणतात. हे ऋग्वेदी असून, आश्वलायन शाखेतील ऐतरेयब्राह्मणाध्यायी आहेत. याबद्दलचा उल्लेख 'सह्याद्रिखंडां'त थोडाबहुत केला आहे. त्यावरून गोमांचलाजवळ पंचक्रोशींत त्यांचा वसतिप्रदेश असावा असें वाटतें. त्यांची उत्पत्ति बारा ब्राह्मणांपासून झाली अशल्याविषयीं वर्णन असून, ते अग्निबाग, चेऊल, रेवदंडा, इत्यादि ठिकाणीं विशेषेंकरून आहेत. कोंकणस्थांशीं आपला शरीरसंबंध व्हावा एतदर्थ ते मनापासून झटतात व उत्कट लालसा प्रदर्शित करतात."

---

* 'भारतीय साम्राज्य' पुस्तक ८ वें 'भरतखंडांतील जातिवैचित्र्य'

आतां अष्टागर प्रांतांतले क्रमवन्त हे व गोमांचल प्रदेशांतले किरवन्त हे एकच असें ह्मणण्यास रा. पावगी यांजपाशीं कोणता पुरावा आहे तो न कळे. उलट एवढें बरीक खरें कीं, गोमांचलनिवासी त्रयस्थ सारस्वतब्राह्मण व मान्य ग्रंथकार रा. गुंजीकर हे आपल्या 'सरस्वतीमंडळांत'* सुमारें ३० वर्षें अगोदर असें नमूद करतात कीं, "उत्तर कोंकणांत अष्टागर प्रांतीं व मुंबईंत 'क्रमवन्त' या उपनांवाचे कित्येक ब्राह्मण आहेत. गोमंतकांतील 'किरवंत' ब्राह्मणांमध्येंही क्रमवन्त हें उपनांव असल्यामुळें, नांवाच्या सादृश्यावरून यांनाही कोणी 'किरवन्त' ह्मणतात. परंतु यांचा त्यांचा कांहीं संबंध नाहीं असें समजतें.+ यांचें उपनांव 'टुल्लू' हे देशस्थ. यांचा कोणी पूर्वज क्रमान्त अध्ययन केलला होता. त्यावरून 'क्रमवन्त' हा शब्द. यांचे भाऊबंद आप्तसंबंधी लोक पुणतांबें, नाशिक, पुणें इत्यादि प्रदेशीं देशस्थांत आहेत. यांचे संबंध चित्पावन ब्राह्मणांमध्यें व क्वचित् कऱ्हाडे ब्राह्मणांमध्येंही झालेले आढळतात. ‡"

---

* पृ० ७७ पहा. + या लेखकाचे परमपूज्य जनक कै० रा. सा. रावजी वासुदेव टुल्लू भगवानदास संस्कृत स्कॉलर एम्. ए., एल्एल् बी., सुपरिंटेंडंट स्टेट एज्युकेशन इंदूर व 'होळकरवंश' या संस्कृत काव्याचे कर्ते यांपासूनच रा. गुंजीकरांनीं सदरहू माहिती मिळविल्याचें कळतें.

‡ असे अंतर्विवाह शास्त्रसंमत आहेत. साताराकराचे अर्जावरून श्रीशंकराचार्यांनीं तशी अनुज्ञाही दिली आहे. केसरी पुस्तककार काशीकर महामहोपाध्याय वे. शा. सं. बाळशास्त्री रानडे या विद्वद्रत्नाकडे महाराष्ट्र गौड ब्राह्मणांतील शरीरसंबंधाचा एक मुकदमा आला असतां, त्यांनीं त्या दंपत्यास महाराष्ट्रसमाजांत वागण्यास जी हरकत केवळ रूढीमुळें आली होती, ती धुडकावून देऊन, पंक्तिपावन आहे असा निर्णय दिल्याचें रा. ब. हरि नारायण नेने ( सुपरिंटेंडंट, अकौंटंट जनरलस् ऑफिस अल्हाबाद ) यांजकडून समजतें.

बोरघाट चढून वरचेवर देशीं जाणें, त्याकाळच्या स्थितीप्रमाणें जड असल्यामुळें, जनरूढीस झुगारून क्रमवन्तांनीं तत्रस्थ कोंकणस्थ कऱ्हाडे या दोन ब्राह्मणजातींशीं शरीरसंबंध करण्याची मोठीच छाती केली; ते विद्वान् देशस्थ खरे सुधारक होत, अशी त्यांची प्रशंसा कै० रा. ब. नेने ( माजी क्युरेटर, गव्हर्मेंट बुक डिपो मुंबई ) यांचे तोंडून या लेखकानें स्वतः १८९७ सालीं ऐकिली आहे.

यांचे गॅझेटियरकारहि रा. गुंजीकराप्रमाणेंच असें ह्मणतात कीं, वेदपठनांत ' क्रम ' ह्मणून एक भाग आहे. त्याचें अध्ययन करणारे ह्मणून ' क्रमवन्त '. यांचीं ४६ घरें आहेत. हे कर्जत व साष्टी येथें असतात. त्यांची मोठी वसति कुलाबा जिल्ह्यांत अलिबाग व चौल यांचे दरम्यानचे समुद्रपट्टीस आहे. यांचें मूळठिकाण पूर्वमहाराष्ट्रांतील ' जोगाईचा अंबा ' हें गांव होय. यांचे संबंध देशस्थांत होतात; व कधीं कधीं कोंकणस्थांतहि होतात. त्यांची व यांची रीतभात बहुतेक सारखीच आहे. यांपैकीं बहुतेक भिक्षुकी करतात. त्यांच्या जमिनी पण आहेत. हे आपल्या मुलांस शिक्षण देतात. यांची स्थिति बरी आहे. सावंतवाडी प्रांतांतील कुडाळचे किरवन्त ब्राह्मण व हे एक नव्हत. + "

येणेंप्रमाणें रा. पावगी यांचें मत खंडण करणारे आधुनिक मान्य ग्रंथ आहेत. तद्वत् ऐतिहासिक परंपराही आहे. शके १६४१ च्या संमतिपत्रांत वेदमूर्ति अप्पाजीभट क्रमवन्त व अनंतभट क्रमवन्त यांनीं आपलें कुलवृत्त निवेदन केलें आहे. त्यांत ते ह्मणतात " पुरातन

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू.)

' पेशव्यांच्या रोजनाम्यांतील थोडीशी माहिती ' देतांना, न्यायमूर्ति रानडे यांनीं असें म्हटलें आहे कीं, " नानासाहेब पेशवे यांनीं इ. स. १७६० त ' वाखरे ' आडनांवाच्या देशस्थ सावकाराच्या मुलीशीं आपलें लग्न लाविलें. " ( ग्रंथमाला, अ ९०, पृ० ४६ ). न्यायमूर्ति तेलंग यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासांतील कांहीं निवडक गोष्टी ' सांगतांना, असें म्हटलें आहे कीं. ' बाळाजी बाजीराव ' जातीचा चित्तपावन ब्राह्मण असून, त्याची बायको ' राधाबाई ' ही देशस्थाची होती. शिवाय, देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे या तिन्ही लोकांमध्यें रोटीबेटी व्यवहार सुरू व्हावा ह्मणून बाळाजीनें एका कऱ्हाड्याच्या मुलीबरोबर लग्न केलें अशीही हकीकत सांगतात. पण यास कोठें लेखी आधार नाहीं. " ( ग्रंथमाला, अं. ८९, पृ. २५ )

+ Vide Bombay Gazetteer, Thana Vol. XIII, Part I.
also ——— Kolaba and Janjira Vol XI.

आमचें स्थान ' जोगाईचें आंबें.' आमचे गोत्रपुरुष त्या स्थलीहून निघाले. एक पुरुष पुण्यस्तंभीं राहिला. त्याचें उपनांव ' टुल्लू ' पावलें. दुसरा पुरुष ' खेरडे ' हें उपनांव पावले. आमचे मूळपुरुष क्रमविद् ह्मणून असें उपनांव पावले. (नकलांची वही १ ली ). शके १७७६ च्या संमतिपत्रांत असाच उल्लेख आहे. त्यांत पुणतांबेंकर त्र्यंबकभट टुल्लू यांनीं असें ह्मटलें आहे कीं " मूळगांव जोगाईचे आंब्याहून आमचे मूळ चार पुरुष ' टुल्लू ' निघाले. पैकीं एक बारामतीस गेले. त्यास त्यांचें आडनांव तेथें ' टुल्लू ' च आहे. व दुसरे खेरड्यास गेले. त्याजला तेथें ' खेरडे ' उपनांव पावले. तिसरे ' अयाचित ' उपनांव पावले. चौथे अष्टागरगांवीं गेले. ते क्रमाध्यायी होते. सबब तेथें क्रमवन्त असें उपनांव पावले." ( नकलांची वही ३ री ).

क्रमवन्तांच्या आद्यस्थानाविषयीं असें ऐतिहासिक प्रमाण आहे. आतां त्यांची विद्वत्ता व लोकमान्यता आरंभापासून कशी होती तें पाहूं. वाराणशींत जे टुल्लू गेले, ते इतिहासप्रसिद्ध ' कायस्थधर्मपद्धति ' कार

---

१ हें पुण्यस्थल सोलापुर बार्शीचे पूर्वेस सुमारें ३० कोसांवर निजाम सरकारचे हद्दींत आहे. सन १८८२ त, या लेखकाचे परमपूज्य पितृव्य कै. रा. ब. गोविंद वासुदेव टुल्लू एम्. ए. एल्एल्. बी. हे बार्शीचे मुनसिफ असतां, त्यांचेबरोबर आपल्या कुळदेवतेच्या दर्शनाचा योग यास घडून आला होता. त्यावेळीं असें कळलें कीं, जी ही यात्रा आमच्या ३।४ पिढ्यांना घडली नाहीं, ती आह्मांस घडली; व तेथील पुजाऱ्यांच्या वह्यात आमच्या पूर्वजांची तशीं नांवें पण आढळलीं. २ पुणें. ३. सांप्रत चालू असणारी ' तुलू ' ( कानडाचा एक भेद ) भाषा बोलणारे ( अर्थात्, तुलूचा अपभ्रंश ) या आडनांवावरून हे महाराष्ट्र ब्राह्मण नव्हत असें अनुमान निघत नाहीं. कारण महाराष्ट्राचे हद्दीवर असणारे दुभाषी असूं शकतात. यास प्रत्यंतर तसेच ' कानडे ' यांचें आहे. हे ब्राह्मण कानडी जाणणारे ह्मणून सदरहू उपनांव धारण करणारे झाले. तद्वत् ' कोंकणी ' जाणणारे ते ' कोंकणें '४ आरंभीं आलेल्या आचार्य ह्यांनीं मूळ कागदपत्रांवरून नकलांच्या वह्या केल्या आहेत; व मूळकागद ज्याचे त्यांस परत केलेले आहेत.

च शिवछत्रपति यांचे अभिषेकार्थ आणलेले महापंडित गागाभट्ट यांचे प्रिय शिष्य, बाळकृष्णभट्ट क्रमवन्त व रघुनाथभट्ट क्रमवन्त हे होत तेथें बाळकृष्णभट्ट क्रमवंत यांचें लग्न झालें. त्यावेळीं त्यांच्या नात्याच कोणी नव्हत. " वास्तव, वेदमूर्ती गागाभट्टजीनीं बाळकृष्णभट्ट क्रमवन्तास पुत्रत्वें मानून, त्यांचा विवाह केला. व महाराज कैलासवासी छत्रपति यांच्या सिंहासनप्रसंगीं व महानुष्ठानप्रसंगीं होते..... राज्यद्वारी वेदमूर्ति गोपाळभट्ट टुल्लू होते. क्रमवन्त ज्यासमयीं येत, त्यासमयी उभयतांचें बंधुत्व चालत होतें. " ( न. व. १ ली ).

श्रीशिवाजीमहाराजांचे वेळीं क्रमवन्त जसे पूज्य होते, तसे ते पुढे संभाजीमहाराजांचे कारकीर्दीतहि होते. संभाजीमहाराजांनीं वेदमूर्ति रा० विश्वनाथभट्ट क्रमवन्त व बाळकृष्णभट्ट क्रमवन्त यांची पात्रता पाहून स्वराज्याचे योगक्षेमचिंतनार्थ त्यांस मोज ' मुळें ' तर्फ खंडाळें सुभे प्रांत चेऊल हा गांव देह १ यकरास इनाम सर्वमान्य करून दिला ( न० व० २ री ).

पुढें, शाहूछत्रपतिमहाराज यांचे दरबारीं पंडित बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचें वजन पडूं लागल्यापासून, अग्रागर प्रांतस्थ क्रमवन्तांचे वतनवृत्तीवर तेथील कोंकणस्थांनीं डोळा ठेविला. नागांवकर वेदमूर्ति हरभट्ट लेले या विद्वान् ब्राह्मणाचीहि बुद्धि फिरली. द्रव्यलोभापुढे विद्वत्तेचें काय चालतें? कालिदासानें ह्मटलें आहे, तें अक्षरशः खरें आहे

* अपथे पदमर्पयन्ति हि श्रुतिमन्तोऽपि रजोनिमीलिताः ।

सदरहू लेलेभट्टजीनीं वेदमूर्ति आप्पाजीभट्ट क्रमवन्त व अनंतभट्ट क्रमवन्त यांस पेचांत आणण्याचा घाट घातला. या देशस्थांचा पाडाव कसा होईल याकडे भट्टजी मजकुरांचें तनमनधन लागलें.

---

* " विषयांध झाले ह्मणजे वेदशास्त्रसंपन्नहि वाईट मार्गाला लागतात "
—रघु० स० ८

एके दिवशीं वे. हरभट्ट लेले नांगांवाहून कुलाब्यास आले. व संधी साधून राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यांजपाशीं येऊन ह्मणाले कीं, " आपण कुडाळ प्रांतीं गेलों होतों, ते काळीं महादू किरवंत बोलिला—' आमच्या प्रांताहून एक शेणवी मुंबई प्रांतांत बहुत दिवस गेला होता; त्यासमयीं आमचाही एक पुरुष कुटुंब घेऊन गेला. त्याचें वृत्त काय आहे किंवा नाहीं हें कळत नाहीं. ' असें ब. त होता. तरी हेही क्रमवन्त आहेत. तरी त्या घराण्यांतील होतील कीं काय? " त्यावरून, सरखेलनीं सभा करून पांच स त तत्रस्थ ब्राह्मण मिळवून, वेदमूर्ती अप्पाजीभट्ट क्रमवन्त व अनंतभट्ट क्रमवन्त यांस बालावून नेऊन विचारिलें कीं " हरभट्ट लेले अशी अशी हकीकत सांगत आहेत. तर तुमचें मूळ ठिकाण कोणतें? तुमची जात कोणती? " त्यावर सदरहू क्रमवन्त भट्टद्वयांनीं त्यांस आपलें इत्थंभूत कुलवृत्त कथन केलें. पण तेवढ्यानें राजश्री सरखेल यांचें समाधान झालें नाहीं, व तसें होणें शक्यही नव्हतें. कारण हरभट्ट लेले हे जें विष त्यांचे कानांत ओकले होते तें—

+ ' आलर्कं विषमिव सर्वतः प्रसृतम् । '

मग आंग्रेसरकार क्रमवंतास बोलले कीं, " तुमचा निर्वाह लागत नाहीं. तो कळेपर्यंत, तुह्मी अपंक्त; व तुमची वृत्ति बंद " प्रभू समर्थ ह्मणून त्यांचा उपाय चालेना.

आतां विचारी वाचकांच्या मनांत सहज असा प्रश्न उद्भवेल कीं, आंग्रे यांची जी ही दरबारी कारवाई झाली, ती कायदेशीर होती काय? याचें उत्तर कायदेशीर नव्हती हेंच होय. कारण, या प्रकरणांत वादी लेलेभटजी, यांवर पुराव्याचा बोजा, शिरस्त्याप्रमाणें, आहे. कारण, जो पक्ष असें ह्मणत असेल कीं अमुक वस्तुस्थिति आहे; सबब माझा प्रतिपक्ष्यावर अमुक एक हक्क आहे व त्या प्रतिपक्ष्यावर अमुक एक जबाब-

---

+ ' पिसाळलेल्या कुत्र्याचे विषाप्रमाणें सर्वांगीं भिनलें होतें. '

—उत्तररामचरित्र.

दारी आहे असें न्यायाधीशानें फरमवावें; त्यानें ती वस्तुस्थिति सिद्ध करून दिली पाहिजे. येथें नुसती ऐकीव पुराव्याची लटपट चालणार नाहीं; लेखी पुरावाच हजर केला पाहिजे. मात्र तो मिळण्यासारखा असावा. आणखी या नियमाची गुरुकिल्ली अशी आहे कीं, पुरावा मुळींच नसेल तर जो पक्ष हरेल त्यावर सदा पुराव्याचा बोजा असतो. याचें प्रत्यंतर पाहूं गेलें, तरी आंग्रे सरकारचें सदरहू काम अन्यायाचें दिसतें. कारण क्रमवन्तांकडे कित्येक शतकांपासून * उपाध्यायपणाची वृत्ति आहे. तेव्हां कोणाहि पक्षाकडील पुरावा न घेतला तरी वादी हरभट्ट लेले हे हरतील. सबब त्यांनीं आपला वांका सिद्ध करावा हें ओघानें येतें. शिवाय ही गोष्ट जगप्रसिद्ध आहे कीं, अस्तिपक्ष सिद्ध करणें हें जितकें सुकर, तितकेंच नास्तिपक्ष सिद्ध करणें हें दुर्घट असतें. हें ज्ञान आजचें आहे असेंहि नाहीं; पूर्वींपासून आहे. कारण हें मनुष्यस्वभावज्ञान होय व आपल्या पूर्वजांस तें पूर्ण अवगत होतें असें दिसतें. ‘ ज्याच्या हातांत ससा तो पारधी ’ यासारख्या म्हणी एतत्संबंधी अनुभवजन्य ज्ञानाच्या द्योतक होत. असो.

आपल्यावर आलेल्या या विपत्तींत धैर्य धरून, वेदमूर्ती अप्पाजीभट्ट क्रमवंत व अनंतभट्ट क्रमवंत यांनीं अलिबाग सोडून घाटाचा रस्ता धरला. ते पुण्यास आले. तेथें त्र्यंबकभट्ट टुल्लू व शिवरामभट्ट टुल्लू यांचे पुत्र होते. त्यांचें पत्र आणिलें कीं, “ हे आह्मी गोत्रपुरुष. यांचें आमचें गांव ‘ जोगाईचें आंबें ’ याविषयीं कोणीही संदेह न मानावा. ” पुण्याहून मग ते नाशिकत्र्यंबकेश्वरास गेले. तेथील समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांनीं योग्य शोध करून, त्यांस संमतपत्र दिलें. तेथून ते कुडाळप्रांतीं गेले. त्यावेळीं तेथें सहस्रचंडी अनुष्ठान चाललें होतें. त्याकरितां तेथें कल्याणापासून कुडाळपर्यंतचे ४०००।५००० ब्राह्मण

---

* सदरहू ‘ आंग्रेसरकारची उपाध्यायपणाची सनद ’ या लेखकाचे आप्तवर्य कै. वेदमूर्ति महादेव सखाराम टुल्लू, अलिबागकर यांचे घरीं आहे; व त्यांचे घराण्याकडे अद्यापि ती वृत्ति चालू आहे.

जमा झाले होते, व येथेंही आप्पाजीभट्ट क्रमवन्त व अनंतभट्ट क्रमवंत यांच्या मेहनतीचें चीज झालें. येथें सभा होऊन त्यांस संमतपत्र मिळालें. ही उलटपक्षाची कबूली ह्मणजे किती उत्तम प्रकारचा पुरावा हें सांगणें नलगे. ती मिळण्या अगोदर त्या क्रमवन्तद्वयानें तेथील किरवंतांची उलट तपासणी केली. त्यांनीं त्यांस विचारलें कीं, 'तुह्मी हरभट्ट लेले यांजपाशीं काय बोललेत? त्यावरून आह्मांस शब्द ठेविला आहे.' त्यावर त्यांनीं क्रमवन्तद्वयास उत्तर केलें कीं, 'आपण स्वाभाविक बोललों होतों कीं मुंबईप्रांतींही आमचा एक पुरुष गेला होता, तो मेला किंवा काय हें कळत नाहीं. यावरून, हरभट्ट थोर शिष्ट ब्राह्मण यांहीं इतका अनर्थ करणें उचित नव्हतें. तुमचें गोत्र भिन्न, व कुल भिन्न, व आचार भिन्न. तुह्मांशीं आह्मांशीं संबंध नाहीं!'

याप्रमाणें दुर्घट नास्तिपक्ष सिद्ध करण्याची तयारी करून, वेदमूर्ति आप्पाजीभट्ट क्रमवन्त व अनंतभट्ट क्रमवन्त हे परत कुलाब्यास आले, व त्यांनीं राजश्री सरखेल यांजपाशीं तीं पत्रें दिलीं. पण मोठ्या आश्चर्याची गोष्ट ही कीं, 'त्या साक्षी त्यांच्या चित्तास आल्या नाहींत.' सध्यासारखे प्रतिज्ञालेख ( Affidavits ) व कमिशनें यांची सोय त्यावेळीं नव्हती. हें त्या क्रमवन्तद्वयाचें खडतर दुर्भाग्य! नाहींतर, एवढे अकटोविकट श्रम व यातायात करून, सारें मुसळ केरांत जातें ना! व जिवावर आलेलें शेंपटावरच गेलें असतें! पण व्हायचें तें कोठून चुकणार?

आतां आपला वृत्तिच्छेद व कुलच्छेद झाला असें समजून, व लेलेभट्टजींची 'आत्मोन्नतिः परग्लानिर्द्वयं नीतिरितीयती' पूर्ण फळास आली असें पाहून, वेदमूर्ति आप्पाजीभट्ट व अनंतभट्ट क्रमवन्त हे स्वोद्धारार्थ साताऱ्यास शाहूछत्रपतिमहाराजांकडे आले. तेव्हां त्यांचे विनंतीवरून, छत्रपतींनीं वेदमूर्ति राजश्री मुद्गलभट्ट पंडितराय यांस आज्ञा केली कीं, "हा ब्राह्मणसमुदायाचा विचार आहे. आमच्या जातींतील कांहीं विचार नाहीं. तरी राजेश्री बाळाजी पंतप्रधान हे श्रीमाहुलीसंगमक्षेत्रीं अतिरुद्र व कोटिहोम अनुष्ठान करीत आहेत. तेथें

बहुत थोर काशी आदिकरून उभय गोदातीर व कृष्णातीर येथील व कोंकणस्थ महाक्षेत्राचे थोरथोर शिष्ट ब्राह्मण आले आहेत. याचा विचार करून, या ब्राह्मणांच्या कुलाचा उद्धार होणें तो अर्थ करणें."

याप्रमाणें हे क्रमवन्त सातान्याहून माहुलीस आले. तेथें पेशवे राजश्री बाळाजी विश्वनाथ यांनीं मोठी सभा भरवून, सदरहू क्रमवन्ताजवळील क्षेत्रोंक्षेत्रींचीं संमतिपत्रें पाहिलीं व त्य प्रसंगीं हजर असलेले वे० शा० सं० बाळकृष्णभट्ट हिंगणें वाराणशीकर, यांनीं अशी साक्ष दिली कीं, "महाराज राजश्री गागाभट्ट यांनीं बाळकृष्णभट्ट क्रमवन्त यांचें गणगोत तेथें कोणी नाहीं असें पाहून, स्वतः त्यांस पुत्रत्वें कल्पून, त्यांचा विवाह केला. व महाराज कैलासवासी शिवाजीछत्रपति यांच्या सिंहासनप्रसंगीं व अनुष्ठानप्रसंगींही क्रमवन्त होते. हा अर्थ विदित आहेच." याप्रमाणें साक्षी पुरावा होऊन, पेशव्यांनीं त्यांस + संमतिपत्र दिलें. त्यांचा सर्वत्र बहुमान झाला. ब्राह्मणसमुदायांत, अनुष्ठानांत राजश्री श्रीपतराव प्रतिनिधी यांचे घरीं व राजद्वारीं त्यांस अनुष्ठान सांगून, त्यांचा बहुत सन्मान करून, त्यांशीं व्यवहार केला. खुद्द राजश्री बाळाजीपंत प्रधान यांच्या घरीं अनुष्ठानांत त्यांस पंक्तिपावन केलें. पेशव्यासारख्या ब्राह्मण अधिकाऱ्याचा केवढा हा मोठेपणा व कोण ही न्यायतत्परता! त्यांच्या त्या थोर मनास दुष्टदुष्ट जातिभेदाचें वारें खास शिवलें नव्हतें! त्यांचे विचार आजकालच्या महापंडिताप्रमाणें परिपक्व होते! ते अजून पुनरुक्त वाटत नाहींत! एका संस्कृत कवीनें थोर पुरुषाविषयीं असेंच आपलें मत दिलें आहे:—

* उदयति यदि भानुः पश्चिमे दिग्विभागे
प्रचलति यदि मेरुः शीततां याति वह्निः ।
विकसति यदि पद्मं पर्वताग्रे शिलायां
न भवति पुनरुक्तं भाषितं सज्जनानाम् ॥

---

\+ हें पत्र मागें आलेल्या अलिबागकर कै० वेदमूर्ति महादेव सखाराम टुल्लू यांचे घरांत आहे.

* सूर्य पश्चिमेस उगवेल; मेरु पर्वत स्थलान्तर करील; अग्नि शांत होईल; कमळ पर्वताग्रावरी शिखर फुलेल; पण सज्जनाचे शब्द वायफळ होणार नाहींत.

याप्रमाणें हें ग्रामण्य यथान्याय मिटविण्याचें अप्रतिम श्रेय राजश्री बाळाजी विश्वनाथ यांनीं मिळवून, राजश्री कान्होजी आंग्रे गोसावी यांस पत्र लिहिलें कीं "विशेष सांप्रत वर्तमान ऐकिलें तें कीं, वेदमूर्ति हरभट्ट लेले यांचे शब्दावरून, क्रमवन्तब्राह्मणांशीं अन्नसंस्कार करूं नये असा निश्चय केला. ह्मणून तरी हे गोष्ट आपल्या योग्य नाहीं. हें मनास आणतां, क्रमवन्त ब्राह्मण बहुत थोर, संपन्न; आणि त्यांचीं घराणीं ७००।८०० आहेत. तेणेंकरून, २०००।२५०० ब्राह्मणांशीं संबंध झाले आहेत. दुसरें, हें कर्म नूतन आहेसें नाहीं. १००।२०० वर्षांचें आहे. तिसरें, थोरले कैलासवासी स्वामी + होते त्यांचे समयीं उत्पात रहातासा नाहीं. ऐसें असतां, आपण भलत्याच शब्देंकरून ब्राह्मणांस दंड करावासें नाहीं."

या पत्राचीहि आंगेसरकारनीं किंमत जाणली नाहीं, व त्यास परत उत्तरहि धाडिलें नाहीं. यासंबंधीं पेशव्यांचे गुरु ब्रह्मेंद्रस्वामी यांनीं-देखील त्यांस पत्रें पाठविलीं होतीं. पण त्यांचीहि तशीच वाट झाली. हें पाहून, राजश्री बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनीं त्यास असें निक्षून लिहिलें कीं "ज्याप्रमाणें या क्रमवन्तांचा निर्णय केला आहे व संमति-पत्र दिलें आहे, तेणेंप्रमाणें विचारें करून, चित्तांत आणून, क्रमवन्तांचे ठायीं निर्दोष प्रसंग करून, ब्राह्मणांची वृत्तीवर स्थापना केली पाहिजे." व प्रसंगोपात्त पेशव्यांनी आंग्र्यांस हितोपदेश केला आहे कीं "तुह्मी आह्मी धर्मस्थापना करून, देवब्राह्मणाचा आशीर्वाद घ्यावा हेच गोष्टी उत्तम असे. यास्तव, सहस्र प्रकारेंकरून, ब्राह्मणसमुदायाचें संमतपत्र मान्य करून, क्रमवन्ताचा अभिश्राप दूर केला पाहिजे." (न० व० १ ली.)

हो नाहीं करतां करतां, एकदांचा या पत्रांचा इष्ट परिणाम झाला. त्यांत पेशव्यांचे उंदेरींचे शूर योद्धे व मामलतदार रा. नारो त्रिंबक यांनींही आंग्र्यांची समजूत घातली. त्यांनीं त्यांस असें लिहिलें कीं, 'श्रीमंत वलयांकित पृथ्वीचे सत्तापुरुष. यावत् बंगाल व महाक्षेत्र वाराणशी-पावेतों त्यांची आज्ञा कोणी मोडीत नाहीं. ऐसें असून, आपला त्यांचा

+ अर्थात् श्रीशिवछत्रपतिमहाराज.

पुरातन घरोबा. येथेंच त्यांच्या आज्ञेचा लोप स्वल्प गोष्टीसाठीं होतो. हे शब्द लागावयाचें कारण. यास्तव लिहिलें आहे. आह्मी उदेशीचें कार्य सिद्ध करावें, ह्मणून समस्त ब्राह्मणांस आमंत्रणें करून, अनुष्ठानें महारुद्रादिक नवसाचीं करविलीं. त्यांत हुजूरची आज्ञा पाहून कमवन्तांही अनुष्ठान महारुद्र करवून, पंगतीस तीर्थगंधादिक यथाविधी पूजन केलें. येणेंप्रमाणें, संगतपत्र व आज्ञाप्रमाणें केलें, तर आपणही त्याप्रमाणें करणें. जो न करील, त्यास ताकीद करून कोणी दुसरा तट न करी, तें करावें. ह्मणजे घरोब्याप्रमाणें उभयपक्षीं कीत न होतां, सर्व गोष्टी उत्तम होतील." ( न. व. २ री. )

सुंभ जळतें, पण पीळ जळत नाहीं. ज्यांचे पोटांत अष्टागरस्थ कमवन्तांचे वत्तीविपयीं द्वेप होता, त्यांस त्यांच्या सत्यपक्षाचा असा जय पाहून स्वस्थ बसवेना. त्यांनीं फिरून त्यांची कांहीं तरी कुचाळकी करण्याचा बेत केला. त्यांनीं श्रीमंतांचे पत्रास असा आक्षेप केला कीं, "श्रीमतांचे घरीं शिष्टांनीं तुह्मांशीं पंक्तिव्यवहार केला असता तर आह्मीं करतों." त्यावरून कमवन्त पंढरपुरास श्रीमंत होते तिकडे गेले; तेव्हां श्रीमंतांनीं उदारमनानें व न्यायबुद्धीस जागून फिरून शिष्टब्राह्मणांसह कमवन्तांस पंक्तिपावन करून, पत्रें देऊन, परत रवाना केलें. तेव्हांपासून अष्टागरांत फुकट माजलेलें हें ग्रामण्य विझालें व कमवन्तांनीं पूर्वपत्राप्रमाणें व्यवहार सुरू झाला.

पण इतकें झालें, तरी क्षुद्रबुद्धिजनांच्या मनांत अढी होतीच. एकदा कल्याण येथें वेदमूर्ति राजश्री रामचंद्र दीक्षित जोगळेकर यांचेघरीं समाराधनेंत पंक्तीमध्यें कमवन्त बसले आहेत असें पाहून, चवघे माथेफिरू पंक्तींतून उठून गेले. पण, बाकीच्यांनीं शिष्टसंप्रदायाप्रमाणें कमवन्तांबरोबर भोजन केलें. या अपमानाबद्दल, फिरून कमवन्तांस श्रीमन्तापाशीं जाणें भाग पडलें. यावेळींहि पेशव्यांनीं आपल्या हुकमाची तामिली करण्यांत मुळींच कसूर केली नाहीं. त्यांनीं त्या चौघा माथेफिरूंस "शिष्टकृत मर्यादेचें उल्लंघननिमित्तक निबंधोक्त प्रायश्चित्त देऊन, कमवन्ताशीं शके १६७८ त निश्चय करून पत्रें पाठविलीं आहेत त्याप्रमाणें व्यवहार करीत जावा. व पुढेंहि जो मर्यादेचें उल्लंघन करील, त्यास

शासन करावें, जो तुमचें न आयकेल, त्याचें पारिपत्य येथून होईल!” (न० व० २ री.)

यानंतर शके १६९१ पर्यंत क्रमवन्तांशीं व्यवहार सुरळित चालला. पण त्यासाली वजारतमाब सरखेल आंग्रे यांचे मातुःश्रीनें श्रीसंगमेश्वर देवाची प्रतिष्ठा व देवालयाचा जीर्णोद्धार केला. त्यावेळीं अर्चेकरतां समस्त पांथस्थ ब्राह्मणांस आमंत्रणें केलीं; व त्या अनुष्ठानांत सर्व भोजनादि व्यवहार यथास्थित झाला. त्यावर एक दीड महिना लोटला न लोटला तोंच क्रमवन्तासंबंधी द्वेषाग्नि फिरून झळफळूं लागला. क्रमवन्तांचे वृत्तीवर दृष्टी देऊन, पुन्हा कलह निर्माण झाला. संगमेश्वरीं ज्या ब्राह्मणांनीं क्रमवन्तांशीं पंक्तिव्यवहार केला होता, त्यांस पंक्तींतून उठविण्याचा विचार निघाला; व एका ठिकाणीं तो दृष्टिगोचरहि झाला. जंजिरे कुलाबा येथें आंग्रेसरकारनीं तडागोत्सर्गार्थ समस्त ब्राह्मणांस आमंत्रण केलें. त्यावर तीच ती आकांक्षा फिरून पुढें आली. तेव्हां, आंग्रे यांनीं नानासाहेब पेशव्यांचे संमतिपत्रानें प्रतिपक्ष्यास मुखरतब्ध केलें. त्यावेळीं चेऊल प्रांतांतील विद्वद्वैदिक पंडित थोर थोर ब्राह्मण यांनीं उत्तर दिलें कीं “श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान प्रमुख शिष्टांचीं संमतिपत्रें आलीं, तीं आह्मांस मान्य आहेत. एतदर्थीं मान्यामान्य याची संशयनिवृत्ति जाहली पाहिजे; तरी समस्त पांथस्थांस पाचारून संमति घ्यावी. जो अमान्य ह्मणेल, त्यांणीं पुण्यनगरीं जाऊन संमतिपत्रें श्रीमंत कैलासवासी प्रमुख समस्त शिष्ट ब्राह्मणांचीं आलीं आहेत, त्या पत्रांस बाध ठेवून पत्र आणावें. न आणिल्यास, श्रीवाराणशीयात्रेस गेल्याविना तो शुद्ध नाहीं!” (न० व० २ री.)

अशी चांगलीच थप्पड बसल्यावर, हें शुष्क वाग्रण बरेंच मंदावलें. पुढें इंग्रजी झाली, तेव्हां एकदा साखरेच्या खाडींत एक मचवा अकस्मात् बुडाला होता. त्यांतलीं जीं प्रेतें सांपडलीं, त्यापैकीं तीन चार ब्राह्मणांचीं होतीं. ते ब्राह्मण अलिबागचे होते. त्यांस कोणी आप्तइष्ट नव्हते. तेव्हां त्यांची क्रिया कोणी करावी असा प्रश्न निघाला. उपाध्यायानें आपल्या खर्चानें करण्याची चाल आहे असें पाहून, त्यावेळचे अलिबागचे कलेक्टर जोन्ससाहेब यांणीं ती तेथील प्रसिद्ध उपाध्याय

वेदमूर्ति सखारामभट्ट क्रमवन्त यांचे हातून करवून घेतली. या ठरावाची नक्कल त्यांचे चिरंजीव ह्मणजे मागें आलेले कै० वेदमूर्ति महादेव सखाराम टुल्लू यांचे घरीं आहे.

पुढें शके १७७६ त वेदमूर्ति राजश्री बाबाचार्य पुणतांबेकर यांचे पुत्र रामाचार्य पुणें मुक्कामीं असून प्रवासास गेले असतां, त्यांचे कुटुंबांनीं आपले मुलाचा विवाह राजश्री मोरेश्वर महादेव मुळेकर[1] यांच्या कन्येशीं करणार अशी बातमी पुण्यांत पसरतांच तत्रस्थ वैष्णव ब्राह्मणांनीं अग्रागरस्थ ब्राह्मणांप्रमाणें, क्रमवन्तांशीं फिरून निष्कारण तोच वाद उपस्थित केला. पण त्यास भीक न घालतां, त्या पुणतांबेंकरीण बाईनें धिटाईनें लग्न उरकून घेतलें! तेव्हां ब्राह्मणांचें राहिलेलें एकुलतें एक मोठें हत्यार त्यांनीं उभयपक्षांवर उपसलें. त्यांनीं त्यांवर ग्रामण्य आणिलें. त्यावेळीं समस्त वैष्णव मंडळीचे संमताची एक यादी तयार झाली. त्यावरून मुळेकरांचे बंधुवर्गांतील राजश्री विनायक भिकाजी टुल्लू व गोपाळ नारायण टुल्लू क्रमवन्त यांणीं समस्त वैष्णवमंडळीं यांशीं येऊन, आपले कुलशीलाचा व देशस्थ आश्वलायन व आपस्तंभ या मंडळीशीं शरीरसंबंध पूर्वीपासून आजपर्यंत होत आहे हें साक्षीपुराव्यानिशीं दाखविलें. त्या चौकशींत, एकूण दहा निशाणीचे कागद व जाब झाले. त्यांत नवीन महत्वाचा पुरावा म्हटला ह्मणजे वेदशास्त्रसंपन्न बाळशास्त्री टोकेकर, * अखेरच्या पेशव्यांचे न्यायाधीश यांची साक्ष होय. यांनीं बाबूराव आंग्रे यांस पत्र लिहिलें होतें. त्यांत वेदशास्त्रसंपन्न जगन्नाथशास्त्री क्रमवन्त+ यांस गोविंदभट्ट वैशंपायन यांनीं सभेंतून निष्कारण उठविल्याचे तक्रारीवरून, मागील इतिहास पाहून पूर्वरूढीप्रमाणें, तीर्थगंध पंक्तिव्यवहार चालू ठेवण्याविषयीं लिहून ताकीद दिली आहे. त्यावरून सभेनें निकाल दिला कीं,

---

१ सर्व्हेयर.

* 'रामशास्त्री प्रभुणे' या इतिहासप्रसिद्ध निस्पृह न्यायाधीशाप्रमाणेंच हेहि विद्वान् गृहस्थ अप्रतिम होते. न्यायमूर्ति रानडेकृत 'पेशव्यांचे रोजनाम्यांतील थोडीशी माहिती.'

+ यांना मराठी कोश प्रसिद्ध आहे ('भारतीय साम्राज्य,' पुस्तक ११ पृ० ३६८ पहा.) हे रा. सदाशिव काशीनाथ छत्रे याचे जोडीदार मराठी शाळांतील मुख्य 'मुनशर' [ तपासनीस ] होते. विद्यावृद्धीचे कामीं विशेष उत्साहानें व

" एकंदर पुराव्यावरून पहातां, क्रमवन्त मुळेकर हे देशस्थ ब्राह्मण असून, यांच्याशीं शरीरसंबंध पूर्वींपासून देशस्थ ब्राह्मण करीतच आहेत असें सिद्ध होतें. हा प्रकार पूर्वीं समजुतीस न आल्यामुळें कुलशीलाचा विचार होईपर्यंत कन्या देणारे मुळेकर व कन्या घेणारीं पुणतांबेंकरीण बाई व यांचे सांसर्गिक यांशीं बहिष्कृत ठेवण्याचें कांहीं राहिलें नाहीं असें सिद्ध होत आहे. यास्तव पूर्वींची यादी रहित करून हें संमतिपत्र दिलें आहे. "

सध्यांसारखे प्रतिबंध ( Estoppel ) व त्याची उपजातिनिर्णीत गोष्ट ( Res judicata ) यांची माहिती जितकी असावी तितकी जरी त्या काळीं नव्हती, तरी हरएक प्रसंगीं क्रमवन्तांचा पक्ष खरा ठरला आहे; व त्यांवर वृथारोप करणाऱ्यांनीं त्यांस नाहक सतावलें आहे; हें येथवरच्या त्यांच्या इतिहासावरून व्यक्त होतें. क्रमवन्तांनीं आपल्या विद्वत्तेच्या जोरावर वृत्ति मिळविली. ती पाहून, त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांचें पोट दुखूं लागलें; पण त्यांस ओंवा देणारे वाग्भटहि भेटले! क्रमवन्तांनीं आपले सजातीय कोंकणस्थ व कऱ्हाडस्थ ब्राह्मणांशीं सशास्त्र शरीरसंबंध करण्याचा उपक्रम केला, तो पाहून विघ्नसंतोषी जनांस कसेसें वाटूं लागलें; व तीहि त्यांची तिरीमिरी उतरणारे पंचाक्षरी भेटले!

आतां क्रमवन्तांच्या कृतज्ञतेबद्दलचा अलीकडील वृत्तान्त देऊन प्रस्तुत विषयाची रजा घेऊं. ग्वाल्हेरसंस्थानांत श्रीमंत आप्पासाहेब आंग्रे सेनापति हे वारल्यावर, धर्मशास्त्राविरुद्ध आंग्रेकुळांतील जवळचे संभाजीराव ( कुलाब्याचे अधिपति ) यांस दत्तक न घेतां, तेथील

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

आस्थेनें या गृहस्थानीं मेहनत केली; आपले आप्त, सुहृद, इष्टमित्र यांस शिकण्याकरितां मुंबईस आणिलें; त्यांची शिकण्याची सोय लावून दिली, व कित्येकांस आपल्या घरीं ठेवून शिकविलें. त्यांपैकीं कित्येक लोक मोठमोठ्या योग्यतेस चढले. ( मुंबई शहराचें वर्णन ). हे गृहस्थ या लेखकाचे प्रपितामह होय. यांचें नांव चालविणारे व क्यांडी व मोलस्वर्थ यांच्या कोशाचे तपासनीस वे. शा. सं. वासुदेव जगन्नाथ ऊर्फ तात्याशास्त्री हे एज्युकेशन सोसायटी प्रेसचे मरेपर्यंत ( ४० वर्षे ) हेडशास्त्री होते. यांची अनेकभाषाकोविदत्व व सौजन्य याबद्दल ख्याति आहे.

दुसऱ्या सरदार घराण्यांतील मुलगा दत्तक घेण्याचा विचार निघाला. पण बाईस तो रूढीविरुद्ध व अशास्त्र आहे असें तारतम्यज्ञानानें समजलें. तेव्हां, तिनें अलिबागकर संभाजीरावास मांडीवर घेण्याची खटपट सुरू केली; व आपले आलिबागकर कुलगुरु व तेथले सेशन्स जज्ज कै. रा. ब. गोविंद वासुदेव टुल्लू एम्. ए, एल्एल्. बी. यांस ती कामगिरी सांगितली. ईशसत्तेनें या कामांत त्यांस यशहि आलें त्यांनीं कायदेशीर दत्तक कोण होऊं शकतो हें योग्य अधिकाऱ्यापुढें यथातथ्य सिद्ध करून आपली ही अमोल वकिली, कवडीचा लोभ न धरतां, पार पाडिली! त्यांनीं केवळ आंग्रे घराण्याशीं आपला जुना संबंध ओळखून, जें आपलें कर्तव्य तें निष्कामबुद्धीनें केलें! शील हेंच जर परमभूषण असेल, तर त्याची उणीव क्रमवन्तांस भासत नाहीं. त्याचा हा संक्षिप्त इतिहास आहे. तो जोंवर त्यांचे वंशजाचे डोळ्यांसमोर आहे, तोंपर्यंत त्यांस तत्संबंधीं भीति बाळगण्याचें तिलप्रायहि कारण नाहीं. याउपर त्यांस कोणी किरवन्त, सारस्वत, शेणवी, पळशीकरब्राह्मण, सनदी ब्राह्मण असें काय हवें तें ह्मणोत. त्यांनीं सर्व मराठेशाहीची हयात पाहिलेली आहे, व तींतील प्रत्येक न्यायासनानें त्यांची पूर्वपीठिका निष्कलंक ठरविलेली आहे. जीवनार्थ कलह जसा तेव्हां होता, तसा हल्लींहि आहे. समर्थ, श्रेष्ठ, पात्र मनुष्यानें उच्चपद पटकवावें व बरोबरीच्याशीं बंधुत्वानें वागावें; ही नीति त्यावेळीं जशी होती, तशी आजहि आहे. त्यावेळचें एकीकरणाचें धोरण आजहि कायम रहावें; समाजाची घडी जशी पूर्वीं बसत होती, तशी बसत राहून, संघशक्तीचा उपयोग राष्ट्रहितकार्यीं व्हावा; व मागें झालेल्या वितंडवादाचा पुनर्जन्म पदोपदीं होऊन, काल, बल, द्रव्य यांचा व्यय व्यर्थ न व्हावा; ह्मणून हा अल्पप्रयत्न केला आहे. सुज्ञ वाचकांची वृत्ति विख्यात आहेच कीं,

+ घर्मार्ते न तथा सुशीतलजलैः स्नानं न मुक्तावलि-
र्न श्रीखंडविलेपनं सुखयति प्रत्यङ्गमप्यर्पितम् ।
प्रीत्यै सज्जनभाषितं प्रभवति प्रायो यथा चेतसि
सद्युक्त्या च पुरस्कृतं सुकृतिनामाकृष्टिमंत्रोपमम् ॥

---

+ " सभ्य व सयुक्तिक भाषणानें जसें सज्जनांस बहुधा समाधान वाटतें, तसें घामाघूम झालेल्यास थंड पाण्याचे स्नानानें किंवा मोत्याचे हारानें किंवा सर्वांगीं चंदनाचीं उटीनें वाटत नाहीं.! "